# सो ब त

( निवडक उत्कृष्ट कथांचा सतरावा संग्रह )

ना. सी. फडके



किंमत रुपये दोन
प्रकाशन २४ वें
आक्टोबर १९५३

अंजलि प्रकाशन लिमिटेड



प्रकाशक :

अंजली प्रकाशन लिमिटेड
३७ वेस्टर्न इंडिया हाऊस
सर पी.एम्. रोड, मुंबई १.

* * *

मुद्रक :

वि. ग. माटे
विश्वकर्मा मुद्रणालय,
टिळक रोड, पुणें २.

* * *



* * *

## अनुक्रमणिका

# १ : सोबत : जन्माची ? घटकेची ?

त्या मिठाईच्या दुकानापुढे उभं राहणारं प्रत्येक गिऱ्हाईक थोडंसं गोंधळून जाई. त्याच्या मनात येई, दुकानावर पाटी तर ' नथू हलवाई, कंदी पेढे आणि बर्फी ' अशीच आहे, मिठाईनं भरलेली मोठमोठी ताटं पराती असा थाटहि नेहमीचाच आहे, मिठाईची चव आणि स्वाद नेहमीच्या परिचयाचा तोच आहे. परंतु ताजव्यापुढें गादीला टेकून बसलेला गोऱ्या रंगाचा, फाटक्या अंगाचा, डोक्यावर एखाद्या पालथ्या वाटीसारखी टोपी घातलेला आणि मराठीऐवजी हिंदी भाषेंत "सेर देऊं ?" "पावसेर ?" "चंगा, भला" असं नाकांत बोलणारा, मिठाई जोखण्याच्या आधीं आपल्या उजव्या हाताच्या आंगठ्यानं व बोटानं करड्या मिशांचे आकडे वर करणारा हा माणूस कोण ? याला आपण नथूच्या दुकानात पूर्वी कधीं पाहिला नाहीं ! नथूनं नव्यानं ठेवलेला एखादा नोकर असेल म्हणावं तर नथूच्या जागीं गादीवर बसलेला आहे ! आणि दुकानात नथू असायचा तो कुठें दिसत नाहीं ! ...

•

नथू हलवायाचं दुकान लोकांच फार आवडतं होतं. पाथरी हे तालुक्याचं लहानसं गाव. परंतु त्या गावाच्या पंचक्रोशींत शेतीभाती चांगली होती. वैरण, दाणापाणी मुबलक होतं. दुभतीं जनावरं खाऊन पिऊन मस्त असत. आठ दहा मोठाले गवळीवाडे पाथरीच्या जवळपास होते लोकांत कुस्त्यांचा षोक होता. आखाड्यांत चार चार घंटे मेहनत करावी, केशराचा आणि जायफळाचा वास लावलेली दोन तीन शेर बासुंदी प्यावी, असा क्रम ठेवणारे अनेक जवान होते. त्या छोट्या शहराच्या बाजारचौकात हलवायांचीं कित्येक वर्षांचीं जुनीं आठ दहा दुकानं होतीं. नथू हलवायाचं दुकान सगळ्यात मोठं नव्हतं, पण लोकांचं फार आवडतं होतं.

हे दुकान पहिल्यांदा काढलं नथूच्या आजोबानं. त्या वेळेस अवघ्या एका खणाच्या जागेत दुकान होतं. पाट्या रंगविण्याची कला त्या काळात फारशी माहीत नव्हती; नथूच्या बापानंहि दुकानावर पाटी कधीं नाहीं लावली. ती नथूच्या कारकीर्दीतच प्रथम लागली. मूळचं एका खणातलं

दुकान आता मोठं झालं होतं. मल्लांचे फोटो व आरसे अशा प्रकारचा दुकानाचा थाटहि आता वाढला होता. नथूचीं गिऱ्हाइकं बांधलेलीं होतीं. शेजारच्या इतर हलवायांनीं कितीही थाटमाट वाढविला, फोनो वाजविले तरी आपलं ठरलेलं गिऱ्हाईक दुसरीकडे वळायचं नाहीं याची नथूला पूर्ण खात्री होती. त्याचा सारा माल निर्मळ,स्वच्छ, चोख असे. त्याची खमंग चव आणि उची स्वाद यात रेसभर फरक होणार नाहीं अशी दक्षता तो घेत असे. त्याच्या सचोटीवर आणि हसत मुखानं आदबशीर बोलण्यावर लोक खूष असत. त्याच्या गादीपुढच्या पेटींत रोज भरणाऱ्या गल्ल्यात कधीं अतर पडत नसे. सणवार असला किंवा मुलकी परीक्षेच्या निकालाचा दिवस असला म्हणजे नथूच्या दुकानापुढें विशेष गर्दी व्हायची हे ठरलेल. तरुण विद्यार्थ्यांत आणि मास्तर–मंडळीत नथूच दुकान विशेष लोकप्रिय होतं...

मात्र त्याच्या दुकानाचा सर्वांत मोठा ‘ सीझन ’ म्हणजे पाथरी गावापासून तीन मैलांच्या टेकडीवर जी देवी होती तिची जत्रा. ही जत्रा म्हणजे त्या टापूतला सर्वांत मोठा उत्सव. दहा दिवस आजूबाजूच्या शेकडो गावाहून येणाऱ्या लोकाची रात्रदिवस रीघ लागलेली असे. टेकडीवर जाणाऱ्या पायऱ्याच्या दुतर्फा दुकानं लागलेलीं असत. नथूच पाथरी गावातलं दुकान फारसं मोठं नव्हतं, परतु जत्रेंत त्याचा मांडव सगळ्यात मोठा असे. अरुणोदयाच्या सुमारास तालीमबाज पठ्ठे तीन मैलाची दौड करीत देवीच्या दर्शनास येत, दर्शन केल्यावर बासुदी पीत, मिठाई खात. तेव्हापासून नथूच्या दुकानात जी गडबड सुरू व्हायची ती मध्यरात्रीपर्यंत चालू असे. इतर कोणत्याहि दुकानाकडे ढुंकून पहायचं नाहीं, सरळ नथूच दुकान गाठायच, अशा वृत्तीचीं हजारो माणस जत्रेला येऊन जात. प्रत्येकाशीं आपल्या दुकानातल्या मिठाईप्रमाणेंच गोड बोलायच अशी नथूची रीत होती. वीस पचवीस रुपयाच गिऱ्हाईक आणि छटाक मिठाई मागणारं शाळकरी पोर यात नथूनं कधीं फरक केला नाही. ताजव्यापुढे गादीवर बसलेला नथू लहान मुलालादेखील म्हणायचा, “ काय देऊं ? कदी पेढे, नारळाची बर्फी, बदामाची बर्फी ? ” आणि एकेका पदार्थाचा इतका

भरघोस नमुना मुलाच्या हातावर ठेवायचा, कीं ते मूल खूष होऊन जायच आणि छटाक मिठाई घेण्याऐवजीं " पावशेर द्या " म्हणायच !...

यामुळें यंदा देवीच्या जत्रेंत नथू हलवायाच्या दुकानाकडे त्याची ठरलेलीं गिऱ्हाइक नेहमींप्रमाण जात होतीं खरी, परतु मिठाई घेता घेता प्रत्येक माणूस थोडस गोंधळून जात होत. जो येई तो गादीवरच्या नव्या माणसाकडे आश्चर्यान बघे. आपण चुकून दुसऱ्या दुकानात आलों कीं काय अशी शंका घेई, दुकानात इकडे तिकडे नजर टाकी, दुकानाच्या पाटीकडे निरखून बघे आणि मग मनाशीं म्हणे, ' दुकान तर नथूचच ! पण मग नथू कसा कुठे दिसत नाहीं ? ' ... बहुतेक गिऱ्हाइकं मनांतल आश्चर्य मनाशींच ठेवीत, विकत घेतलेली मिठाई उचलीत, चालू लागत, फार तर पुन्हा एकदा वळून दुकानावरच्या पाटीकडे बघत आणि आपण नथूच्याच दुकानात मिठाई घेतली कीं नाहीं याबद्दलचा मनातला रेंगाळणारा अखेरचा संशय फेडून घेत ...

दुकानात मिठाई घेणारा एखादा अधिक चौकस माणूस विचारी, " नथू कुठें आहे ? "

पालथ्या वाटीसारखी टोपी घातलेला तो गादीवरचा माणूस हिंदींत सागे, " नथु न ? वो है – "

" आहे तर दिसत कसा नाहीं गादीवर ? "

" दिसेल कसा ? आता या गादीवर तो नाहीं बसायचा ! आम्ही बसणार— "

" म्हणजे काय ? "

" म्हणजे अस कीं ही दुकान आम्ही नथूपासून खरीद घेतली न ! "

" ऑ ? "

" तर ! आता दुकानावरची पाटी पण आम्ही बदलूं —लेखराज मिठाईवाला ! "

" अस काय ? "

लेखराज मिशाचे आकडे चढवीत म्हणे, " पण दुकान नथूची नाहीं, आमची झाली म्हणून आपली मेहेरबानी बंद होता कामा नये हं ! मिठाईची कवालिटी उतरावयाची नाहीं. नथूपेक्षा सरस मिठाई बनवूं

आम्ही. सिंधी हलवा, पंजाबी हलवा अशा एकाहून एक फरमास चिजा मिळतील लौकरच आमच्या दुकानात. दुकान आपलीच आहे बर का साहेब! हमेश इकडे च्यायची मिठाई नि पब्लिकलाबी सागायच लेखराज मिठाईवालेकडे सिंधी, पजाबी मिठाई मिळते म्हणून. पाथरीची दुकान एकदम बडी करणार आम्ही!"

लेखराजाची ती सिंधी बडबड ऐकून चौकस गिऱ्हाइकाच्या मनातल आश्चर्य सपे; पण नथून आपल्या तीन पिढ्याच जुन दुकान कोणत्या कारणासाठीं विकून टाकलं त्याचा उलगडा करून घ्यावासा त्याला वाटे. तो लेखराजाला विचारी, " तुम्ही सिंधमधले काय?"

मिशाचे आकडे चढवीत लेखराज सागे, " हा साहेब, आम्हीं सिंधमधले. आमचा देश गेला, तुमच्या मराठी देशाकडे धाव घेतली. जमीन गेली, जुमला गेला, देवाची खैर—जान राहिली! आता तुमचा मुलूख हाच आमचा देश नथूची दुकान खरीद केली. आपल्यासारख्याची मेहेरबानी झाली तर इथें पण चार घास सुखा न खाऊ"

"पण नथून दुकान विकलं कशासाठीं? दुकान तर उत्तम चालल होतं."

"हा साहेब, उत्तम चालली होती दुकान म्हणून तर आम्हीं खरीदली न! नाही तर कुणी घातला असता पैसा?"

" केवढ्याला घेतलत नथूच दुकान?"

एखादी गुप्त गोष्ट सागायची नसली म्हणजे माणून नुसत हसत तस हसून लेखराज म्हणे, " नथूला भर किमत दिली. पाकिस्तान्याची नजर चुकवून जेवढे आणले होते तेवढे सगळे पैसे घातले साहेब. देवाची कृपा होईल तर बरकत मिळेल, पण आपल्यासारख्या गिऱ्हाईकाची मेहेरबानी हवीच. दुकान आपलीच समजायची बर का साहेब!"

" पण नथू आता कोणता धदा करणार आहे?"

" भगवान जाणे! आम्ही कशाला चौकशी करू?"

" पाथरीलाच आहे काय नथू?"

" पाथरीला? हँः! तो गेला आपल्या देशावर निघून. जाताना त्याला मोठी रक्कम हवी होती; म्हणून तर दुकान काढली त्यान."

" आपल्या देशावर कशाला गेलाय् नथू?"

" भगवान जाणे साहेब! आपल्याला काय करायच्या चौकशा?"

" हं, बरोबर आहे–" असं म्हणून गिऱ्हाईक दुकानापुढून दूर होत असे. लेखराज अखेरचं ओरडून सागे, " दुकान आपलीच आहे बरं का साहेब! सिंधी हलवा, पंजाबी हलवा–"

त्याची ती हलव्याची जाहिरात पुरती न ऐकताच गिऱ्हाईक दूर गलेल असे.

नथू हलवायच दुकान एका सिंधी निर्वासितानं विकत घेतल ही बातमी पाथरी गावात हळूहळू सर्वाच्या माहितीची आणि शिळी झाली. पण उत्तम चाललेल जुन दुकान विकून टाकून नथू आपल्या देशाला एकाएकीं का गेला याबद्दलच लोकाच आश्चर्य मात्र कायम राहिल. एक तर पाथरी गावातले सगळ लोक नथूला मराठाच समजत होते त्याचा आजोबा उत्तर हिंदुस्थानातुन इकडे आला व त्यान पाथरी गावात प्रथम दुकान काढल ही गोष्ट ठाऊक असणारीं फार थोडीं माणस आता पाथरी गावात शिल्लक होती. तीन पिढ्या मराठी मुलखात काढल्यामुळे नथूची मूळची हिंदुस्थानी राहणी इतकी पालटून गेली होती, की नथू मराठा नाही अशी चुकूनदेखील शंका कुणाला येण्यासारखी नव्हती. नथूचा पेहराव अस्सल मराठी थाटाचा होता. तो अगदी सफाईदार मराठी बोलत असे. आपल्या जन्म–गावावर प्रेम कराव तस त्याचं पाथरी गावावर प्रेम होत. ऐन विशीच्या सुमाराला त्याला कुस्तीचा खूप षोक होता.त्यान कुस्त्याचे फड जिंकले होते पाथरीच्या नथू पहिलवानाला कित्येक वर्ष जोड नव्हती. पुढें नथूचा बाप मेला, नथूला धंद्यात लक्ष घालावं लागल, त्यामुळे त्याला पूर्वींप्रमाणे कुस्तीची हौस करण अशक्य झाल. पण त्यान स्वत कुस्ती सोडली तरी पाथरी गावाची कीर्ति कायम टिकावी म्हणून जे जे करण्यासारख होत तें ते केल. होतकरू पठ्ठे शिकवून तयार केले. आपल्या खर्चान त्याना खाऊं पिऊ घातल. सढळ हातान इनाम दिलीं.

त्याच्या बापाचे काही स्नेही त्याला म्हणत, " अरे नथू, दुकानात मिळणारे सारे पैसे उडवतोस हे काहीं बर नाहीं."

नथू म्हणे, " काका, व्यसनात अन् ख्यालीखुशालींत तर नाहीं ना पैसे उडवीत ? "

" ते खर रे, परतु पैसा साठवायला हवा ना ! "

" मी कशाला साठवूं पैसा, काका ? मला ना बायको, ना पोर ! "

" हेच चुकतंय् तुझ नथू. आता तूं लग्न करायला हवस. आता वर्ष कितव तुला ? "

" तिशी तर उलटली, काका. "

" मग ? किती दिवस एकटा फकीर राहणार ? तुझा बाप असता तर त्यानं तुझ दोहोंचे चार हात केव्हाच केले असते. पण बाप नसला म्हणून काय झाल ? आम्ही आहोंत ना ! आमच ऐक नथू. बायको आण घरात. बाई माणसावाचून खरी शोभा नाहीं घराला. "

" हॅ ! मस्करी करता होय, काका ? " अस म्हणून आपल्या म्हाताऱ्या हितचिंतकाना नथू निरोप देत असे.

नथू कधीं लग्न करणार नाहीं याबद्दल पाथरी गावाची खात्री झाली होती.

त्यामुळेंच नथूला जेव्हा मनातल्या मनात लग्न करावंस वाटूं लागल तेव्हा आपल्या विचारातला हा बदल कुणाजवळ बोलता कामा नये, गुप्त ठेवला पाहिजे, अस त्याला वाटल. वास्तविक त्याच्यासारख्या माणसानं लग्नाचा विचार केला तर वावग काय होत ? सरळच गोष्ट होती ती. त्याचा लग्नाचा विचार ऐकून गावातल्या लोकाना बरच वाटल असतं. परंतु नथूला शंका आली, कीं ' काय ऐट आणली होतीस लग्नावाचून राहण्याची ! आता आलास का शरण ? झाली का फजिती ?' अशा प्रकारें लोक आपल्याला हिणवतील; आपली चेष्टा होईल. आपल्याला बायको हवीशी का वाटू लागली हें तर काही मन मोकळं करून आपल्याला सागता यायचं नाही. आपल्या मनात कशानं पालट झाला तें आपलं आपल्यालाच धड उलगडलेल नाहीं, मग लोकाना काय सांगणार आपण ? आणि आपण फजीत मात्र होऊं ! त्यापेक्षा आपल्या मनांत दृढ होणारा लग्नाचा विचार कुणालाहि-जवळच्या दोस्तानासुद्धा सागू नये हेंच चागलं...

आणि नथून विचार केला, सांगितल्यावाचून अडणार आहे तरी काय !

लग्नाच्या बाबतींत पाथरी गावातल्या दोस्तांची मदत त्याला होण्यासारखी नव्हतीच. कारण या मुलुखातली नवरी त्याला चालण्यासारखी नव्हती. लग्न करायचं झाल तरी आपल्या देशाला जाऊन एखादी चागली जातवाली मुलगी बघणं भाग होत गूंजगड हे त्याचें जन्मगाव. त्या गावीं एक चागली मुलगी लग्नाची आहे अस कळल्यापासून नथूच्या मनात लग्नाचे विचार घोळू लागले होत...

या मुलीची बातमी नथूला पहिल्यादा मिळाली ती दोन महिन्यापूर्वी त्याचा एक गाववाला पाहुणा आला त्याच्याकडून.

नथूकडे चार सहा दिवस राहिल्यानंतर पाहुणा त्याला म्हणाला, " भाई, तुझी दुकान फार चागली चालली आहे हें पाहून बहोत खूष झाली मी. गावाकडे असतानाच मीं ऐकल होत, कीं नथू मोठा मातब्बर दुकानदार झाला आहे. तुझी चलती डोळ्यानीं पहावी म्हणून आलो. तुझा धंदा ठीक चाललाय, गावातले लोक तुला मोठा समजतात, चार चागले लोक तुझ्याकडे येतात, बसतात हे पाहून मला मोठ समाधान झाल. "

नथू म्हणाला, " देवाची कृपा ! "

" पण नथू, तुझ्या सुखात एक मोठी उणीव दिसते मला. ती नको ठेवूस—"

" म्हणजे कस म्हणता ?"

" तुझ्यासारख्या माणसाच्या घराला मालकीण हवी ! ..लग्न कर."

आताशा लग्नाचे विचार नथूच्या मनात यायला लागलेच होते. त्यामुळें पाहुण्याची सूचना एकदम धुडकावून न लावता नथू म्हणाला, " असं म्हणता ? पण माझ्याजोगी मुलगी कुठली असणार? माझी तर तिशी उलटून गेली. आता एखाद्या आठ दहा वर्षाच्या छोकरीशीं लगीन लावणं माझ्या मनाला पटणार नाहीं. वयात आलेली मुलगी हवी. अशी मुलगी आपल्या जातींत कुठली मिळायला ? "

पाहुणा म्हणाला, " तूं लग्नाला तयार आहेस कीं नाहीं सांग ? तुझ्यासाठी नवरी शोधणं माझ काम. आणि गड्या, खरं म्हणशील तर अगदीं

तुला शोभेलशी, वयात आलेली, आपल्या जातींतली एक मुलगी माझ्या आढळात आहे "

" कुठे ? आपल्या गूजगडला ? "

" नाही, गूजगडला नाही; नजीकच्या मोठ्या शहरीं. "

" खाराबादला ? "

" हा, खाराबादला ! वर्षातून एकदा माझं जाणं होतं ना शहराला ? गेल्या वर्षी गेलो होतो तेव्हा ही मुलगी मीं पाहिली. चांगली मोठी आहे. बापाला नकोशी झाली आहे. ही मुलगी त्याच्या पहिल्या बायकोची. नवी बायको घरात आणल्यापासून हा रामप्रसाद तिच्याभोवतीं नाचू लागला आहे. मुलींची अडचण होते आहे नवराबायकोंना, तेव्हां तिचं लगीन करायच्या विचारात आहेत. मुलीचं नाव जम्ना. चांगली आहे. "

नथू म्हणाला, " ठीक आहे. बघा जुळत असलं तर. "

" अरे, जुळायचं काय ? तू किती पैसे मोजायला तयार आहेस एवढाच सवाल. कारण जम्नाच्या बापाला आणि आईला मुलगी सभाळणं जड झालय् खरं, पण मुलीला उजवून टाकता टाकता मिळेल तेवढा पैसा बळकावायचा आहे त्याना "

नथून विचारलं, " म्हणजे रामप्रसादला सरळ मुलगी विकायची आहे म्हणानात ! "

" हा, भाई. दुनिया तर अशी बनली आहे ! "

नथूनं विचारलं, " केवढ्याचा सवाल आहे ? "

" तो आज काय मागेल मला नाहीं सागतां येणार. गेल्या वर्षी खाराबादला गेलो तेव्हा कळलं की रामप्रसाद तीन हजार रुपये मागतो. "

" तीन हजार ? "

" हा, जो कोणी एका रकमेनं तीन हजार मोजील त्याला जम्ना देईन, अशी रामप्रसादची भाषा ऐकली होती. "

नथूला मनातल्या मनात एकदम शिसारी आली. खरं पाहतां तो एक अशिक्षित माणूस होता. जुन्या धार्मिक समजुतींची आणि रूढींची त्याच्या मनावर छाप होती. नवऱ्यानं नवरीच्या बापाला धन द्यायचं यात काही भयंकर आहे असं त्याला वाटत नव्हतं. पण तरीदेखील एकाद्या माणसानं

आपल्या मुलीचा सरळ लिलाव मांडावा आणि 'तीन हजार रुपये एक वार, दोन वार' असं पुकारल्याप्रमाणे बोलावं हा प्रकार त्याला अगदी निंद्य, किळसवाणा वाटला. असल्या प्रकारात आपण सामील होऊ नये असं त्याला वाटलं. दानतवालीं माणसं असं नाहीं वागत !...

त्याला लग्न हवंसं वाटू लागलं होतं, बायको हवीशी वाटू लागली होती, पण दुकानातली मिठाई घेतल्याप्रमाणें घरधनीण विकत घेण्याची कल्पना त्याला अगदी कशीशीच वाटली...शिवाय तीन हजार रुपये ! एवढी मोठी रक्कम तो कोठून आणणार होता ?...

त्यानं आपल्या मनातले सगळे विचार पाहुण्याजवळ बोलून दाखविले नाहींत. फक्त एवढाच उद्‌गार काढला. " तीन हजार ! हें नाही आपल्याला जमायचं."

पाहुणा जरा वेळ गप्प बसला. मग तो हळूच म्हणाला, " अशी मोठी वयात आलेली दुसरी मुलगी आपल्या जातींत मिळायची नाहीं तुला."

" न मिळाली तर न मिळाली. आजपर्यंत एकटा राहिलों तसाच पुढें राहीन."

दोघातला तो विषय तेवढ्यावरच संपला. पाहुणा नंतर चार दिवस राहिला. परंतु त्यानं तो पुन्हा काढला नाहीं. नथूहि त्या बाबतींत पुन्हा बोलला नाहीं.

पण नथूचा निरोप घेण्याच्या दिवशीं पाहुण्यानं बोलता बोलता एकदम विचारलं,

" तीन हजार नाहीं तर किती देशील तूं ? "

त्या प्रश्नाचा संदर्भ एकदम नथूच्या लक्षात आला नाहीं. त्यानं विचारलं, " कशासाठीं ? "

" तुझं लग्न जुळावं अशी माझी फार इच्छा आहे. तुझा रुकार असेल तर मी जम्नाच्या बापाला विचारीन आणि म्हणेन तीन हजारच्या खालीं काहीं घेशील का ? "

असल्या पैशाच्या भाषेची नथूला मागंच किळस आली होती. त्यानं

म्हटलं, "नका विचारूं तुम्ही. लगीन करायचंच नाहीं मला. राहीन लग्नावाचून! मी काय कमी सुखात आहे?"

"बरं, तुझी मर्जी!"

पाहुणा गेला होता, पण नथू मनातल्या मनात जम्नाचा विचार करीत राहिला होता जास्तींत जास्त सवाल पुकारून बायको विकत घेण त्याला किळसवाण वाटल होत. 'राहीन मी एकटा. मी काय कमी सुखात आहे?' अशी भाषा स्वत च्या मनाशीं करण त्याला अधिकअधिक कठीण वाटू लागलं होत, एकटेपणा नकोसा होत होता, बायकोची सोबत हवीशी वाटू लागली होती. लग्नाची इच्छा बळावली तसतसा पैसे देण्याच्या कल्पनेचा तिटकारा कमी कमी वाटू लागला हाता! पाहुण्याकडून ऐकलेली जम्नाची हकीगत त्याच्या मनात खोल कुठे तरी रुजली होती ती त्याला हवीशी वाटू लागली होतीं घरधर्णान म्हणून ती आली तर आपल्याकडे ती कशी वावरेल, कसा ससार करील, याचीं चित्र त्याची कल्पना रगवू लागली होती.. कल्पनेन रगविलेल्या त्या चित्रानींच घर किती शोभिवत दिसू लागे! आणि उलट, तीं चित्र नुसती कल्पनेतच राहिलीं तर घराला कशी अवकळा येयील त्याचे विचार नथूच्या मनात येत.. हळू हळू जम्नासाठीं तीन हजार रुपये देण्याचा नथूच्या मनाचा निश्चय होत गेला . परतु तो निश्चय जसजसा होऊ लागला तसतसा निराळ्याच एका विचारान नथू अस्वस्थ झाला...तीन हजार रुपये आणायचे कुठून? .. त्यान कधी जन्मात कर्ज काढल नव्हत सावकाराच्या घराची पायरी माणूस एकदा चढलं की त्याची कशी दुर्दशा होते त्याचीं उदाहरण त्यान पाहिलीं होतीं. ऋण काढून सण करायला त्याच मन मुळींच तयार नव्हत. आणि ऋण काढण्यावाचून तीन हजार रुपये उभे करण्याचा दुसरा मार्गहि दिसत नव्हता! ...

पण एके दिवशीं नथूला वाटल, 'मार्ग नाहीं कसा? ... आहे! . आपल मिठाईचं चालू दुकान आणि दुकानाची जागा विकून टाकल्यास तीन हजार रुपये नाहीं मिळणार? मिळतील!'... अडचण एवढीच होती, कीं दुकान विकण्याची गोष्ट गावकऱ्यापैकीं कुणाजवळ काढून उपयोगी नव्हती. गावकरी साहजिक विचारणार, 'दुकान कशा-

साठीं विकायला काढतोस ! जागा कशासाठीं विकायची म्हणतोस ? ही दुर्बुद्धि तुला कुणीं सांगितली ?' आणि या किंवा असल्या प्रश्नाचीं उत्तर गावकऱ्यांपैकीं कुणाला देण्याची नथूला इच्छा नव्हती. लग्न करण्याचा आपला नवा निश्चय तो गावकऱ्यांपैकीं कुणालाहि सांगणार नव्हता. दुकान आणि जागा विकल्यावर तीन हजार रुपये हातीं येण्यासारखे होते. जम्नाशीं लग्न करण्यासाठी ते त्याला हवेहि होते ..परंतु गावातलं गिऱ्हाईक त्याला नको होतं ! नथू पुन्हा पंचायतींत पडला.

तीन हजार रुपये मिळविण्याचा मार्ग आपल्याला सापडला असं समाधान मात्र त्याला वाटूं लागलं. आणि गूजगडच्या दोस्ताला त्यानं लिहून कळविलं. " जम्नाच्या बापाजवळ माझी गोष्ट तू काढ आणि तो काय म्हणतो ते कळव. " पंधरा दिवस त्यानं पत्राच्या जबाबाची वाट पाहिली. पुन्हा पत्र लिहिलं. पुन्हा वाट पाहिली. तरी जबाब आला नाहीं ! ...तो मनाशीं आश्चर्य करूं लागला...

एके दिवशीं त्याला हवा तसा सौदा करणारं गिऱ्हाईक आपण होऊन त्याच्याकडे आलं. लेखराज नावाच्या एका सिंधी निर्वासिताशीं त्याची ओळख झाली. त्याच्याजवळ नथूनं सहजगत्या विषय काढला. दुकान आणि जागा विकत घेण्याची लेखराजानं तयारी दर्शविली. नथूनं पांच हजार रुपये मागितले. लेखराज म्हणाला, "दोन हजार रुपये देईन." हो ना करता करता शेवटीं तीन हजारावर सौदा ठरला...

मग नथूनं विचार केला, पैशाची मोठी अडचण तर संपली आतां काय करायचं ? ... गूजगडच्या मित्राकडून त्याच्या पत्राचा जबाब अजूनही आला नव्हता. जम्नाच्या बापाचं म्हणणं नथूला कळलं नव्हतं...

पण मग नथूनं विचार केला पत्राच्या जबाबाची वाट पहाण्यात आतां अर्थ नाहीं....वाट कशाची पाहायची ? त्याच्या हातात जरूर तेवढी रोकड रक्कम होती. तो सरळ खाराबादला जाऊं शकत होता. रामप्रसादकडे जाऊन तो त्याला म्हणूं शकत होता, ' तू सांगतोस तेवढे पैसे मी घेऊन आलों आहे.' ... खाराबादला जाऊन रामप्रसादला भेटून त्याच्यापुढें तीन हजाराचा तोडा ठेवला कीं आपले मनोरथ पूर्ण होतील .... हा विचार त्याला पटल्यावर तो अमलात आणायला त्यानं वेळ लावला नाहीं. दुका-

नाचं खरेदीखत झालं. ठरलेली भर किंमत एका रकमेनं त्याच्या हातात पडली. आपल्या मनातला हेतु पाथरी गावात कुणाजवळहि बोलून न दाखविता नथू पाथरी गाव सोडून खाराबादला जायला निघाला . . . मना तल्या मनात तो फार खूष होता. आता आपल्या लग्नाचा बेत आपल्याला पार पाडता येणार याविषयीं त्याला शंका नव्हती. जम्ना आपल्याला मिळ-णार याची त्याला खात्री होती. जी सोबत त्याला हवीशी वाटू लागली होती, ती त्याला आता खचित मिळणार होती. जम्नाबरोबर तो आता संसार थाटणार होता. त्याचा एकटेपणा संपणार होता !

खाराबाद शहरात नथूनं पाऊल टाकलं तें आनंदानं आणि अधीर मनानं... त्याच्या एका आत्येचं सासर खाराबादलाच होतं ती मरून बरींच वर्षं झालीं होतीं. तिच्या सासरच्या माणसांशीं नथूचा पत्रव्यवहारहि नव्हता परंतु कुठे तरी पथारी टाकायला जागा हवी म्हणून त्यानं त्या माणसाचं मकाण शोधून काढलं. दुर्गा सुगंधीचं दुकान लहानसंच होतं, परंतु त्याची प्रसिद्धि बरीच होती. नथूला काहीं फार शोधाशोध करावी लागली नाहीं. दुर्गा म्हणजे नथूच्या आत्याचा पुतण्या. आपल्या काकीचा भाचा दूरच्या मराठी मुलुखात मिठाईचं दुकान चालवतो एवढं त्याला माहीत होतं. त्यानं नथूला कधीं डोळ्यानीं पाहिलं नव्हतं. आपल्या काकीचा भाचा आपल्या घरीं पाहुणा म्हणून आला याचा त्याला फार आनंद झाला. त्यानं नथूचं मोठ्या प्रेमानं स्वागत केलं. नात्यातलीं माणसं भेटलीं म्हणून नथूलाहि फार आनंद झाला. दुर्गा त्याच्याच वयाचा होता. स्वभावानं आनंदी आणि मनमोकळा दिसला. नथूला वाटलं, दोन दिवस राहिल्यावर आपलं मनोगत त्याच्याजवळ सांगता येईल.

दुर्गाचं दुकान लहान होतं. दुकानाला लागूनच असलेली बिऱ्हाडाची जागाहि लहान होती. रसोई बनाविण्याचा छोटासा ओटा, मोरीचा आडोसा, आणि जेमतेम दोन तीन थाळ्या मांडता येतील एवढी मोकळी जागा, अशा थाटाच्या सैपाकघराला लागून अर्ध्या खणाची एक अंधारी खोली आणि बाहेर एक छोटीशी पडवी—एवढ्याच जागेत दुर्गाचा संसार मांडलेला होता. दुर्गाचा थोरला काका म्हणजे नथूच्या आतेचा नवरा म्हातारपणीं आंधळा झाला होता. तो पडवींतल्या खाटेवर पडलेला असे.

दुर्गाची बायको कौसल्या सदा घरकामात गुंतलेली असे, दुर्गा अष्टौप्रहर बाहेरच्या दुकानात बसलेला असे. कौसल्याच्या हातची रसोई नथूला फार रुचकर आणि मिष्ट वाटली. जेवता जेवता त्यानं तारीफहि केली. पण ती ऐकून दुर्गाला काहीं फारसं बर वाटल नसाव असा नथूला संशय आला. किंबहुना दोन दिवसानंतर त्याला असहि वाटू लागल, कीं दुर्गाच कौसल्याकडे फारस लक्ष नसाव.

त्यानं पाहिल तो दुर्गाच्या मनाचा ओढा घरच्यापेक्षा बाहेरच अधिक होता. सुगंधी तेलाच्या आणि अत्तराच्या त्याच्या दुकानात चंगीभंगी दोस्ताचीच बैठक नेहमी असे. त्याच्या गप्पादेखील चंगीभंगीपणाच्याच असत. नथून पाथरीला आयुष्य घालविल होत तालमीच्या आणि कुस्तींच्या षोकात; वाह्यात्पणा त्यान कधीं केला नव्हता. चटोरपणाच्या गप्पा सुरू झाल्या कीं त्याच्या मनात येई, त्याना म्हणाव... पण तो मनाशीं विचार करी, आपण चार दिवसाचे पाहुणे, कशाला जास्त खोलात शिरा !... तो मुकाट्यान बसे. दुर्गा रात्रीचा बाहेर गेला कीं दुकानातच टाकलेल्या पथारीवर तो पडून राही. मनाशीं एवढाच विचार करी, की ' उद्या रामप्रसादचा ठावठिकाणा दुर्गाला विचारावा, जम्नाची चौकशी करावी, आपल्या मनातला हेतु दुर्गाला सागावा .. '

तिसऱ्या दिवशीं रात्रीं जेवण आटपल्यावर कपडे घालतां घालता दुर्गान नथूला विचारल, " भाई, तू काय करणार ? "

नथू म्हणाला, " रोजच्यासारखा दुकानात झोंपणार. "

दुर्गा हसून म्हणाला, " दुकानांत झोप लागते का चांगली ? "

" हा, अत्तराच्या घमघमाटानं भरलेल्या जागेत झोप येण काय मुष्किल आहे ? "

" खर विचारशील तर फार मुष्किल आहे ! गुलाब, हिना अशासारखे खुषबू नाकात शिरले कीं माणसाच डोकं पागल बनायचाच संभव जास्त. माझ ऐक. झोपतोस कसला घरीं म्हाताऱ्यासारखा ? माझ्याबरोबर चल. "

" कुठें ? "

" अरे कुठें म्हणून काय विचारतोस ? रात्रीची सहल करूं थोडीशी. घाल कपडे. "

इतकं झाल्यावर दुर्गाबरोबर बाहेर पडण नथूला भागच होतं. वाटेंत मोतीबाजाराच्या चौकात दुर्गाचे दोन दोस्त त्याना मिळाले. त्यानीं मनगटात मोतियाचे गेंदेबाज गजरे घातले होते, आणखी गजरे पुड्यात बांधून घेतले होते. दुर्गा आणि नथू भेटल्यावर त्याना मनगटात घालण्यासाठीं त्यानीं गजरे दिले अशल्या शौकाची नथूला सवय नव्हती. तो म्हणाला, " नको नको ". दुर्गानं गजरे त्याच्या मनगटात चढविले आणि म्हटल, " अरे भाई, ही तर आमच्या देशाची रीत आहे ! " त्याच्या दोघा दोस्तापैकीं एकान गाण्याची लकेर मारली. " रितु बसत की नऊ बहार । आई रितु बसत की । ".. मोतीबाजारच्या चौकातून त्या तिघाबरोबर नथू चालू लागला .

नथून पुन्हा दुर्गाला हळूच विचारल " कुठें चाललों आपण ? "

दुर्गान त्याचा हात दाबला आणि म्हटल, "कुठे कुठे बस कर रे भाई ! चल मुकाट्यान. "

एका गल्लीच्या कोपऱ्यापाशीं पोचल्यावर दुर्गा एकदम थबकून उभा राहिला आणि आपल्या दोघा दोस्तापैकीं एकाला म्हणाला, " ये क्या गगा ? इकडे कुठें आम्हाला घेऊन चाललास तू ? ही तर सुतारगल्ली न ? रामप्रसादच मकान तर पानगल्लींत आहे ! "

गगा दुर्गाच्या पाठीवर थाप मारून म्हणाला, " हा. रामप्रशाद राहतो पानगल्लींत, आपण चाललो आहोत सुतारगल्लींत. पण तुझी मिजास बिघडायसारख काय झाल यात ? चल ! " त्यानं दुर्गाच्या खांद्याला धरून ढकलल्यासारख केलं.

खांद्यावरचा त्याचा हात झटकून जरा घुश्शान दुर्गा म्हणाला, " नहीं भाई, ऐसा नहीं हो सकता ! रामप्रसादकडे घेऊन जायच तूं कबूल केल होतंस आणि म्हणून तर मी आमच्या मेहमानाला आग्रह करून बरोबर घेतलं ! " त्यान नथूकडे नजर टाकली. "तुझ्या बोलण्यावरून माझी अशी कल्पना झाली, की आज रात्रीं काही तरी विशेष मजा मिळेल. रामप्रसादच नाव फार दिवस ऐकत होतों मी आणि त्याच्या घरीं घेऊन जाणारं कुणी भेटेल काय म्हणून शोधात होतों. तू म्हणालास ' होईल इंतजाम. ' दूर देशाहून हा माझा सगेवाला पहिल्यादाच माझ्या घरीं आला. त्यान खूष

होऊन जाव अशी मजा त्याला देता येईल असं मला वाटल. तो नको नको म्हणत असताना त्याला बरोबर घेऊन आलो. आणि आता तू म्हणतोस सुतार गल्लींत जाऊ या ! नही, ऐसा नही हो सकता ! ''

गगानं त्याच्या खांद्यावर पुन्हा हात ठेवला आणि म्हटल, '' अरे भाई रामप्रसादच मकान म्हणजे काय ह्या शहरातील एकच परीस्तान आहे ? दुसरी पुष्कळ चांगलीं ठिकाण आहेत. जिथे आपण चाललो आहोत तिथे चल आणि बघ तरी—''

मान हालवून दुर्गा म्हणाला, '' नही नही. माझ्या सगेवाल्याच्या खुशीसाठीं रामप्रसादच्याच मकानावर जायला हव. ''

'' अरे, पण रामप्रसादचा सवाल कितीचा आहे माहीत आहे तुला ? फार मस्तवाल झाला आहे तो गेल्या सालीं सिंधमधून आणि पंजाबमधून आलेले निर्वासित आपल्या या शहरात घुसले त्यात बेकार होते, फकीर होते, तसे कुबेरहि होते त्याना पैशाचा तोटा नव्हता. त्याच्या पैशान खाराबादची जुनी घडी पार उसकटून गेली पैसा मिळविण्याचे नवे मार्ग लोकाना दिसले अनेकाची नजर फिरली, दानत सरली. रामप्रसादन रगड पैसा मिळविला गेल्या वर्षभरात आता त्याची भाषा फार मस्तीची झाली आहे. आता त्याचा सवाल पूर्वीचा राहिला नाहीं फार बढलाय् ! ''

'' बढलाय् ? किती ? '' दुर्गान आपल्या खिशातून नोटा काढल्या, एक, दो, तीन अशा दहा मोजून दाखविल्या आणि तो म्हणाला, '' यापेक्षा मोठा तर नाही ना रामप्रसादचा सवाल ? चल तर पानगल्लीकडे. माझ्या सगेवाल्याला नेईन तर अशाच ठिकाणीं नेईन, की हयातभर त्याला याद राहावी. समजलास, गगा ? या सुतारगल्लींत नाहीं शिरणार मी. रामप्रसादकडे घेऊन चल आम्हाला. ''

गगा म्हणाला, '' अच्छा भाई, मेहमानासाठीं पैसे खर्चायची तुझी तयारी असल्यास माझ काय जातय् ? चलो, पानगल्ली चलो. ''

'' आता कस बोललास ! '' दुर्गान गगाच्या पाठीवर थाप मारली. नथूच्या डाव्या दंडातून आपला उजवा हात अडकवून तो त्याला म्हणाला,

" चलीये नथूभैय्या, चलीये न ! असा काय उभा राहिलास एखाद्या पुतळ्यासारखा ? "

नथू खरोखरच एखाद्या पुतळ्यासारखा जागच्या जागीं उभा राहिला होता. दुर्गाचं आणि गंगाचं संभाषण ऐकून तो चकित होऊन गेला होता. हे रंगेल गडी कसले बेत करीत होते ते त्याला समजत होतं; त्याची संगत पुरे झाली असं त्याला वाटत होतं. त्यांच्या संभाषणात रामप्रसादचं नाव निघालेलं ऐकून त्याच्या मनाचं आश्चर्य आणखीच वाढलं होतं.

रामप्रसाद ! तें नाव ऐकताक्षणींच त्याच्या मनात आलं होतं, ' ज्याला भेटायसाठी शेकडो मैलांची मुशाफरी करून मी आलों तोच हा रामप्रसाद असेल काय ? ' त्याचं मन शंका घेई, ' छे, तो कसा असेल ! ' गूज-गडच्या मित्रानं सांगितलेल्या हकीगतीवरून जम्नाचा बाप रामप्रसाद धनलोभी असला तरी चांगला संसारी माणूस होता. जम्नाचं लग्न लावून देता देता तीन हजार रुपये मिळविण्याचा त्याचा इरादा होता; पण अशा रीतीनं पैसा करूं पाहणारे पुष्कळ मुलींचे बाप असतात. रामप्रसाद खानदान शरीफ माणूस होता याबद्दल शंका घेण्याचं कांहीं कारण नव्हतं...

दुर्गा आणि गंगा यांचं संभाषण ज्या रामप्रसादबद्दल चाललं होतं तो जम्नाचा बाप असणं कसं शक्य होतं ? दुनिया इतकी खराब झाली होती काय ? नाहीं ! नाहीं ! ! पानगल्लींतला हा रामप्रसाद वेगळाच माणूस असला पाहिजे... परंतु नथूला पुन्हा वाटे, ' आणि हा रामप्रसाद वेगळा नसला म्हणजे ? ज्याचा ठावठिकाणा आपण दुर्गाला विचारणार आहोंत व ज्याच्याकडे जाऊन आपण जम्नाला मागणी घालणार आहोत, तोच रामप्रसाद हा असला म्हणजे... ? नाहीं, नाहीं ! तो कसा असेल... ? पण असेलहि ! त्याचा काय नेम... ? नसेल तर बरं होईल ! जो हेतु मनाशीं धरून आपण इतक्या दूर आलों तो शाबूत राहील... पण असेल तर— ? तर काय, जम्नाशीं लग्न करण्याच्या आपल्या हेतूचा चक्काचूरच होईल... ? पण जम्नाचा बाप आणि हा रामप्रसाद एकच असेल तर तें आपल्याला लवकर निश्चित कळलं तर फार बरं होईल. हा संशय नको. संदिग्धपणा नको !...

मनांतल्या अशा विचारानीं भारावलेल्या अवस्थेत नथू खरोखरच पुतळ्यामारखा जागच्या जागीं उभा राहिला होता. त्याला वाटत होतं, नको याची संगत ! नको याच्याबरोबर पानगल्लींत जाणं ! पण त्याला असंहि वाटत होत, की एकदा सोक्षमोक्ष करून घेतलेला बरा. हा कोण रामप्रसाद आहे ते एकदा पाहिलेल बर ! दुर्गाबरोबर जाव हेंच बर ! उलटसुलट विचारानीं नथूचं मन हेलकावे खात होत. जावं ! जाऊ नये ! जाव ! जाऊ नये !

त्याचा दंड खेचून दुर्गा म्हणाला, "नथूभैय्या, अरे तुझं पाऊल रेंगाळतं कशासाठीं ? चल ! "

नथू त्याच्याबरोबर चालूं लागला.

रामप्रसादचं मकान पानगल्लीच्या टोंकाशीं होतं. दार बंद होतं. आंतून कुणी तरी विचारलं, "कोण आहे."

गगान उत्तर दिलं. " मैं हूॅं, रामप्रसादजी. "

" हा, हा " रामप्रसादनं म्हटल. काहीं वेळानं दरवाजा उघडला गेला. रामप्रसाद म्हणाला, " आइये, आइये ! " त्यानं दरवाजाला पुन्हां अडसर घातला, आणि मंडळींना एका अवघड जिन्यानं माडीवर नेलं.

खोलींत गाद्या-तक्क्याची बैठक होती. एकच दिवा लागलेला होता. रामप्रसादनं बटनं दाबून आणखी दोन दिवे लावले. मंडळींना आरामशीर बसण्याची विनंति केली. गंगा बसला नाहीं. उभ्याउभ्याच त्यानं रामप्रसादशीं कुजबूज केली. हसत हसत नजरेन नथूकडे इशारा केला. रामप्रसादन नथूकडे पाहिलं, हास्य केल, आणि म्हटल, " ठीक आहे. " गगान दुर्गाजवळ येऊन दहादहाच्या पांच नोटा घेतल्या आणि त्या रामप्रसादच्या हातावर ठेवल्या.

रामप्रसादन सर्व मंडळींना उद्देशून विचारलं, " काय घेणार आपण ? सोडा ? सरबत ? "

दुर्गा गादीवर बसला होता तो उठून म्हणाला, " नको, कांहीं नको आम्हाला. आम्ही दोन घटका चक्कर टाकून येतों. " नथूकडे बोट दाखवून तो म्हणाला, " आता हे तुमचे मेहमान. काय सरबराई करायची असेल ती यांची करा. "

४

रामप्रसाद म्हणाला, " सरबराई ? अरे तुमचे मेहमान असे खूष होतील कीं काहीं पुसू नका ! आमची सरबराई अशी तशी नाहीं, एकदम फस्ट क्लास ! "

" अच्छा नथूभय्या, आम्ही दोन घटकानीं येतो तुला न्यायला– " दुर्गा म्हणाला, आणि मग तो व त्याचे दोस्त जिन्याकडे वळलेसुद्धा !

जो प्रकार घडत होता त्याचा अर्थ नथूला कळत होता, त्याची त्याला किळस येत होती, शरम वाटत होती. त्याच्या मनात येत होतं, जागचं उठावं, दुर्गाला आणि त्याच्या दोस्ताला धक्के मारावे आणि धूम ठोकावी. परतु तो जगाचा हालला नाहीं...त्याच मन सारख म्हणत होत, होऊन जाऊं दे एकदा सोक्षमोक्ष ! हा रामप्रसादचा म्हणजेच जम्नाचा बाप आहे कीं काय त्याचा निकाल एकदा लागू दे ! हाच तो असेल तर ती एक फार भयकर गोष्ट म्हणावी लागेल. पण कितीहि भयंकर असली तरी तिला एकदा सरळ नजर द्यायला हवी. इथून निघून जाण्यात अर्थ नाहीं, इथेंच बसून राहिल पाहिजे ! आपल्या नशिबाची परीक्षा पाहिली पाहिजे ! नशिबाची आणि पैशाच्या लोभान दुनिया किती पागल झाली आहे त्याची....

दुर्गा आणि त्याचे दोस्त जिन्याकडे वळलेले त्याला दिसले जिन्यावरून खाली जाताना त्याचे जूते वाजले. रामप्रसाद त्याच्या मागं गेला. त्यान दरवाजा उघडून दिला आणि पुन्हा लावला त्याचा आवाज त्यान ऐकला. तो उठला नाहीं. गादीवर जागच्या जागीं बसून राहिला !...

रामप्रसाद परत माडींत आला. त्यान नथूकडे हसून पाहिल. " थोडस सरबत घ्याल ना ?" त्यान पुन्हा विचारल, " कोणत सरबत आपल्याला आवडतं सागा, म्हणजे जम्नाच्या हातीं पाठवून देतो " नथूच्या उत्तरासाठीं तो त्याच्यापुढें उभा राहिला.

नथूनं त्याच्याकडे रोखून पाहिल आणि म्हटल, " मला सरबत नको, काही नको; मी विचारतों त्याच उत्तर द्या."

रामप्रसादाची चर्या आश्चर्य वाटल्यासारखी झाली. पण तो हसून हृणाला, " विचारा."

" जम्ना म्हणजे आपली मुलगी का ? "

" हा. "

" पहिल्या बायकोची ? "

" हा "

" तिच लग्न करणार होता तुम्ही ? "

" हा "

" मग तिच आयुष्य बरबाद करणारी ही काय गोष्ट चालविली आहे तुम्हीं ? "

रामप्रसादन नथूकडे क्षणभर नुसतं पाहिलं. मग तो तुच्छतेनं म्हणाला, " कोण म्हणतो तिचं आयुष्य मीं बरबाद केल? जम्नाला प्रारभीं तस वाटल, पण आता तुम्हीच विचारा तिला काय वाटत ते ती मजेंत आहे! आम्ही मजेत आहोत. पैसा खूप मिळतो ! "

नथूला वाटल, या पाजी बापाला खूप शिव्या द्याव्या ! झोडपावं ! लाथानीं तुडवावं !

पण तितक्यात आतून जम्नाचा आवाज ऐकूं आला, " पिताजी ! कौन है ? "

रामप्रसादनं उत्तर दिलं, " हां बेटी ! बाहर आ ! "

दुसऱ्याच क्षणीं शेजारच्या खोलीच्या दारात जम्ना उभी राहिलेली दिसली ! ..

नथू क्षणभर तिचं रूप न्याहाळीत राहिला ! मग त्यानं सुस्कारा सोडला आणि रामप्रसादकडे पाहून तो म्हणाला, " जम्नाच लग्न तुम्ही करणार आहात अशी बातमी मला कळली होती, तुम्ही किती पैसे मागता तेहि मला कळलं होतं. तीन हजार रुपये घेऊनच मी आलों होतों. "

रामप्रसाद तुच्छतेनं हसून बोलला, " तीन हजार? हुं : ! काय करता तीन हजाराला ? या पोरीचा ब्याह करून दिला असता तर एकदा तीन हजार रुपये मिळाले असते; पण जास्त काय मिळालं असतं? उलट आता तिची दर महिन्याची कमाई दीड दोन हजार रुपयांची आहे. ज्या जमिनींत पैशाच पीक हमेश भरमाप निघत ती जमीन कायमची कुणा तरी एकाला तीन हजाराला देऊन टाकली असती तर मी पागल ठरलों असतों ! "

नथूनं एकदम विचारलं, " आणि आता ? "

" आता?" रामप्रसाद म्हणाला, " आता वीस पचवीस हजाराची माया माझ्याजवळ आहे. परमेश्वराची कृपा अशीच राहिली तर लखपति होईन !"

त्या क्षणींच्या सतप्त चिडलेल्या अवस्थेतहि रामप्रसादच्या तोंडचे ' ईश्वराची कृपा ' हे शब्द ऐकून नथूला हसू आल. पोटच्या मुलीला नायकीण बनवून पैसा करणारा हा पाजी बापहि आपल्या धद्याची भरभराट ईश्वराच्या कृपेनं होत आहे अस मानीत होता !

रामप्रसाद जम्नाकडे वळून म्हणाला, " बेटी, आ ! मेहमान तुझी वाट पाहात आहेत: मी जातो."

रामप्रसाद खोलीच्या दाराकडे जाऊ लागला ! जम्ना पाऊल पुढे टाकू लागली ! मग मात्र नथूला बसून राहवेना...

रामप्रसादच्या जम्नाशीं लग्न लावण्यासाठीं सारी जिंदगी विकून टाकूनच तो आला होता ! आणि ती जम्ना आता या स्वरूपात त्याच्याकडे पावल टाकीत जवळ येत होती ! जिची आयुष्याभर कायमची सोबत मिळविण्यासाठी तो आला होता, ती जम्ना पैशासाठी कुणालाहि रात्रीची घटकाभर सोबत देणारी बनली होती !... पवित्र जन्मगाठीसाठीं तो आला होता; इथें फक्त घटकेची रगेल गाठ पडत होती ! पैशान सार पावित्र्य आणि मागल्य उध्वस्त झाल्याचं दृश्य तो बघत होता. दुनियेंत पावित्र्याला किंमत उरली नव्हती , पैशाच्या मापानं साऱ्या गोष्टी मोजल्या जात होत्या ! त्याला वाटल, ' रामप्रसाद, ही जम्ना, आणि त्याच्यातला मनुष्यपणा नाहीस करणारं जें जें म्हणून असेल त्याचा विध्वंस करावा ! चुराडा करावा !...'

परतु त्यान आपला सताप आवरला. " रामप्रसाद, ह्या ठिकाणीं मला आता एक क्षणभरदेखील थाबायचं नाहीं." फक्त एवढेच शब्द त्यान उच्चारले. तो गादीवरून उठला. जिन्याच्या पायऱ्या उतरू लागला...

माडींत रामप्रसाद आणि जम्ना दोघंहि हसलीं. त्याच्या हसण्याचा आवाज त्याच्या कानावर आला. त्यानं धाड्कन् दरवाजा उघडला. घराच्या पायऱ्या उतरून तो रस्त्यान झपाझप निघाला.

सकाळीं दहा वाजण्याचा सुमार होता. रोजच्याप्रमाणे दर पाच मिनिटानीं लोकल गाड्या चर्चगेटच्या स्टेशनावर येऊन थडकत होत्या. परतु त्या गाड्यानी येणाऱ्या उपनगरातील लोकाचे थवेच्या थवे चर्चगेटच्या स्टेशनावर उतरल्यावर कचेऱ्याकडे जाणाऱ्या रस्त्याला लागण्याऐवजीं उलट दिशेच्या रस्त्याकडे, रोजच्याहूनही अधिक घाईन आणि उत्साहान धावत होते. अशा लोकाचा केवढा तरी मोठा लोंढा त्या रस्त्यात साठला होता. लोकाची ती गर्दी वाढत होती, पुढें सरकत होती, थोडी कमी झाल्यासारखी दिसत होती, पुन्हा वाढत होती. जो तो वेगान पुढे सरकत होता, इतराना धक्के देत होता, वाट काढीत होता, उच्च आवाजात बोलत होता. सगळ्याना ब्रॅबर्न स्टेडियमकडे जाण्याची घाई झाली होती. दुसरा कसोटी सामना त्या मैदानावर चालू होता चाळीस हजार स्त्रीपुरुषानीं मैदानाभोवतालचे स्टॅड्स आधींच भरून टाकले होते. हजारों लोक आत घुसण्यासाठीं धावपळ करीत होते चर्चगटच्या लगतचा रुद रस्ता लोकानीं नुसता फुलून गेला होता. त्याच्या आरोळ्यानीं हवा भरून राहिली होती !

‘ एशियाटिक ’ नावाच्या एका मोठ्या रेस्टॉरटच्या बाहेर फरसबद फूटपाथवर गर्दीच्या लोंढ्यापासून किंचित् दूर काशिनाथ उभा होता. त्याच्या अगावर मळकट कपडे होते, केस अस्ताव्यस्त होते, दाढी वाढलेली होती. बेकार माणसाचा वेष आणि चेहरा जसा असावा तसा त्याचा होता. कित्येक दिवस तो कामधद्यावाचून राहिलेला होता. भरपूर जेवण त्याला मिळालं नव्हत, त्याच्या खिशात दिडकी नव्हती, नोकरीची भिक्षा मागून मागून त्याचे पाय दुखत होते अर्धवट उपाशी रहाव लागल्यामुळें तो थकला होता, कुणाच्या तरी खोलीत अग दुमडून कशा तरी रात्री काढल्यामुळें त्याचे खोल झालेले डोळे लाल झाले होते आणि दुखत होते .. असा हा सुमारे तीस वर्षाचा काशिनाथ फरशीवर उभा राहून अगावरून जाणाऱ्या गर्दीकडे बघत होता. ज्या रेस्टॉरटकडे त्याची पाठ होती त्यातून चहापाणी मारून बाहेर पडणारे, झोक नोक पोषाख केलेले लोक गर्दीत मिसळलेले त्याला दिसत होते. बटाट्याचे काप, चिवडा, केळी,

चिकी, पानपट्टी विकणाऱ्या लोकांचे आवाज त्याच्या कानीं पडत होते. गर्दीतून घुसमटणारे स्त्रीपुरुष ताजा स्कोअर एकमेकांना विचारीत होते, सांगत होते, ते त्याला एकू येत होतं. खाऊन पिऊन ढेकरा देणारी, सामना बघण्यासाठीं जीव टाकून धावणारी दुनिया एखाद्या फुगलेल्या नदीसारखी चहूबाजूनीं वाहताना पाहून त्याचा चेहरा अधिकाधिक कडवट होत होता. तो कडवटपणा वाढविणाऱ्या आठवणी त्याच्या मनात गर्दी करीत होत्या. हायस्कुलमध्ये असताना उत्तम खेळाडू म्हणून तो नावाजला होता. क्रिकेटच शील्ड मिळविणाऱ्या टीमचा तो कप्तान होता. कितीदां तरी मोठ्या धडाडीनं खेळून त्यानं चांगल्या धावा केल्या होत्या सर्वांनीं भाकित केलं होतं कीं काशिनाथ पुढे मोठा क्रिकेटर होणार. त्याची स्वतःचीही त्या वेळेस तीच एक महत्त्वाकांक्षा होती. एक दिवस ब्रेबर्न विकेटवर भारतसंघातून खेळल्याचीं स्वप्नं त्याला पडलीं होतीं. पण परिस्थितीनं त्याला जागं केलं होतं. आणि जागेपणीं त्याला दिसलं तें एवढंच कीं त्याचा बाप एकाएकीं मेला होता, मॅट्रिक न होता त्याला शाळा सोडावी लागली होती. ज्या धंद्यात तो जन्मला तो सुतारकीचा धंदा त्याला करावा लागला होता .. या आठवणींनीं त्याचा चेहरा आणखीच कडू केला. अंगावरून जाणाऱ्या त्या गर्दीकडे पाहून तो म्हणाला, ' अरे तुमच्यापेक्षा क्रिकेट मला जास्त कळतंय्, त्या खेळाची गोडी मला अधिक आहे. सामना पाहण्यासाठा माझा ही जीव घाबरा होत आहे. पण ...पण... ' त्याचे दोन्ही हात खिशात गेले उजव्या खिशात जुना मळकट रुमाल होता, डाव्या खिशात चार पाच विड्या आणि संपत आलेली काड्याची पेटी होती. सामन्याच्या सगळ्यांत स्वस्त दराच्या तिकिटाला दोन रुपये दोन आणे पडत होते. आज सामन्याला विलक्षण अटीतटीचा रंग आला होता लोकांचा भयंकर आवडता खेळाडू आणि भारतसंघाचा कप्तान ' बिहारी ' आज खेळणार होता. त्याचं शतक होणार होतं. असा सामना पुन्हा पहायला मिळणार नव्हता. हजारो लोक वेडे होऊन धावत होते तें उगीच नव्हे. पण ज्यांना हातात बॅट कशी धरायची तें–देखील माहीत नाहीं असे पानपट्टीचा तोबरा तोंडात घालून चघळणारे ढेरपोटे पुरुष, आणि त्यांच्याबरोबर लगा लगा चालणाऱ्या नटलेल्या,

थटलेल्या कुरुप पोरी आजचा खेळ पहाणार होत्या. आणि ज्यान शाळेच्या टीमच नायकत्व केलं तो काशिनाथ बेकार अवस्थेत कडू चेहरा करून फूटपाथवर उभा होता ! चोरी केल्यावाचून काहीं त्याला सामना पाह्यला मिळण्यासारखा नव्हता ...

हा विचार मनात आल्याबरोबर काशिनाथ दचकला. चोरी ! त्यानं ती कधीं केली नव्हती. बेकारीच दुःख भोगताना त्याच्या मनात कितीदा आल होत कीं चोरी करून तुरुगात जाव तिथे गेल्यावर जाड भरड का होईना पण दोन वेळां अन्न मिळेल, व कामधद्याची भिक्षा मागण्याचा वनवास सपेल. परतु त्याच्या सुशिक्षित मनाला तो विचार पटला नव्हता. त्यान कधीं चोरी केली नव्हती चोरीची कल्पना त्याच्या मनात येताच तो दचकला ... पण क्षणभरच त्याच्या मनात आल, काय हरकत आहे ? ...चोरी करायला काय हरकत आहे ? ... मागच्या पुढच्या गर्दीतून आवाज उठत होते 'किती धावा ?' 'किती स्कोअर ?' 'किती तिकिट ?' ... काशिनाथच्या मनात आवाज उठत होते 'काय हरकत आहे ?' 'काय हरकत आहे ?' ... त्याच्या अंगावरून जाणाऱ्या स्त्री-पुरुषाकडे तो एकदम निराळ्या नजरेन बघू लागला. कुणाच्या खिशात सहज हात घालता येईल तें तो पाहू लागला जे कधीं त्यान केल नव्हत ते करण्याच्या कल्पनेनं त्याच अत:करण धडधडत होत पण चोरीच्या हेतून त्याची नजर भिरभिरत होती. त्या चमत्कारिक अवस्थेच्या ताणान आपण मूर्च्छा येऊन पडणार अस काशिनाथला वाटल...

पण तितक्यात चार सहा पोरींचा एक घोळका त्याच्या उजव्या बाजूकडून येत असलेला त्याला दिसला चिमण्यासारखी चिव चिव करीत त्या पोरी त्याच्या अंगाला जवळ जवळ भिडल्या. सुगधाचे दरवळ त्यान हुगले. त्याचे मंजुळ शब्द ऐकले. त्याच्या अगावरून त्या किंचित् पुढें गेल्या. काशिनाथचे डोळे एकदम मोठे झाले. एक पोरगी आपल्या हातातली पर्स मारे ऐटींत फिरवीत होती. ती पर्स होती त्याहूनही दसपट आकाराची काशिनाथच्या डोळ्याना दिसली. त्याला वाटलं, ती पर्स एकेका गिरकीबरोबर ओरडत आहे 'काय हरकत आहे ?' 'काय हरकत आहे ?' त्याचे डोळे इतके फाकले कीं जणू डोळ्याच्या खोल खाचांतून त्याची

बुबुळं बाहेर पडूं पहात होतीं.. असा अर्धा क्षण गेला असेल. मग एकदम काशिनाथचीं पावलं पुढे पडलीं. त्याच्या हातानीं एक झडप मारली. त्या काळ्या पोरीची पाढरी शुभ्र पर्स काशिनाथच्या हातीं अलगत आली. त्यान एकदम धूम ठोकली. ' अगबाई ! चोर ! चोर ! ' अशा नाजुक आरोळ्या उठल्या, त्या पाठीमागच्या बाजूनं त्याच्या कानावर काहीं वेळ आल्या. पण त्या त्यानं धड ऐकल्या नाहींत. तो एक प्रकारच्या बेहोषींत होता...

त्याची बेहोषी सपली तेव्हा त्याच्या कानावर आरोळ्याच पडत होत्या. परंतु त्या किती निराळ्या प्रकारच्या होत्या ! आणि तो स्वतः किती निराळ्या ठिकाणीं, किती निराळ्या चेहऱ्यान बसला होता ! घटका दोन घटकापूर्वीं हमरस्त्याच्या कोपऱ्यावर, हॉटेलपुढच्या फरसबंद वाटेवर उमा राहिलेला उपाशी पोटी, दाढी वाढलेला, कडू आणि किंचित् क्रूर चर्येचा बेकार काशिनाथ तो हाच म्हणून कुणी त्याला ओळखल नसत. आता तो उपाशी नव्हता, त्याची दाढी वाढलेली नव्हती, त्याचा खिसा रिकामा नव्हता, त्याची चर्या क्रूर आणि कडू नव्हती. त्या पोरीची पर्स हातीं आल्याबरोबर तो धूम ठोकून पळाला होता, व एका रेस्टॉरंटमध्यें घुसून कोपऱ्यातल्या एकीकडच्या टेबलापुढें जाऊन बसला होता. त्यानं पर्स घाईन उघडली होती. तिच्यातले पैसे मोजले होते. पाच रुपयाच्या चार नोटा आणि काहीं नाणीं त्यान खिशांत कोंबलीं होती. पावडर, लिपस्टिक दुसऱ्या खिशांत घातलीं होती. पर्समधे एक लहानसं इंग्रजी पत्र सापडलं ते घाईनं वाचलं होतं—

" प्रिय शाता,

तूं तीस रुपये पाठविलेस ते पोचले. किती कष्ट करून आणि केवढा त्याग करून तू हे पैसे पाठविलेस हें मनात आल कीं माझी मला लाज वाटते. मनात येतें कीं मी एक नालायक बाप आहे. फार फार दुःख होतं मला. पण काय करूं ? तुझ्या आईला हॉस्पिटलमध्यें पोचविण तर भाग होत. माझ्या जवळ तर दिडकी नव्हती. पण आता तुझी आई बरी होईल. तू इकडे येण्याचा त्रास घेऊं नकोस. आणि काळजी करू नकोस...'

काशिनाथनं तें पत्र काहीं वेळ तसच हातांत धरलं होतं. त्याच्या डोळयांत एकदम आसव आलीं होतीं. जिची पर्स आपण लांबवली ती एक छचोर, उनाड कॉलेज तरुणी असेल ही त्याची कल्पना चुकीची होती तर! ती एक फार चागली मुलगी होती. बापाच्या संसाराला हातभार लावण्यासाठीं नोकरी करणारी! आईवर ममता करणारी! उद्योगी, सालस, प्रेमळ! आसव पुसता पुसता त्याला वाटलं, धावत परत जावं, त्या मुलीला शोधून काढावी, तिची पर्स जशीच्या तशी तिला परत द्यावी...पण तितक्यात वेटर त्याच्याजवळ आला. त्याच्याकडे पहाताच त्याच्या विचाराची दिशा बदलली. त्यान खूप पदार्थ मागविले, आणि खाना केला. ती पर्स हळूच टेबलाखालीं टाकून तो उठला, हॉटेलच्या बाहेर पडला, एका सलूनमध्यें शिरला. त्यानं दाढी करून घेतली, केसाला सुवासिक तेल लावून घेतलं, भरपूर 'वॉश' घेतला. आता सगळयात स्वस्त तिकिट काढण्याची त्याला गरज नव्हती. तीन रुपये बारा आण्याच तिकिट त्यान काढल होत. तो आत जाऊन चागल्या जागीं आरामशीर बसला होता. आता त्याच्या कानावर ज्या आरोळ्या येत होत्या त्या किती निराळ्या होत्या! समोरच्या बाजूस दूर अतरावर मैदानाच्या दोन कोपऱ्यात मोठ-मोठे दोन फलक होते. त्यावरील आकड्याकडे त्यानं पाहिल. मधोमध हिरवळीवर खेळत असलेल्या तेरा खेळाडूकडे आणि दोघा अपायरकडे पाहिल. बिहारीचा खेळ अजून आटपला आहे कीं तो अजून खेळायचा आहे याचा बोध त्याला चटकन होईना. शेजारच्या कुणा तरी माणसाला विचारावं अस त्याच्या मनात आल. तितक्यात त्याच्या उजव्या अंगाकडून त्याला शब्द ऐकूं आले, 'शाते! ए शाते! ही लता काय म्हणते तें ऐक तरी–' तें ऐकतांच काशिनाथ एकदम चमकला. शांते? म्हणजे ज्या मुलीची पर्स त्यान चोरली होती ती मुलगी इथें त्याच्याजवळच बसलेली होती? त्यानं झटकन उजव्या बाजूस जवळ बसलेल्या व्यक्तीकडे पाहिल. त्या काळया मुलीला त्यान ओळखलं. जिची पर्स त्यानं लांबविली होती ती शान्ताच ती होती! तिचे पैसे चोरून तो आतां तिच्याच शेजारीं सामना बघत बसला होता. तिचे पैसे त्याच्या खिशात होते! तिची पावडर, तिची लिपस्टिक, आणि तिच्या प्रेमळ

पित्याचं ते हृदयस्पर्शी पत्रही ! या क्षणीं तिच्या बिचारीच्या मनात कोणते विचार येत असतील ? जे पैसे त्यानं चोरले ते कदाचित् ती आपल्या दुखणाईत आईसाठीं पुन्हा पाठवणार असेल. निदान त्या पैशाची तिला स्वतःला फार गरज असेल. काशिनाथच्या मनात येऊं लागल—पण मनात काहीं येऊ न देण्याच त्यान ठरविल. दुनिया अशीच अजब आहे, तो स्वतःशीं म्हणाला. कठोरपणा केल्यावाचून या दुनियेत टिकाव लागत नाहीं ! मनाला बिलगू पहाणारा दुबळेपणा त्यानं झटकून दूर केला. अगदीं सराईत बेरडाला साजेलशा सहजपणान त्यान शान्ताकडे पाहिल, आणि हसून विचारल—

"बिहारी अजून खेळायचा आहे ना ?"

ती हसली आणि म्हणाली, "तर ! बिहारी अजून खेळायचा आहे. ही विकेट पडली कीं तोच येणार खेळायला. तो बघा बसला आहे पॅड्स बांधून, हातात बॅट घेऊन अगदीं तयारींत."

"असं का ! कुठें बर ?"

"त्या तिथे. सी सी. आयच्या गॅलरीखालीं, बाऊंडरीच्या रेषेपलीकडे, सावलींत वेताच्या खुर्च्या दिसताहेत ना—" तिन डावा हात उच केला तेव्हा तिचा खादा काशिनाथाच्या खाद्याला लागला. तिची नजर त्याच्या नजरेला भिडली. तिच मनमोकळ स्नेहपूर्ण हास्य त्याच्या अंतःकरणाला जाऊन भिडल. त्याच्या सर्वांगातून रोमाचाची धार सळ्कन उठून गेली.

स्वतःचा गोंधळ लपविण्यासाठीं काहीं तरी बोलायला हव म्हणून तो म्हणाला, "त्या तिथें म्हणता, पण मला नीट दिसत नाहीं. माझी दृष्टि जरा अधू आहे."

"अस होय ? थाबा, तुम्हांला बायनॉक्युलर देते. ए लता ! तुझा बायनॉक्युलर दे पाहूं जरा." तिन आपल्या मैत्रिणीच्या हातून बायनॉक्युलर घेतला आणि काशिनाथकडे वळून म्हटलं. "हा घ्या."

"थॅंक यू" काशिनाथ म्हणाला. त्याच्या मनात आलं, यापेक्षां मेलेलं काय वाईट ? त्यान बायनॉक्युलर डोळ्यांना लावला, पण अतर नीट जमवून घेऊन बिहारीला पाहण्याची त्याची इच्छा त्या क्षणीं मावळली होती. त्यानं बायनॉक्युलर आपल्या डोळ्यावर टेकला होता. पण त्याची नजरच

जागेवर नव्हती. तो पहात नव्हता. आपल्याच विचारात गढून गेला होता ...

यापेक्षा मेलेलं काय वाईट? ...खरच मेलेल काय वाईट?...

बेकारीच्या हालअपेष्टा सोसताना त्याच्या मनात चोरी करण्याचा विचार जसा कित्येक वेळा आला होता तसाच दुसराही एक विचार कधीं कधीं आला होता. तो विचार आत्महत्त्या करण्याचा. मरणाला कवटाळण्याचा. आयुष्याच्या रस्त्यावरून कराव्या लागणाऱ्या खडतर वाटाचालीचा शेवट करण्याचा. जगण्याच ओझ एका हिसड्यात डोक्यावरून दूर टाकण्याचा!..

दुर्बिणींतून नीट न्याहाळून पहाण्याऐवजीं तो मनाशीं म्हणू लागला एवढा हा सामना पाहून घरीं गेल कीं विश्राति घ्यायची. बस झाली ही धडपड! उपाशीं रहावं लागल तरी हरकत नाहीं, वणवण हिंडाव लागल तरी हरकत नाहीं, पण दुष्कर्म करायच नाहीं, बापाच नाव खराब करायच नाहीं, आणि ते खराब न करता जस जगता येईल तस जगायच, स्वतःच्या आयुष्याचा भार डोक्यावर वहायचा? वर्षांनुवर्षं सोसला हा जुलूम! वागविला डोक्यावर हा भार!...पण आता पुरे झाल...एवढा सामना पाहून घरीं गेल कीं—

"दिसला ना तुम्हाला बिहारी?"

शान्ताचे ते शब्द ऐकताच काशिनाथ भानावर आला. "हो! हो! दिसला ना" असं म्हणून त्यानं चटकन् बायनॉक्युलरच्या दोन नळ्याच्या मधोमधची फिरकी फिरवून अतर जमवून घेतलं. खुर्चीवर बसलेल्या बिहारीची आकृति त्याला एकदम स्पष्ट दिसली. शान्ताला उद्देशून तो म्हणाला, "अगदीं छान दिसतय ह". तो आणखी निरखून पाहू लागला. सुंदर सुदर साड्या नेसलेल्या तीन चार तरुण स्त्रिया बिहारीजवळ आल्या होत्या व स्वाक्षरीसाठीं वह्या पुढे करीत होत्या. बिहारी खुर्चीतल्या खुर्चीत पुढे झुकून त्याच्याशीं काहीं तरी बोलत होता. अगदीं नजीक असल्याप्रमाणें स्पष्ट दिसणाऱ्या त्या दृश्याकडे काशिनाथ बघत राहिला ...

त्या नटलेल्या थटलेल्या श्रीमंताच्या पोरी आपापल्या वह्यात बिहारीची स्वाक्षरी घेऊन हसत खिदळत दूर झाल्या, आणि बिहारी पुन्हा आपल्या जागीं स्वस्थ बसला. त्यान पायावर पॅड्स बाधल्या होत्या. दोन गुडघ्याच्या

मधोमध खुर्चीला टेकून त्यान आपली बॅट ठेवली होती. बॅटिंगच्या वेळेस घालावयाचे हातमोजे त्यान बॅटीला अडकविले होते. मैदानाच्या मध्यभागीं बॅटिंग करीत असलेल्या दोघा खेळाडूंपैकीं एखादा बाद झाला कीं खेळण्याची पाळी त्याच्यावर येणार होती. तो उठणार होता. बॅट आणि मोजे हातात घेऊन खेळण्याच्या पट्टीकडे हलके हलके पावल टाकीत निघणार होता. त्याला पहाताच चाळीस पन्नास हजार लोक टाळ्याचा गजर करणार होते त्याच्या नावाचा जयघोष हवेत घुमणार होता...

आणि बरोबर याच गोष्टीचा त्याला आता कंटाळा आला होता. जबाबदारीच आणि लोकप्रियतेच हें ओझ त्याला आता नकोस झाल होतं! विकेट पडली कीं खेळण्याचो पाळी त्याच्यावर येणार असल्यामुळे खुर्चींवर बसल्या बसल्या खेळाकडे त्यान लक्ष द्यायला हव होत. प्रतिपक्षाच्या गोलदाजाचे चेंडू कसे पडत आहेत, आणि खेळण्याची पाळी आल्यावर ते चेंडू कसे फोडून काढले पाहिजेत त्याकडे त्यान अगदीं डोळ्यात तेल घालून लक्ष द्यायला हव होत. परतु तें त्याला करता येत नव्हतं. त्याला वाटत होतं, डोळे गच्च मिटावे आणि खुशाल झोप घ्यावी. त्याला विलक्षण थकवा आला होता. कीर्तीच्या रस्त्यावरची ही वाटचाल त्याला अगदीं असह्य आणि नकोशी झाली होती. ती एकदाची केव्हा सपविता येईल असं त्याला झाल होत. त्याच्या मनात येत होत, या रस्त्याला मी लागलों तरी कशाला ? केव्हा लागलों ? कसा लागलों ?...

त्याला काही गोष्टी स्पष्ट आठवत होत्या, काहीं अधुकपणान. परंतु आपल्या हायस्कूलतर्फे महत्त्वाची मोठी क्रिकेट मॅच तो केव्हा खेळला व त्या मॅचमधल्या कामगिरीन त्याच्या आयुष्याचा रस्ता कसा ठरविला त्याबद्दलची त्याची आठवण स्पष्ट होती. शाळेतल्या अभ्यासाकडे त्याच फारस लक्ष कधींच नव्हत. एका सस्थानिकाना स्वतःची बडी टीम तयार करण्याची लहर लागली होती, बिहारीचा खेळ पाहून ते खूष झाले होते, त्यानीं त्याला आश्रय दिला होता. तो पुण्यात, मुबईत जाऊन मोठाले सामने खेळला होता, आपल्या कौशल्यानं चमकला होता, उदयोन्मुख ताऱ्यांत त्याची गणना झाली होती. क्रिकेट हाच त्याचा व्यवसाय ठरला होता. भारत संघाबरोबर तो इंग्लंडला गेला होता. ऑस्ट्रेलियात गेला होता.

मोठी कामगिरी बजावून आणि सन्मान मिळवून तो परत आला होता. आता भारत संघाचा तो एक मोठा आधार होऊन बसला होता. प्रत्येक मोठा सामना त्याच्यावर अवलंबून असावा, त्याचा खेळ झाला तर भारत संघाची अब्रू रहावी, तो बाद झाला कीं धावांचा दुष्काळ पडावा, असं होत राहिलं होतं. त्यानं शतक फडकाविलं कीं हजारो लोकांनीं टाळ्यांचे प्रचंड गजर करावे, त्याच्या धावा झाल्या नाहींत कीं संघाची बाजू कोलमडावी, असं होत राहिलं होतं. त्याची लोकप्रियता वाढली होती. जबाबदारी त्याहून वाढली होती महत्त्वाच्या सामन्यांत त्याला कधीं बेफिकीरीनं खेळायला मिळालं नव्हतं. सदा जबाबदारी! सदा ओझं! स्वतःचं नाव आणि मोठेपणा कायम राखण्याचा जुलूम! आणि महत्त्वाच्या सामन्यावाचून त्याच्या आयुष्याचे किती थोडे दिवस जात होते. स्वदेशातला मोसम संपला कीं लॅंकेशायर लीगमधले सामने खेळण्यासाठीं इंग्लंडला जायचं, ते आटपले कीं स्वदेशात परत येऊन मोठाले सामने खेळायचे, पुन्हा लॅंकेशायर, पुन्हा हिंदुस्थान! खूप धावा करायच्या! चांगल्या विकेट्स घ्यायच्या! सरासरीसाठीं जीव टाकायचा! जबाबदारींत कधीं ढिलाई नाहीं! गंमतीनं खेळण्याची कधीं संधि नाहीं! आजारी पडण्याची सोय नाहीं!...

त्याला कितीदां तरी जोराची इच्छा होई कीं आजारी व्हावं आणि मजेत अंथरुणात पडून राहावं. अंथरुणाशेजारीं आपलीं दोन छोटीं मुलं खेळत असलेलीं पहावीं. आपल्या कपाळावर टेकलेला सुधाचा हात हातात धरून ठेवावा, आणि तिच्याशीं खाजगी संसारी गोष्टी बोलाव्या... तिच्याशीं त्याचं लग्न झालं त्याच सुमारास एक नामांकित क्रिकेटर म्हणून त्याचा लौकिक होऊं लागला होता त्याचं विवाहित जीवन, आणि खेळा-तला मोठेपणा टिकविण्याची जबाबदारी, या दोन गोष्टी एकाच वेळेस सुरू झाल्या होत्या. सुधा त्याची फार लाडकी होती. एका मित्राच्या लग्नात तिला त्यानं प्रथम पाहिली. ती त्याला दिसल्याबरोबर आवडली, व मग तिच्या मामाच्या घरीं हेलपाटे घालून त्यानं तिचं प्रियाराधान केलं. त्या काळात ती जशी होती तशीच अजूनहि होती. निमगोरी, नाजूक एखाद्या बाहुलीसारखी लहान, थोडंच पण फार गोड बोलणारी!...

त्याच्या राहत्या घरीं छोटयाशा बेडरूमधल्या कोपऱ्यातदेखील अर्धा डझन बॅटी उभ्या असत. त्याकडे पाहून सुधा त्याला म्हणे, “ त्या पाहिल्यात का माझ्या सवती ? ”

तिच्या गालावर हळूच टिचकी मारून तो म्हणे, “ चल. काहीं तरी नको बोलूस.’

ती त्याला विचारी, ‘ काहीं तरी कस ? तुम्ही सर्वस्वी माझे आहात काय ? किंबहुना माझ्या वाट्याला किती थोडे येता ? सदा त्याच्या वाट्याला असता ! ” कोपऱ्यात उभ्या केलेल्या, तेल आणि हळद लावून लावून कमावलेल्या, चकचकीत डौलदार बॅटींकडे ती अगदीं मत्सरानं भरलेली नजर टाकी, आणि मग बिहारीकडे पुन्हा पाहून म्हणे “ अ ? सागा कीं.”

क्षणभर त्याची चर्या एखाद्या अपराध्यासारखी होई. पण मग तो हसे. तिच कपाळ कुरवाळून तो म्हणे, “ एक दिवस त्या सगळ्याना टाकून देणार आहे मी. सर्वस्वी तुझा होणार ! ” तिन अविश्वास दाखविण्यासाठीं मान मुरकली कीं तो पुढे म्हणे, “ खोट नाहीं. बघशील तूंच !”

प्रेक्षकात मोठा ओरडा झाला.. बिहारी आपल्या विचारातून जागा झाला. त्याला वाटल, विकेट पडला कीं काय ! त्यान दचकून खुर्चींतल्या खुर्चींत अग सावरल आणि समोर न्याहाळून पाहिल...विकेट पडली नव्हती. धावता धावता बाद होणारा गडी बचावला होता...

बिहारीन सुटकेचा श्वास सोडला. तो खुर्चींत पुन्हा रेलून बसला.. सुधाला त्यानं वारवार सागितलं होतं ते खोट नव्हत. केव्हा तरी घरातल्या साऱ्या बॅटी तो दूर टाकणार होता. शात, विश्रब्ध आयुष्याचा उपभोग घेऊं लागणार होता. त्याच्या जन्मगावच्या परिसारातला एक लहानसा सुदर मळा त्यानं पाहून ठेवला होता. तो विकत घेऊन तिथे तो लहानशी बंगली बाधणार होता. भाजी, फुल, फळं पिकविणार होता, गुरं आणि कोंबड्या बाळगणार होता, विहीर काढणार होता, मोट हाकणार होता, विहीरींत यथेच्छ डुबणार होता, पडस खोकल्यान आजारी होऊन खुशाल अंथरुणात पडून राहण्याची चैन करणार होता ! केव्हा तरी हें सार होणार होतं ! केव्हा

तरी...लौकिकाचा आणि जबाबदारीचा भार वाहून वाहून त्याचे खांदे दुखू लागले होते. डोकं पिचून गेलं होतं. असलाच कोणता तरी मोठा सामना खेळल्यानंतर तो म्हणणार होता, रामराम! मोठेपणानं जगण्याची क्रिया संपविणार होता...

काशिनाथनं अजूनही बायनॉक्युलर डोळ्यांना लावलेला होता. जगण्याच्या भाराला कंटाळलेला एक माणूस तशाच कंटाळलेल्या दुसऱ्या एका माणसाकडे बघत होता. त्याला त्याची कल्पना नव्हती एवढंच. त्याला वाटत होतं आपण एकटेच आयुष्याच्या विचित्र भाराला व जुलमाला कंटाळलेले आहोत! प्रत्येक माणसाची अशीच कल्पना असते. आणि खरी गोष्ट अशी असते कीं सगळेच लोक भाराखालीं शिणलेले, थकलेले, कंटाळलेले असतात!...

तितक्यात मोठा ओरडा झाला.

आता मात्र विकेट खरोखरच पडली होती.

बाद झालेला गडी पॅव्हिलियनकडे परतला. बिहारी आपल्या विचारांतून जागा झाला, खुर्चीतून उठला. बॅट आणि मोजे हातात घेऊन हिरवळीवरून निघाला. टाळ्यांचा खूप मोठा गजर झाला. त्याच्या नावाचा जयघोष त्याला ऐकू आला. तो खेळण्याच्या पट्टीवर पोचला, खेळू लागला. मैदानावरचे हजारो लोक अगदीं स्तब्ध झाले. त्यानं पहिला चारांचा फटका मारला. त्याबरोबर मैदान टाळ्यांनीं पुन्हा दुमदुमून गेलं. बिहारी मनाशीं म्हणाला, चार! अजून शहाण्णव धावा त्याला काढायला हव्या होत्या. त्यानं शतक करायलाच हवं होतं. बैलानं जोखडाखालीं मान देऊन गाडी ओढावी त्याप्रमाणे तो धावा काढू लागला...त्याच्या मनात मात्र सारखं येत होतं, हे ओझं मला कधीं टाकता येईल? लौकिकाचा आणि जबाबदारीचा हा भार केव्हा खाली उतरता येईल? त्याला हे सारं नकोसं झालं होतं! तो मनात थकून गेला होता! तशा अवस्थेतच तो फटके मारीत होता. धावा घेत होता...

त्याचं शतक पुरं झालं. सामना संपेपर्यंत तो नाबाद राहिला. विजयाबद्दलच्या हर्षाच्या आरोळ्या चहूबाजूंनीं उठल्या. लोक जिकडून तिकडून मैदानात घुसले. त्यांनीं बिहारीभोंवतीं वेढा टाकला. कलकलाट करणाऱ्या

आणि अगाशीं लगट करणाऱ्या त्या लोकाचा बिहारीला अगदीं तिटकारा वाटला. त्याला विश्रांति हवी होती. दूर आपल्या जन्मगावीं पळून जावस वाटत होत. सुधाच्या मांडीवर डोकं टेकावस वाटत होत...पण शाबासकी देणाऱ्या लोकाच्या गराड्यात तो सापडला होता. कुणी त्याच्या पाठीवर थापट्या मारीत होते, कुणी हार घालीत होते, कुणी त्याचा हात धरून गदगदा हालवीत होते ! तो सर्वांपासून दूर होऊं पहात होता तितक्यात एक माणूस त्याच्याजवळ आला. त्यान त्याचा हात उचलून घेतला, दोन नोटा आणि काहीं नाणीं त्याच्या हातीं ठेवलीं आणि तो म्हणाला,

"मी एक बेकार दरिद्री माणूस आहे. पण तुमचा चाहता आहे. तुमच्याच गावातल्या एका शाळेच्या टीमचा मी कॅप्टन होतों. तुम्ही दुसऱ्या शाळेत होता. तुम्ही मोठे झालात ! मी लहान राहिलों. अगदीं क्षुद्र राहिलों. तुम्हाला मी काय बक्षीस देऊं ? माझ्याजवळ होत तेवढ दिल " तो किंचित् अडखळला, आणि मग म्हणाला, "जें दिल तेदेखील माझ नव्हतं. पण आता मीच त्याचा मालक आहे. घ्या. नाहीं म्हणूं नका."
त्यान बिहारीची मूठ दाबली. तो हसला आणि परत वळून गर्दींत नाहींसा झाला !

## ३ : ह्या तिच्याच पावलांचा आवाज

वेताच्या खुर्चीवरच्या मऊ रेशमी गादीवर बसून कपाळावर रुळणाऱ्या रेशमासारख्या मऊ चकचकीत झुलपाआडून किलकिल्या डोळ्यांनीं माझ्याकडे बघत तो माझं बोलणं लक्षपूर्वक ऐकत होता, आणि मी मनमोकळेपणानं साऱ्या गोष्टी त्याला नीट समजून सांगत होतो. कारण, सुलभा आज प्रथमच माझ्या घरीं येणार होती, आणि पहिल्या गाठीभेटींतच तिच्यावर माझं आणि माझ्यावर तिचं जसं प्रेम बसलं होतं, तसंच तिचं आणि त्याचं एकमेकावर प्रेम जडावं अशी माझी इच्छा होती. तो फार देखणा होता. शहाणा होता. ती सुंदर होती. भारी ममताळु होती. त्या दोघांची पहिल्या नजरभेटींतच दाट मैत्री जमायला काहींच प्रत्यवाय नव्हता. तथापि, माझ्या शंकेखोर मनाला पुनः पुन्हा वाटे, कीं तिला तो आवडला नाहीं तर? या अलीकडच्या तरुण आणि ऑफिसांत दरमहा एकशेतेरा रुपये मिळवून आर्थिक स्वातंत्र्य उपभोगणाऱ्या मुलींच्या आवडीनिवडी मोठ्या चमत्कारिक असतात. याला पाहताच ती एकदम याच्या गळ्यांत गळा घालील असाहि संभव होता, पण उलट हा दृष्टीस पडताच ती नाराज होईल असाहि संभव होता! आणि हा तरी काय कमी लहरी होता? दीर्घ काळाच्या सहवासानं मला त्याचा स्वभाव पुरता माहीत झाला होता— अथवा खरं म्हणजे असं म्हटलं पाहिजे, कीं हा कुणाबरोबर कसं वागेल त्याचं नक्की भविष्य वर्तविणं अशक्य होतं, ही गोष्ट मला माहीत झाली होती. एखादं माणूस त्याला आवडलं की त्याच्यावर तो एकदम फिदा होत असे; पण जर का त्याच्यावर त्याची मर्जी बसली नाहीं, तर त्याच्याशीं तो कायमचा वाकडेपणा धरीत असे! आणि चमत्कार असा, कीं दोस्तीचं किंवा दुष्मनीचं जे काही नातं तो माणसाशीं जोडीत असे ते तो पहिल्या मुलाखतींतच ठरवीत असे. पहिल्या गाठीभेटींत होणारे त्याचे ग्रह एकदा ठरले की कधीं बदलत नसत! म्हणून, आज सुलभा प्रथम दिसल्याबरोबर तिच्याविषयीं त्याचं मत अनुकूल व्हावं यासाठीं आपण शक्य तितका प्रयत्न केला पाहिजे असं मला वाटत होतं. आणि म्हणूनच उन्हाची कोवळी तिरीप अंगावर घेत स्वारी मोठ्या खुशीतं पडली होती

असं पाहून मी सुलभेबद्दलच्या गोष्टी त्याला सागत होतों. प्रथम प्रथम माझ्या बोलण्याकडे त्यान नीटस लक्ष दिलं नाहीं, पण काहीं वेळान त्याच्या किल-किल्या डोळ्यात वाढलेल्या चमकेवरून मीं तर्क केला, की सुलभेबद्दल माझ्या अतःकरणात कोणत्या मृदु भावना होत्या ते त्याच्या ध्यानात आलं होत आणि मी जे काहीं सागत होतो त्यात त्याला गोडी वाटू लागली होती. हे पाहून मला समाधान झाल्यामुळे अधिकच उत्साहान मीं सुलभेच गुणवर्णन त्याच्याजवळ करू लागलो. तो किलकिल्या, हसऱ्या डोळ्यानीं मझ्याकडे पहात होता. मी बोलत होतो.

माझी आणि सुलभेची पहिली भेट कशी झाली ते जेव्हा मीं त्याला सागितल तेव्हा त्यावर विश्वास ठेवण्यास तयार नसल्याप्रमाणें त्यानं डोळ्याची उघडझाप केली. पण त्याच्या शकेखोरपणाकडे मीं लक्ष दिल नाहीं. माझ्या आणि सुलभेच्या पहिल्या भेटींतील हकीकतच अशी होती, कीं तिच्यावर कुणाचा चट्‌कन् विश्वास बसू नये.

कॉमनवेल्थ क्रिकेट टीम आणि भारत सघ याच्यांतील कसोटीचा दुसरा सामना मुंबईच्या स्टेडियमवर झाला तेव्हा तिची माझी पहिली भेट झाली. स्टेडियमच्या पूर्व बाजूच्या कुप्रसिद्ध स्टॅडमधे मी सामना बघत बसलो होतों. लोकाची अशी काहीं खच्चून गर्दी झाली होती, कीं थर्ड क्लासच्या डब्यात-देखील तशी क्वचितच होत असेल. एकमेकाच्या माड्याना माड्या खेटून, खाद्याला खादे भिडवून—परस्पराची हरकत नसेल तर गळ्यात गळा घालून सामना बघणारीं तीं हजारो माणस एखाद्या सरोवराच्या पृष्ठावर वेली आणि पालापाचोळा तरंगावा त्याप्रमाणें तरगत होतीं. सामन्याला असा काहीं रंग आला होता कीं भारत संघाची एकेक धाव निघाली कीं आम्हा हजारों प्रेक्षकाचीं अतःकरण आनंदानं थरारत होतीं. टाळ्या—शिट्या—आरडाओरडा या गोष्टींना भलता ऊत आला होता. आमच्या सर्वांच्या डोक्यांत उन्मादाचं वारं शिरलं होत. आपल्याकडे कुणी बघेल, आप-ल्याला कुणी हसेल असले विचारच आमच्या कुणाच्या डोक्यात शिल्लक उरले नव्हते. इतकंच नव्हे, तर आपल्या उजव्या—डाव्या बाजूस कोण बसलं आहे त्याचहि भान कुणाला नव्हत—निदान मला तरी नव्हत...

पण इतक्यात मर्चेटची विकेट पडली. आणि जो तो "काय झालं ?"

" कसा आऊट झाला ? " " कुणी विकेट घेतली ? " असे प्रश्न उजव्या डाव्या अगाला बसलेल्या शेजाऱ्याला विचारू लागला. माझ्या डाव्या बाजूकडून हेच प्रश्न मला ऐकू आले. आणि प्रश्नाच उत्तर दिल पाहिजे म्हणून मीं तोंड वळवून पाहिल.

एक अतिशय सुंदर चेहरा माझ्या तोंडाला जवळ जवळ भिडला होता ! कस थोडेसे अस्ताव्यस्त झाल्यामुळे कमीअधिक लांबीच्या झिपऱ्यानीं कान पुरतेच झाकले गेले होते, आणि कपाळाच्या पट्टीवरहि त्याच्या वाकड्या-तिकड्या रेषा उन्हात चमकत होत्या. दोन भुंवयाच्या मधोमध जरा वरच्या बाजूस कुकवाच्या जागीं सोनेरी टिकली चमकत होती. गालावरची पावडर केव्हाच उडून गेली होती. मला प्रश्न विचारताना किंचित् अलग झालेल्या ओठावरचा रग फिक्का झाला होता. पण त्यामुळे ओठ अधिकच मोहक दिसत होते. फिकट ताबूस रगाच्या ओठाच्या सुंदर छोट्या भैरपींतून किंचित पुढच्या ठेवणीचे पण अति शुभ्र दात आपली शोभा दाखवीत होते. हनुवटी घामान किंचित् ओलसर झाली होती. हनुवटीच्या खालीं उघड्या गळ्याकडे नजर झुकविण्याचा मोह मला साहजिकच झाला. पण तितक्यात त्या सुदर ओठाची हालचाल झाली आणि मला पुन्हा प्रश्न ऐकू आला, " कसा आऊट झाला हो ! " त्या स्वरात दुःखाचा कप होता. मीं नजर किंचित् वर करून पाहिल तों तिच्या डोळ्यात आसवंदेखील उभीं राहिलीं होतीं ! माझ्या मनात आल, ' अरे रे ! मर्चेटन आऊट व्हायला नको होत !—'

कुणाच्या बोलिंगवर मर्चेटची विकेट कशी पडली होती ते मीं तिला सागितल आणि तिच दुःख कमी करण्यासाठीं पुढे म्हटल, " मर्चेट गेला म्हणून येवढं काहीं बिघडल नाहीं. अजून खालीं हजारे आहे, दत्ता फडकर आहे, अधिकारी आहे—"

" हो हो. तेहि खरंच म्हणा " अस म्हणत मान हालवून ती हसली. आणि मग गेल्या वर्षीं वेस्ट इंडीज सघाविरुद्ध झालेल्या अखेरच्या कसोटी सामन्यात दत्ता फडकरचा खेळ पाहताना आपल्याला आनंदातिशयान कस रडूं आलं होतं, त्याच्या आठवणी ती सागू लागली.

मीं म्हटलं, " तुम्हाला क्रिकेटचा फार षोक दिसतो. "

ती म्हणाली, " होय."

काहीं वेळान मीं हळूच विचारल, " तुमच्याबरोबर कुणी कस नाहीं?"

ती म्हणाली, " मी आणि माझा मावस भाऊ मिळून आलो होतो; पण या तुफान गर्दीत फाटकातून आत शिरताना तो आणि मी एकमेकापासून दूर ढकलले गेलों. या ईस्ट स्टॅडमधेच तो कुठे तरी असेल. पण कुठें आहे देव जाणे! मॅच सपल्यावर तरी त्याची माझी भेट कशी होणार ?"

तिच्या उद्गारात व्यक्त झालेली चिंता ओळखल्याप्रमाणे मीं चेहरा केला आणि म्हटलं, " नाहीं झाली तर नाहीं!" माझ्या त्या चार शब्दातला सगळा अभिप्राय तिनं ओळखावा अशा अपेक्षेन मीं तिच्याकडे हसत पाहिल.

" ते झाल म्हणा!" असं पुटपुटून तिनं खालीं मान घातली. तिच्या डाव्या कानातील लोलकाचे खडे उन्हात चमकले.

" अमरनाथला का घेत नाहींत हो टीममधे ?" तिन एकदम माझ्याकडे तोंड फिरवून विचारल, " त्याला घ्यायला हव होत अस नाहीं तुम्हाला वाटत ?"

मी फक्त हसलो.

ती पुढें म्हणाली, " जयत म्हणतो याच्यामागं वैयक्तिक हेव्यादाव्याचं राजकारण आहे."

मीं भुवईला आठी घालून विचारल, " जयंत ? कोण जयत ?" क्रिकेटच्या क्षेत्रातील अतर्गत घडामोडींच स्वतःच ज्ञान मिरवून तिच्यावर वजन मारणारा जयत नावाचा कुणी तरुण असावा ही गोष्ट मला मुळींच आवडण्यासारखी नव्हती. " हा जयत कोण ?"

ती म्हणाली, " माझा मावस भाऊ."

मीं मनाशीं म्हटल, मग हरकत नाहीं. माझ्या कपाळावरची आठी नाहींशी झाली. अमरनाथ–प्रकरणाची अगदी ब्रित्तंबातमी मला असल्याप्रमाणे मला जेवढी ऐकीव माहिती होती तेवढी मी तिला सागूं लागलों. माझ्या ज्ञानाविषयीं तिचं मत फार अनुकूल होत असल्याप्रमाणे तिचा चेहरा मला दिसू लागला. हे अमरनाथ–प्रकरण संपल्यानंतर दुसरा कोणता

विषय काढावा त्याचा मी मनाशीं विचार करू लागलो.

तितक्यात आमच्या आजूबाजूस वर आणि खालीं गोंधळ उडाला. वरच्या लोकानीं खालच्या लोकावर आणि खालच्यानीं वरच्यावर कागदी बाण, जाहिरातींचे गोळे, केळ्याच्या आणि नारिंगांच्या साली आणि क्वचित् पादत्राणहि फेकावयास सुरुवात केली! ईस्ट स्टँडमध्ये असल्या चकमकी वरचेवर होत होत्या. या चकमकींना जे काय निमित्त घडत असे ते कुणालाहि कळत नसे. अफाट गर्दीच्या कुठल्या तरी भागात कुणाची तरी बोलाचाली होत असे, बोलण्याच पर्यवसान किरकोळ मारामारींत होत असे, आणि उभय पक्षात आजूबाजूचे इतर लोक सामील होऊन त्या वैयक्तिक कुरबुरीला सार्वजनिक युद्धाच स्वरूप येत असे. ही दंगलीची लाट उसळली की स्टॅंडच्या दगडी पायऱ्यावर बसलेले सगळे लोक उठून उभे राहात आणि आरडाओरडा करू लागत. आत्ताहि असाच प्रकार घडला एकदम सारीं माणस उठून उभी राहिलीं, आरोळ्या ऐकूं येऊ लागल्या, कागदाचा आणि सालींचा पाऊस पडू लागला. ती घाबरून उभी राहिली. तिचं रक्षण करण्यासाठीं एखाद्या मध्ययुगीन वीराप्रमाणे मीहि उठून उभा राहिलो आणि कागदाचा अथवा सालींचा स्पर्श तिला होऊं नये म्हणून दोन्ही हाताच्या ढाली हवेत फिरवू लागलो दोनचार मिनिटात ते हातघाईच युद्ध समाप्त झाल. उभे राहिलेले लोक खालीं बसले. आम्ही दोघहि बसलो पण बसल्याबरोबर डावा तळवा तोंडावर टेकून ती मोठ्यादा उद्गारली, “अय्या! हे काय!”

मीं विचारल, “काय झालं?”

ती म्हणाली, “माझ्या चपला गेल्या!” अस म्हणताना ती खालीं वाकून पायरीवरची आजूबाजूची जागा बावरलेल्या नजरेन शोधीत होती. तिन वर पाहिल आणि उजवा पजा डमरू वाजविल्याप्रमाणे हालवून रडव्या स्वरात ती म्हणाली, “चपला गेल्या! पायाला मुंग्या आल्या होत्या म्हणून पाय चोळण्यासाठी मीं त्या काढून इथे पायाजवळच ठेवल्या होत्या—”

“होय? मग त्या कुणीं तरी भिरकावून दिल्या खास! आयत्याच मिळाल्या त्याला—”

ती म्हणाली, " हसता काय? कालच नव्या घेतल्या होत्या मीं. आतां आई चांगलीच खरडपट्टी काढणार माझी. चपला हरवण्याबद्दल आधीच माझी दुष्कीर्ति झालेली आहे घरात!"

माझ्या भावी पत्नीच्या अंगीं कोणकोणते गुण असले तर ती मला प्रिय होईल याचा पुष्कळदा मीं विचार केलेला होता. वारंवार चपला हरवणारी मुलगी मला फार गोड वाटेल ही पूर्वी कधीं ध्यानात न आलेली गोष्ट माझ्या एकदम ध्यानात आली. मी तिच्याकडे पाहून हसत राहिलो!

" हसता काय हो ?" ती पुन्हा म्हणाली, परतु दुसऱ्याच क्षणीं ती स्वतःच हसली. मात्र मी आपल्या हसण्यानं तिला हसविलं होत, हे आपण पर्यायान कबूल करीत आहोत हें तिच्या ध्यानात येताच तिन पुन्हा रडवा स्वर काढला आणि म्हटल, " आता अनवाणी पायानीं घरीं जायच कसं ?"

मीं म्हटल, " जायला हव असं कोण म्हणतं ?"

" म्हणजे काय ? " ओठावर दोन बोट टेकून तिन विचारल, " मी घरीं जाऊच नको म्हणता ?"

" घरीं जायला हव हो, पण अनवाणी जायला हवं अस कुणी सांगितल आहे ?"

" मग काय, माझा काका घेऊन देणार आहे मला नव्या चपला ?"

" काकाशिवाय दुसरीं माणस नाहींत की काय जगात ?"

मी कोणत्या अर्थानं बोललों होतों ते तिच्या लक्षात आल्याबरोबर ती एकदम गोरीमोरी झाली आणि " छे, मी नाहीं!" अस काहीं तरी पुटपुटत तिनं मान खालीं केली.

सुलभाची आणि माझी पहिली भेट अशा प्रकारें झाली. या भेटीचा मीं भरपूर फायदा घेतला. माझ्या प्रियाराधनाच्या मार्गांत कोणताच अडथळा नव्हता. 'प्रीतीची वाट काटेरी' या उक्तीचा मला अगर सुलभाला मुळींच अनुभव आला नाहीं. आम्ही दोघं ज्या वाटेन गेलों तिच्यावर बहुतांशीं समुद्रतीरावरची मऊ रेती पसरलेली होती. येवढच की या मऊ वाटेवरून हिंडतानादेखील सुलभाला चार वेळा नव्या चपला घेऊन देण मला भाग पडलं होतं!

अखेर एक दिवस असा आला की मीं तिला म्हटल, "सुलभा, एकमेकाच्या अशा बाहेर गाठीभेटी घेण आता पुरे झाल. तूं माझ्या घरीं आलं पाहिजेस; आणि मग केव्हा तरी मला तू आपल्या घरीं घेऊन गेलं पाहिजेस." सुलभान पहिल्यादा तीन चार वेळां आढेवेढे घेतले होते. पण अखेर काल तिन माझ म्हणणं कबूल केलं होत. आज कचेरींतून सुटल्यावर ती माझ्या घरीं येणार होती, चहा घेणार होती, माझ घर पाहणार होती; मी माझ्या आईशीं तिची ओळख करून देणार होतो. सुलभाला माझ्या घरातील साऱ्या गोष्टी आवडाव्या अशी माझी फार इच्छा होती...

"अशी माझी सुलभा आहे, समजलास?" त्याच्या चमकदार पिंगट डोळ्याकडे पहात मीं म्हटल, "तू तिच्याशीं दोस्ती केली पाहिजेस! तिन आपण होऊन तुला बिस्किट दिल नाहीं तरी तिच्यावर तू गुरगुरता कामा नये. तू टुणकन् उडी मारून तिच्या मांडीवर बसशील आणि ती कदाचित् तुला लोटून खाली टाकील. पण तुझी भीति वाटल्यामुळे ती अस करील. तिचा स्वभाव वाईट आहे म्हणून नव्हे!...

रॉबीन आपले केसाळ कान वर खालीं हालविले, आपली पातळ गुलाबी जीभ तोंडावरून दोन चारदा फिरविली, आणि जणु मीं त्याच्याजवळ पंजा मागितल्याप्रमाणे उजव्या पजाची हालचाल केली. "तुझ सार म्हणणं मला मान्य आहे!" असच जणु तो म्हणाला. मीं चट्कन् त्याचा मुका घेतला आणि त्याला थोपटीत म्हटल, "किती शहाणा आहे माझा रॉबी!" इतक्यात भितीवरच्या घड्याळात साडेपाचाचा ठोका पडला आणि मी खोलीबाहेर धावलो. आमच्या घरासमोरच बसचा टप्पा होता, त्या टप्प्यावर साडेपाच वाजता उभ राहायच मीं सुलभाला वचन दिलं होतं.

बसच्या दारात उभी राहिलेली सुलभा दिसल्याबरोबर बस पुरती थाबण्याचीहि वाट न पाहता मीं पुढें होऊन तिला जवळ जवळ ओढूनच खाली उतरविल. "आलें कीं नाहीं?" तिन विचारलं. "आलीस" अस म्हणून मी माझ्या हातांतला तिचा हात दाबला. ती विलक्षण आनदात होती. उजव्या हातातील बॅग गरगर फिरवीत माझ्याबरोबर जिन्याच्या पायऱ्या चढतां चढतां ती म्हणाली, "असा दोन टप्प्यांचा छोटासा जिना मला फार आवडतो."

" होय ? " मीं हसत विचारलं. शकुन तर चांगला झाला असं माझ्या मनात आलं.

मीं तिला पुढच्या खोलींत नेऊन कोचावर बसविलं, आणि " तूं दमून आली आहेस, आधी चहा घे !" असं तिला म्हणून आईला हाक मारीत मी स्वयंपाक घराकडे धावलो आईनं सारे पदार्थ जय्यत तयार ठेवलेच होते. मी ते ट्रेवर मांडू लागलो. इतक्यात पुढच्या खोलींतून सुलभाची किंकाळी आणि रॉबीचं भुंकणं माझ्या कानावर आलं. मीं ट्रे तसाच टाकला आणि पुढच्या खोलीकडे धावलों !

पाहतो तो सुलभा घामाघूम होऊन थरथर कांपत उभी होती, 'हाड', 'हाड' असं रडव्या आवाजात ओरडत होती, तरवारीचे पट्टे फिरविल्या-प्रमाणें हातातली बॅग फिरवीत होती, आणि रॉबी तिच्या पायापाशीं मागं पुढं करीत भुंकत होता !

" रॉबी ! " मी मोठ्यादा ओरडलों. त्याबरोबर इतका वेळ ताठ उभं धरलेलं आपल्या केसाळ शेपटीचं थोटूक खालीं करून ते गदगदा हालवीत, कान खालीं पाडून तुरुतुरु चालत रॉबी माझ्याकडे आला. मीं त्याला रागावून म्हटलं, "आपल्या खुर्चीवर बैस पाहू, जा." तो खुर्चीकडे गेला, उडी मारून गादीवर बसला. पण पुन्हा त्याच्या मनात काय आलं कोण जाणे, पुन्हा सुलभाकडे पाहून भुंकावयास त्यानं सुरवात केली. " रॉबी ! चूप ! " असं मी ओरडलों.

त्यानं आपल्या पुढच्या दोन पायांत तोंड खुपसलं.

मीं सुलभाला म्हटलं, " तो किती गरीब आहे पाहिलंस ! तूं उगंच भ्यालीस ! "

ती म्हणाली, " उगंच काय ? मी कोचावर बसले होते आणि भिंतीवरचीं चित्रं पाहात होतें. तो एकदम आला आणि टुण्कन् उडी मारून माझ्या मांडीवर बसला. मीं किंकाळी फोडून त्याला लोटून दिलं तेव्हां तो चवताळून माझ्यावर भुंकू लागला. तुमच्या घरीं कुत्रं आहे हें मला माहीत असतं, तर मी तुमच्या घरीं कधीं आलेच नसतें ! तुम्हीं मला आधी कां नाहीं सांगितलंत ? "

मीं म्हटलं, " आधी काय सांगायचं त्यांत ? काय वाघ आहे, का

सिंह आहे, का पिसाळलेला आहे, का चावरा आहे? इतकं गोजिरवाणं लहानसं कुत्रं, आणि त्याला भितेस ती काय? मला तर वाटलं होतं, रॉबी तुला फार आवडेल आणि तू त्याचं कौतुक करशील?"

ती म्हणाली, "कुत्रं उदराएवढं असलं तरी त्याचं मला भय वाटतं. माणसं कुत्रीं पाळतात कशासाठीं हेंच कळत नाहीं मला!"

मीं पुढें होऊन तिचे खांदे धरले आणि म्हटलं, "बरं आता कोचावर नीट बैस पाहूं. तो अगदीं चूपचाप बसला आहे बघ. मी चहा घेऊन येतों. बैस."

ती म्हणाली, "मी एकटी नाहीं इथें बसणार तो मोकळा असताना. त्याला आधीं साखळीनं बांधून ठेवा पाहू!

मीं म्हटलं, "साखळीनं बांधू? पण त्याची साखळी आहे कुठे? आम्ही त्याला कधींच बांधीत नाहीं. तो नेहमीं घरात मोकळाच हिंडत असतो."

"नशीब माझं!" ती कपाळाला हात लावून म्हणाली, "मग आता असं करा, त्याला आपल्याबरोबर सैंपाकघरात घेऊन जा किंवा मी तरी तुमच्याबरोबर सैंपाकघरात येते."

"इतकी काय भितेस ग?" मीं जरा चिडून म्हटलं.

ती उलट चिडून म्हणाली, "भित्री भित्री म्हणूं नका मला! मी भित्री नाहीं, मला कुत्र्याच्या जातीचाच तिटकारा आहे.

"शाबास!" असा उद्‌गार काढून मी हसलों.

ती अधिकच चिडून म्हणाली, "असं हसूं नका. तुमच्या या हसण्याचा मला फार राग येतो."

सुलभाचा असा क्रोधाविष्ट चेहरा माझ्या दृष्टीस प्रथमच पडत होता. मी तिच्याकडे पहात उभा राहिलो व माझ्या घरीं प्रथमच होणाऱ्या तिच्या आगमनाचा हा समारंभ रुसण्या फुगण्यानं बिघडूं नये यासाठीं काय करावं याचा मनाशीं विचार करूं लागलो. माझा लाडका कुत्रा रॉबी व माझी लाडकी प्रेयसी सुलभा याच्यात विरोध उत्पन्न होईल अशी मला कल्पना नव्हती. पण त्या विरोधाचा प्रसंग प्रत्यक्ष येऊन ठेपला होता, आणि त्या प्रसंगाला भलतंच उग्र स्वरूप येऊ नये यासाठीं युक्तीनं वागणं आवश्यक होतं.

अखेर " ठीक आहे " असं म्हणून मी तिच्या पुढून दूर झालो.

ती चिडक्या स्वरात ओरडली, " अहो, ठीक आहे काय ? तुम्ही पुन्हा मला एकटीला त्या कुत्र्याच्या सगतींत टाकून निघालात की काय ? अहो, अहो–"

पण मीं तिच्या त्या ओरडण्याकडे मुळीच लक्ष दिलं नाही. मी रॉबीला त्याच्या खुर्चीवरून खस्‌कन्‌ ओढल, माझ्या निजायच्या खोलींत नेऊन पलंगावर ठेवल, बाहेर येऊन खोलीच दार ओढून घेतल आणि कडी लावली. सुलभाकडे पाहून मी हसलो, पण माझ्या मनातला कडूपणा माझ्या शब्दात व्यक्त झालाच. "आता तरी तुझा जीव भाड्यात पडेल की नाहीं ?" अस सुलभाला विचारताना माझ्या तोंडावरच हसण नाहीस होऊन कपाळाला आठी पडली असावी. कारण, माझ्याकडे पाहून सुलभान तोंड वाकड केल, आणि मर्जी बिनसल्याप्रमाण मानेला झटका देऊन ती तिरप्या नजरेन डाव्या हाताच्या खिडकीकडे पाहू लागली.

परतु तिच्याकडे अधिक लक्ष देण्याच्या लहरींत मी नव्हतो. मी पाठ फिरवून सैपाकघरात गेलो आणि फराळाच व चहाच सामान घेऊन बाहेर आलों.

फराळाचे चार घास आणि चहाचे दोन घोट पोटात गेल्यावर आमचा दोघाचा परस्परावरचा रुसवा नाहींसा झाला, आणि नेहमींप्रमाण आमच्या गुजगोष्टी सुरू झाल्या.

पण तितक्यात निजावयाच्या खोलींतुन रॉबीच्या भुकण्याचे आणि विव्हळण्याचे आवाज आणि त्यानं दारावर आपल्या चिमुकल्या पजानीं खराखरा ओरखाडे काढण्यास सुरवात केली त्याचेहि आवाज कानावर येऊ लागले.

चहाचा कप बशीवर आपटीत सुलभा म्हणाली, " काय हा त्रास ! ही कटकट थाबवा कीं !"

मीं म्हटल, " तूं तिकडे लक्ष देऊं नकोस. "

" अहो, लक्ष देऊं नको कसं ? कानठळ्या बसेपर्यंत ते तिकडे कोकलत आहे. या गोंगाटात तुमच बोलण मी ऐकू कस आणि मी तुमच्याशीं बोलूं तरी कशी ? ही कटकट थांबवा पाहू आधीं !"

मीं तिला म्हटल, " हे बघ सुलभा, त्याच भुकणं थाबवायचा एकच मार्ग आहे. मी त्याला बाहेर काढतो आणि माझ्या माडीवर घेऊन बसतो. तो तुझ्याकडे पाहाणार नाहीं आणि तूहि त्याच्याकडे पाहू नकोस. उगीच भ्यायच सोडून दे जरा !" अस म्हणता म्हणता मीं चटकन पुढे वाकून तिचा डावा गाल माझ्या हातान थापटला, हसतहसत उठलो, रॉबीला घेऊन आलो, व डाव्या हाताच्या कुशींत त्याला धरून त्याचे छोटे मखमली कान मायेन पकडून मीं त्याला म्हटलं, " रॉबी, गडबड करायची नाहीं. निमूट बसायच ह !" त्यान हुगण्याचे फुसफुस आवाज करीत आपलं ओल काळ नाक माझ्या गालावर फिरविल. ते पाहून सुलभा उद्गारली, " ईऽऽ! शिः!" पण मीं तिला म्हटलं, " किती गरीब आहे. पाहिलस?" तिन नमस्कार केल्याप्रमाणं हात जोडले व म्हटल, " तुम्हीच बघा. मला नका दाखवू !"

पण तिच्या या नापसतीच्या उद्गाराकडे मीं लक्ष दिल नाहीं. रॉबी माझ्या माडीवर गुपचुप बसला तर त्याच्या सहवासाला तिची हरकत नव्हती, येवढा तिचा समझोता झाला तरी पुष्कळ झाल अस मला वाटत होत. माझ्या आणि सुलभाच्या गप्पा पुन्हा चालू झाल्या. रॉबीच लक्ष सुलभाकडे जाऊच नये म्हणून मी त्याच्या तोंडात मारखी बिस्किट भरीत होतों. बिघडलेली हवा हलके हलके निवळली आणि सुलभाच्या आगमनाचा समारभ अगदीच 'फेल' गेला नाही अशा समाधानान मी मोठ्या आनंदात तिच्याशीं बोलत राहिलों. काहीं वेळान मीं मझ्या आईला बाहेर बोलावून घेतल. तिच आणि सुलभाच चागलच मेतकूट जमल हे पाहून मला फार बर वाटल. सुलभा जातें म्हणाली तेव्हा कुकवाचा डबा आणून तिच्या पुढे करण्यासाठीं आई स्वैपाकघरात गेली.

" तुझा वेळ मजेत गेला ना?" आम्ही दोघं उठून एकमेकासमोर उभीं राहिलों तेव्हा मीं सुलभाला विचारल.

" होऽ!" असा उद्गार काढताना तिन भारी गोड हेल काढला आणि मान तिरपी केली, व आनदाच्या वेळेस हातातील बॅग गरगर फिरविण्याच्या तिच्या नेहमींच्या सवयीप्रमाणें ती बॅग फिरवू लागली.

मीं रॉबीला एखाद्या लहान मुलाप्रमाणे डाव्या कुशींत धरलं होतं.

सुलभा हातातल्या बॅगेनं आपल्याला खिजवते आहे असं त्याला वाटलं कीं काय कोण जाणे, त्यानं एकदम मोठ्यांदा भू भू असं केलं आणि मीं त्याला आवरण्याच्या आत त्यानं तिच्या अंगावर झेप घेतली. हवेत फिरणारी तिची बॅग त्यानं अलगद तोंडात पकडली आणि गुरगुरत, भुंकत, बॅगला आडवेतिकडे हिसडे देत तो खोलींतल्या खोलींत सैरावैरा धावू लागला.

" अहो, माझी बॅग ! माझी बॅग ! " असे केविलवाणे उद्‌गार काढून दोन्ही हातांचे पंजे फडफडण्यास सुलभानं सुरवात केली.

मी रॉबीच्या मागं धावू लागलो, पण मला तो काहीं केल्या सांपडेना. आणि अखेर तर कोचापलीकडच्या उंच टेबलामागच्या अरुंद फटींत तो अशा जागीं जाऊन बसला की तिथे माझा हात पोंचणं अशक्य होतं. त्याचं गुरगुरणं आणि बॅगला हिसडे देणं चालूच होतं.

" केलान् मेल्यानं बॅगचा सत्यानाश ! " सुलभा रडतरडत म्हणत होती.

" रॉबी ! रॉबी ! रॉबी ! " असं म्हणत, चुटक्या वाजवीत मी त्याला बोलावीत होतों. पण काहीं केल्या तो आपली जागा सोडीना !

अखेर हा प्रसंग कसा संपला ते माझं मला माहीत !

रॉबीनं सुलभाच्या बॅगची काहीं विशेष नासधूस केली नव्हती, परंतु त्यानं तिच्या—माझ्यांतली गोडी चांगलीच बिघडवून टाकली होती.

दुसऱ्या दिवशीं सुलभा मला म्हणाली, " तें कुत्रं तुमच्या घरात असेल तोंपर्यंत तुमच्या घरात पाऊल टाकायची नाहीं मी ! आपलं लग्न होणं शक्य नाहीं. तुम्हाला मी हवी असेन तर तें कुत्रं नाहीसं करा. तें तुमच्या घरात नाहीं असं सांगायला जेव्हा याल तेव्हाच मी तुमची भेट घेईन ! "

तिला चुचकारायसाठीं मी म्हणूं लागलों, " अग पण — "

ती म्हणाली, " पण नाहीं अन् बीण नाहीं. किंबहुना हाच माझा पण आहे असं समजा ! कुत्र्याच्या मालकाशीं मी कधीं लग्न करणार नाहीं ! "

मी घरीं आलों तो अतिशय दुःखी कष्टी मनानं. माझ्यापुढें मोठा

कठीण पेंचप्रसग उभा राहिला होता. प्रथम पत्नी हयात असताना दुसर लग्न करण अशक्य असावं तद्वत् घरात कुत्रा हयात असताना सुलभाशीं लग्न करण मला अशक्य झालं होत! मला सुलभा हवी होती, रॉबी हवा होता. परतु एकासाठीं दुसऱ्याला सोडल पाहिजे अशा पेंचात मी सापडलों होतों.

तुम्ही म्हणाल, सुलभासारखी बायको मिळवण्यासाठीं कुत्र्याला मुकण्याची पाळी आली, तर मीं त्या गोष्टीस तयार नसाव हें फार मोठ आश्चर्य आहे. परंतु काहीं गोष्टींची तुम्हाला कल्पना नाहीं म्हणून तुम्ही अस म्हणाल. तुम्हाला हे कुठे मीं अजून सागितल आहे कीं मी लढाईवर असताना रॉबीला दीडशे रुपये देऊन मीं विकत घेतलं होतं ? आणि तुम्हाला हे तरी कुठें माहीत आहे कीं ' माल्टीज टेरियर ' जातीचीं कुत्रीं ठेंगणीं, ठुसकीं, भारी देखणीं, रेशमासारख्या मऊ लाब केसाचीं, मायाळु आणि अति हुशार असतात ? आज सहा वर्षं रॉबी माझ्याजवळ आहे. तो माझ्या ताटात जेवतों, कुशींत निजतो. तो माझा इतका लाडका आहे कीं अगदीं अस्सल जातीची, ठेंगणी, ठुसकी बायको त्याला एकदा तरी मिळावी म्हणून मीं सारी मुबई पालथी घातली होती; आणि शेवटीं एकदा मरीन ड्राइव्हवर फिरायला आलेल्या एका मडमेजवळ हुबेहूब रॉबीच्या जातीची कुत्री दिसल्यावर ती ( म्हणजे कुत्री ) रॉबीला एकदा मिळावी म्हणून सरळ त्या मडमेजवळ जाऊन शभर रुपये देऊ केले होते. रॉबीच्या सुखात मीं कधीं तिळमात्र उण पडू दिल नव्हत. आणि तो माझ्यावर इतकी माया करीत असे कीं मी जणू त्याच सर्वस्व होतों. मी त्याला माझ्यापासून दूर केल तर तो प्राणच सोडील याबद्दल मला शका नव्हती.. आणि आता हट्ट सुलभानं पण केला होता कीं ' कुत्र्याच्या मालकाशीं मी कधीं लग्न करणार नाहीं! '... कुणाला सोडाव आणि कुणाला धराव ते मला सुचेना! सोडल तर पळतं, धरल तर चावत ही म्हण कुत्र्याऐवजीं सुलभाच्या बाबतींत माझ्या अनुभवाला येत होती.

रॉबीला घरातून काढल्याखेरीज मला भेटूं नका असं सुलभानं मला सांगितल होतं. पण मी असा कोडगा कीं तिच्या गांठीभेटी घेतच राहिलों. " रॉबी कुत्रा असला तरी तुला वाटतो तसा नाहीं. तो फार शहाणा

आहे, गरीब आहे, ममताळू आहे, तूं वरचेवर आलीस कीं त्याची तुझी दोस्ती होईल " इत्यादि गोष्टी मीं तिला समजावून सांगितल्या. तिला माझी अनुकंपा वाटावी या उद्देशानं रॉबीला दूर केला तर माझी दु:खानं किती केविलवाणी अवस्था होईल, त्याचही वर्णन परोपरीनं मीं तिच्या-जवळ केलं. पण तिचं आपलं एकच पालुपद, " तें कुत्रं घालवा, तर मी तुमच्याशीं लग्न करीन ! "

मीं शेवटीं चिडून म्हटलं, " तुझं माझ्यावर प्रेम नाहीं हेंच खरं ! "

ती चटकन म्हणाली, " माझं पुष्कळ आहे, तुमचंच नाहीं. "

मीं विचारलं, ते कसं ? "

ती म्हणाली, " माझ्यासाठीं यःकश्चित् कुत्रसुद्धा सोडायला तुम्ही तयार नाहीं ! "

मी फणकाऱ्यानं म्हणालो, " तू आपलं नांव बदलून टाक. "

तिनं विचारलं, " म्हणजे काय ? "

मीं म्हटलं, " तू सुलभा नाहींस, दुर्लभा आहेस ! तूं इतकी हट्टी असशील असं वाटलं नव्हतं मला. "

" हा चांगला न्याय ! " ती म्हणाली, " मी हट्टी का कुत्र्याला घराबाहेर काढायला तयार न होणारे तुम्ही हट्टी हो ? "

तिच्या त्या प्रश्नानं मी निरुत्तर झालो आणि घरीं आलो.

रॉबीच्या प्रश्नावर सुलभा कधींहि समेट करणार नाहीं हें आता अगदीं स्पष्ट झाल्यामुळें माझ्या मनात हलके हलके प्रश्न येऊं लागला, मीं तरी इतका हट्ट का करावा ? सुलभाचं म्हणणं मीं का ऐकूं नये ? त्या प्रश्ना-मागोमाग दुसराहि प्रश्न आला, रॉबीला दूर करायचा सगळ्यात उत्तम मार्ग कोणता ? ... रात्रीं अंथरुणावर पडल्या पडल्या मी या प्रश्नाचा विचार करीत होतो. माझ्या मनात आलं, रॉबीला पांजरपोळात नेऊन सोडण्याचं नीच कृत्य तर माझ्या हातून घडणार नाहीं. त्याला कुणाला मोफत देऊन टाकूं लागलों, तर घेणाऱ्याच्या मनात शंका येईल कीं कुत्रं चावरं असलं पाहिजे, त्याच्यात कांहीं तरी खोड असली पाहिजे, म्हणून मालक त्याचा दानधर्म करायला निघाला आहे ! विकायला निघालों तर मात्र त्याला हसत घेणारे कुत्र्याचे षोकीन निघतील, आणि जितकी जास्त

किंमत मी सांगेन तितकी त्याला विकत घेण्याची जास्त उत्सुकता ते दाखवतील. तेव्हा 'कुत्र विकायच आहे' अशी जाहिरात द्यावी हें उत्तम. रॉबी एखाद्या तान्ह्या मुलासारखा मला बिलगला असताना मीं त्याला विकून टाकण्याचे विचार करावेत याची मला भयंकर शरम वाटली. पण मीं मनाशीं विचार केला, या गोष्टीला काहीं इलाज नाही आपल्याला सुलभा हवी आहे ना? मग शरम वाटून घेऊन काय उपयोग? प्रेम म्हटल की बेशरमपणा आलाच.

दुसऱ्या दिवशीं टाइम्समधे मीं जाहिरात दिली. त्या जाहिरातींत रॉबीची अस्सल जात, त्याची उंची, त्याचे रेशमी केस इत्यादींच वर्णन केल, आणि दोनशे रुपये किंमत ठणकावून दिली!

ती जाहिरात प्रसिद्ध झाल्यावर ती कापून घेऊन मीं सुलभाकडे धाडण्यासाठीं एका पाकिटात घातली आणि सोबत चिठी लिहिली—

"प्रिय सुलभा, सोबत एक जाहिरात पाठवीत आहे. तिचा अर्थ तुझ्या ध्यानात येईलच. माझ्याकडे येण्यासाठीं तयार रहा."

तिन उत्तर धाडल—

"तुमचा प्रयत्न स्तुत्य आहे पण तो सफल होऊ द्या, आणि मग मला बोलवा. तुमच कुत्र तुमच्या घरातून कायमचं गेल अशी माझी पुरती खात्री पटल्याशिवाय मी तुमच्याशीं लग्न करणार नाहीं."

तिच ते उत्तर मला अगदीं आवडल नाहीं. माझ्या मनात आल असल्या या चढेल, हट्टी बाईच्या नादान मी माझ्या रॉबीला माझ्यापासून दूर करीत आहे हे काहीं बर नव्हे. माझ मन पालटू लागल! रॉबीला विकत घेऊ पाहणारीं गिऱ्हाइक माझा पत्ता शोधीत माझ्याकडे येऊ लागलीं, त्याना मी उर्मट उत्तर देऊ लागलो.

परंतु एके दिवशीं मी बाहेरून परत आलो आणि पुढच्या खोलींत प्रवेश करून पाहिल तों एक तरुण मुलगी कोचावर बसली होती, आणि तिच्या मांडीवर बसलेल्या रॉबीला ती कुरवाळीत होती. माझ्या आईच्या आणि तिच्या काहीं तरी गप्पा चालल्या होत्या. मला पाहताच ती उठून उभी राहिली, आणि हसली. तेवढ्यात रॉबीन तिचा गळा चाटायला सुरवात केल्यामुळ 'अरे!' अस म्हणून तिन हनुवटी उंच केली. तिचा

तो ‘ अरे ’ शब्द किती गोड होता ! तिच्या स्वरातल्या माधुर्यामुळे ती काळी सावळी आणि जराशा गोबऱ्या नाकाची असूनही ती मला एकदम आवडली !

माझ्या आईनं खुलासा केला, “ या केव्हाच्या येऊन तुझी वाट पहात बसल्या आहेत. गंमत अशी, कीं या दृष्टीस पडल्याबरोबर रॉबीनं त्याच्याशीं दोस्ती केली आहे. त्यांच्याजवळच आहे सारखा. ”

“ होय ? ” असं म्हणून मी हंसलों. “ मग छान झाल कीं ! बसा, बसा तरी. ”

बसल्यावर तिन आपली हकीकत थोडक्यात सागितली. तिचं नाव चपा होतं. तिचा बाप बी. बी. सी. आय. रेल्वेच्या ऑफिसात मोठ्या हुद्यावर होता. तिच घर कुलाब्याला होत. रेल्वे कपनीकडून मिळालेल्या बगल्यात ती रहांत असे. तिला कुत्र्याचा फार षोक होता, पण पाळीन तर सुदर ‘ माल्टीज टेरियर ’ पाळीन अशी प्रतिज्ञा तिनं केली होती. बापाकडून हातखर्चासाठीं मिळणाऱ्या पैशातून तिनं दोनशे रुपये साठविले होते. ते सारे ती आता मला देऊन टाकणार होती . . .

मीं तिला म्हटलं, “मी तुमच्याकडून एक पैसासुद्धा घेणार नाहीं.”

तिनं विचारलं, “ म्हणजे काय ? तुम्हीं तर जाहिरातींत–”

मी म्हणालों, “ जाहिरात गेली खड्ड्यात ! तुमच्यासारख प्रेमळ, षोकी माणूस रॉबीला मिळाल यात मला आनद आहे. तुमच्याशीं रॉबीचा सौदा नाहीं करणार मी !”

चपा खूष होऊन रॉबीला घेऊन गेली.

मीं रॉबीचा विक्रय केलेला नाहीं व चंपासारखी प्रेमळ, हौशी मालकीण त्याला मिळाली या विचारानीं मीदेखील आनंदित झालों होतों.

दुसऱ्या दिवशीं सुलभाला मीं लिहिलं,“ रॉबी घरातून गेला. आता तू केव्हा येतेस बोल !”

तिचं उत्तर आल, “ कुत्रं चागलं कायमचं गेलं आहे असं महिनाभर ठरूं द्या. तवर माझा विश्वास बसणार नाहीं. कुत्र्याच्या पुष्कळ गोष्टी ऐकल्या आहेत मीं.”

तें पत्र वाचून मला सुलभाचा भयकर राग आला. एवढा चढेलपणा

माणसान करावा म्हणजे काय! हिच्यासाठी मीं रॉबीला देऊन टाकलं आणि हिच 'अजून महिनाभर थांबा' आहेच! माझ्या मनात आलं, सुलभाचा चढेलपणा जिरविण्यासाठीं चंपाकडे जावं आणि रॉबीला परत घेऊन यावं.

नंतरच्या दोन दिवसांत हा विचार माझ्या मनात अधिकच जोरानं येऊ लागला. चंपाच्या घरीं जाण्याचा बेत मी मनातल्या मनात सारखा करू लागलो.

पण तिसऱ्या दिवशीं रॉबीची स्वारीच मुळी माझ्या घरीं परत येऊन दाखल झाली!

मी जेवायला बसलो होतो तितक्यात बाहेरच्या दारावर नख खरवडण्याचा आणि भुंकण्याचा आवाज ऐकू आला. मी खरकट्या हातान उठून बाहेर जाऊन दार उघडून पाहतो, तो दाराबाहेर रॉबीची स्वारी उभी!

त्याला चंपा आवडली होती, पण तिच्या घरीं राहायला तो तयार नव्हता!

दुसऱ्या दिवशीं चंपा माझ्या घरीं आली आणि रॉबीला घेऊन गेली.

पण तीन दिवस उलटले नाहींत तोंच रॉबी महाराज पुन्हा माझ्या घरीं येऊन दाखल झाले! चंपान त्याला पुन्हा नेलं.

नंतरच्या दिवसांत हा प्रकार इतक्या वेळा झाला कीं तो एक विनोदाचाच विषय होऊन बसला. चंपा त्याला सोडायला तयार नव्हती. रॉबी तिच्याकडं राहायला तयार नव्हता.

अखेर काल रात्रीं रॉबी पुन्हा परत आला आणि त्याच्या मागोमाग चंपाहि आली तेव्हा मी मोठमोठ्यादा हसू लागलो.

चंपा म्हणाली, "हसतां काय? मी पुन:पुन्हा त्याला न्यायला येतें म्हणून माझी चेष्टा करतां होय? पण खरंच सांगते, त्याच्यावाचून मला अगदीं करमत नाहीं. शप्पथ!"

मीं गांभीर्याचा आव आणून म्हटलं, "मग यातून एकच मार्ग मला दिसतो!"

तिनं विचारलं, "कोणता?"

आज कित्येक दिवस तिच्याशीं जें बोलायचं मी ठरवलं होतं तें बोलण्याचा क्षण आला होता. तो क्षण प्रत्यक्ष आला असं पाहून मीं फार गोंधळून

गेलों. मीं आवढा गिळला आणि धीर एकवटून म्हटल, "हे बघ चपा, तुला त्याच्यावांचून राहवत नाहीं. त्याला माझ्यावाचून राहवत नाहीं. त्याला घेऊन जायसाठीं किती हेलपाटे घालणार तू? तुझ्या घरात तो काहीं टिकायचा नाहीं. मग या घरात तू का नाहीं कायमची येऊन रहात?"

माझ्या त्या बोलण्यान ती चमकली. पण मग तिनं आपले काळे भोर डोळे माझ्याकडे स्थिरपणें लावले. "खरच!" अस मीं पुन्हा हसून म्हटल तेव्हा ती विलक्षण लाजली आणि "चला!" अस म्हणून तिन मुरका मारला.

त्या वेळची तिची चर्या मला अजूनहि स्पष्ट दिसत आहे. "चला!" हा तिचा उद्गार मला आताहि स्पष्ट ऐकू येत आहे. वरवर नकारासारखा वाटणारा, पण वास्तविक पूर्ण रुकाराचा असला गोड उद्गार कसा काढावा तें बायकानाच माहीत. तो चपाच्या तोंडून ऐकल्यापासून मी फार आनदात आहे. आता ती माझ्याकडे आली कीं मी तिला म्हणणार आहे,

"तुझ नाव सुलभा ठेवल तर तें तुला आवडेल का?"

ती विचारील, "का, हेंच नाव का शोधून काढलत?"

मी सागणार आहे, "कुत्र्याच्या नादीं लागून तू मला सहजासहजीं मिळालीस म्हणून!"

हें ऐकून ती मान कशी वेळावते आणि कोणता गोड उद्गार काढते बघू या!...

स्! पण चूप!

चंपा आलीच! हा तिच्याच पावलाचा आवाज!

हमालानं डोक्यावरची सूटकेस आणि वळकटी खालीं टेकली, व तो फडकं झाडीत बाहेरच्या गॅलरींत गेला. दिनून खिशातून पाकीट काढल आणि त्यातली चार आणेली काढून ती हमालाच्या हातावर ठेवण्यासाठीं तोहि गॅलरींत गेला. हमाल पावलीकडे बघून म्हणू लागला, ' दोन बोजे आणले साहेब ! निदान अधेली तर द्याल ' आणि दिनू म्हणूं लागला, ' स्टेशनपासून एका हाकेच्या तर अंतरावर आणल तुला. आणि बोजे काय मोठमोठे होते ? '

त्या दोघाच्या त्या वादविवादाचा निकाल पाहाण्यासाठी मालती थाबली नाहीं. ती आतल्या खोलींत गेली. केव्हा एकदा सपाटून पाणी घेऊन तोंड धुईन असं तिला झाल होतं. चार महिने माहेरीं राहून दिनूकडे परत येण्यासाठीं काल रात्रीं नऊ वाजल्यावासून तिन सबद रात्र खेचाखेचींत बसून जागून काढली होती. तिला उतरवून घेण्यासाठी बोरीबंदर स्टेशनवर दिनू आला होता. तो तिला पहाताच म्हणाला होता, ' काय ग हा तुझा अवतार ? ' रात्रभर वाऱ्यावर उडून उडून कोरडे झालेले केस कसेबसे सावरीत आणि गपागप मिटणारे डोळे कसेबसे उघडे ठेवीत ' होय बाबा ' असं म्हणून मालती हंसली होती. मग माहीमकडे जाणाऱ्या लोकलगाडींत मात्र गर्दी नव्हती. सकाळचा थोडा गार थोडा कढत वारा अगाला लागल्यामुळे तिला थोडीशी हुशारी वाटली होती, आणि तिला माहेरीं पोचवून चार दिवस राहून आलेला व आता चार महिन्यानतर भेटलेला दिनू डब्यात ओळखीच कुणी नाहीं असं पाहून उजवा हात तिच्या अंगाभोंवती लपेटून तिच्या अगदीं जवळ बसला व सारखा बोलत राहिला यामुळे झोपेवाचून काढलेल्या रात्रींचा शीण ती विसरली होती. माहीमला ती खालीं उतरली आणि दिनूच्या हातात हात गुतवून रस्त्यान चालू लागली तेव्हा स्टेशनाबाहेरच तें आगण, एखाद्या चित्रांतल्यासारखी वाटणारीं आगणातलीं तीं झाड, वाद्र्याकडे गेलेला प्रशस्त गुळगुळीत रस्ता, हें चार महिन्यांत न दिसलेलं ओळखीच दृश्य पाहून तिचा शीण आणखीच कमी झाला होता. स्टेशनापासून हाकेच्या अतरावर एका

सिनेमागृहाच्या नजीकच्या बहुतांशीं निर्वासितांनीं भरलेल्या चाळींतल्या अवघ्या दोनच टाचक्या खोल्याच्या ' घरकुला ' त शिरल्याबरोबर तिला एकदम किती बर वाटल होत. परंतु चमत्कार असा कीं ज्या क्षणीं तिला बरं वाटल त्याच क्षणीं रात्रीच्या हालामुळे आलेला शीणही एकदम उफाळून वर आल्यासारखा झाला, आणि केव्हा एकदा खूप पाणी घेऊन हात पाय आणि तोंड धुऊं अस तिला झाल होत. ती एकदम आतल्या खोलींत जाऊन मोरींत उभी राहिली. खिडकींत ठेवलेल्या आरशापुढे उभ राहून पलीकडच्या आवारातल्या म्हशींच्या मोठमोठ्या गोठ्याकडे, शेणकचऱ्याच्या ढिगाकडे, आणि त्या गलिच्छ वस्तींतल्या माणसाच्या व्यवहाराकडे पहात ती केसावरून फणी फिरवीत होती तोंच बाहेरच्या दाराची कडी लागलेली तिला ऐकू आली, व दुसऱ्याच क्षणीं दिनच्या दोन्ही हाताचा विळखा तिच्या अंगाभोंवतीं पडला. तिच तोंड वळवून मुका घेताना दिनू म्हणाला, ' माले ! '

' दिना ! ' अस म्हणून तिन त्याच्या केसावरून हात फिरविला. परतु त्याची मिठी आणखी घट्ट झाली तेव्हा तिला भीति वाटली, आणि ' आधीं चहा करून पिऊ रे ' अस म्हणून तिन युक्तीन त्याला दूर केल. तिच्या एकदम लक्षात आलं कीं आणखी दोन वर्षं तरी मूल नको अस तिनं आणि दिनून ठरविलेल होत, आणि पाळी चुकू नये म्हणून जीं साधन ती वापरीत असे तीं इकडे येताना माहेरीं विसरून ती आली होती ! ही गोष्ट दिनूला सांगावीशी तिला वाटेना. आणि दिनू तर तिला घट्ट जवळ घेण्यासाठीं अगदीं अधीर झाल्यासारखा बोलत व वागत होता. त्याच मन न दुखविता त्याला दूर कस ठेवायच या विचारान मालती मनातल्या मनात अगदीं चटपटून गेली. त्याला जे हव होत तेच तिलाहि हव होत. चार महिन्याच्या ताटातुटीनतर तीदेखील त्याच्यासारखीच अधीर झाली होती. पण—

दिनूच मन न दुखविता त्याला दूर कस ठेवायच या प्रश्नाशीं ती मनातल्या मनात झगडू लागली. चहा पिण झाल्यावर ती त्याला म्हणाली, " घरनं काय काय आणलं तें दाखवतें हा तुला. " कमरेची किल्ली काढून तीं सूटकेसपुढे बसली तेव्हा दिनू म्हणाला, " चार लाडू अन् मूठभर

चिवडा आणला असशील, दुसरं काय?" कुलुपात घातलेली किल्ली परत काढीत मालती म्हणाली " अस का? मग दाखवीत नाहीं तर! आपण सासूबाईंचे फार लाडके जावई आहात महाराज " दिनू म्हणाला, " अस होय ! मग बघू तरी सासूबाईंनीं काय काय धाडलंय ? " " कशाला ? कशाला ! आम्ही चार लाडू अन् मूठभर चिवडा आणला आहे. त्यात काय बघायच ? " अस म्हणून मालती किल्ली कमरेला परत खोवू लागली. पण दिनून तिच्या हातातून ती काढून घेतली. त्या झटापटींत त्यान तिचे इतके मुके घेतले कीं ती शेवटीं भिऊन स्वतःला सोडवून घेऊन दूरच पळाली. त्यान तिची खूप आर्जवं केलीं, आणि " पण चावटपणा नाहीं करायचा " हे तिच म्हणण त्यान शपथ घेऊन कबूल केल, तेव्हा ती त्याच्या-जवळ पुन्हा जाऊन बसली, आणि सूटकेसमधली एकेक वस्तु काढून त्याला दाखवू लागली परतु ते करतांना त्याला युक्तीनं दूर ठेवण्यातच तिच सार चातुर्य खर्च होत होत तिच्या मनात वरचेवर येत होत कीं आपल्याकडून झालेली चूक त्याला स्वच्छ सागावी, म्हणजे मग दुपारच्या जेवणानतर बाजारात जाता येईल व आपली चूक सरळ सुधारता येईल. परतु तस करण्याची तिला फार लाज वाटू लागली आणि शिवाय तिच्या मनात आल, आज रविवार! सारीं दुकान बद !...

बाहेरच्या गॅलरींतून " काय भाजी ! " असा फेरीवाल्या माळीणीचा आवाज येताच ती झटकन उठली, बाहेरच्या खालींत गेली, आणि तिनं कडी काढून दार उघडल. भाजी घेण्यापेक्षा एकात सपविण्याची तिला अधिक घाई झाली होती तिन माळीणीला विचारल " काय काय आहे?" " कोबी, नवलकोल, वाटाणा, गाजर, पालक, पुदीना " असा मत्र म्हणत माळीण डोक्यावरचा हारा खालीं उतरू लागली.

तितक्यात दिनू आतून बाहेर आला आणि म्हणाला " अग भाजी कशाला घेतेस ? "

" म्हणजे काय ! जेवण नाहीं का करायच ? " मालती म्हणाली, " मटाराचे सामोसे शिकून आलें आहे मी, ते करून घालते तुला. बघ तरी. "

दिनू म्हणाला, " पण तो बेत उद्या कर. आज आपल्याला घरीं

जेवायचं नाहीं. एक आमंत्रण घेतलेलं आहे मी आपल्या दोघासाठीं."

"कुणाकडचं?"

"नानू खरेकडल. साऱ्या मुलखाचा चिक्कु आहे तो, पण आम्ही त्याची अगदीं भलतीच पाठ पुरविली तेव्हा करतो काय. झाला पार्टी द्यायला तयार. बारसं गुपचुपच उरकल होतं मारवाड्यानं. पण आता—"

"बारस!" मालतीन आश्चर्यचकित झाल्याप्रमाणें प्रश्न केला. नानूचं लग्न होऊन सहा वर्षं होऊन गेलीं तरी त्याला मूल झालं नव्हतं आणि त्याच्या साऱ्या मित्राच्या चेष्टेचा तो एक विषय झाला होता हें तिला थोडसं माहीत होत. आणि नानूच्या बायकोला दिवस गेल्याची खबर तिला पूर्वी कधीं लागली नव्हती. "म्हणजे?"

"अग म्हणजे काय? अखेर आमच्या नानबाला मूल झालं!"

"त्याच्या बायकोला झालं म्हण कीं."

"अग तिला काय अन् त्याला काय एकच नाहीं का?" अस म्हणून दिनू खो खो करून हसत सुटला.

चेष्टेच हसण ओसरल्यावर मालती म्हणाली, "असं आहे काय?" मग तिचा चेहरा थोडा बदलला आणि निराळ्या तऱ्हेनं हंसून ती उद्गारली "बरं झाल बाई. अबूला मूल अगदीं हव होतं. आता तिच्या सुखात कसली उणीव राहिली नाहीं."

तिच्या त्या बोलण्याकडे दिनूच धड लक्ष होतं कुठें? त्याच्या मनात निराळेच विचार चालले होते. भाजीवाली हारा उचलून व्हराड्याच्या दुसऱ्या टोकाकडे केव्हाच गेली होती. "सैपाक करायचा नाहीं, भाजी घ्यायची नाहीं, अस ठरलं. मग तू आतां उगीच का घोटाळतेस दारात?" असं पुटपुटून त्यान मालतीला आत ओढली आणि दाराला कडी लावली.

"दाराला कड्या काय घालतो आहेस सारखा?" आपल्या मनातल्या रागाला चेष्टेचं रूप देण्याचा प्रयत्न करून मालतीन विचारलं, "कुणाला वाटेल या माणसाला घेणेकऱ्याची भीति वाटते आहे अन् म्हणून दार बद करतो आहे तो!" ती हसली.

दिनू म्हणाला "तुला तरी दार उघड ठेवायची काय लहर आली

आहे ? कुणाला वाटेल तुला माझी भीति वाटते आहे. मी काय तुझा घेणेकरी आहे ?"

"शका आहे कीं काय? सकाळपासून एखाद्या घेणेकऱ्यासारखच चालवल आहेस. दार उघड. जरा वार येऊ दे कीं."

"तुझ्या अंगात वारं शिरलं आहे आज! मी नाहीं कडी काढणार."

"बर बर कुलूप लाव हो दाराला !" ती मोठ्यादा हसली, आतल्या खोलींत गेली, आणि मोरींतली बादली सरकवून तिन नळ सोडला.

दिनू तिच्या मागें येऊन उभा राहिला आणि म्हणाला "आता हें काय काढलस ?" त्यान तिचा हात धरला.

ती म्हणाली "अरे जेवायच नाहीं, सैपाक करायचा नाही हे खर, पण आघोळीबिंघोळी तरी उरकायच्या आहेत कीं नाहीं? केव्हा एकदा अंगावर भरपूर पाणी घेईन असं झालय मला. डोळे बघ कसे चुरचुरताहेत आणि सारं अग असं काहीं अस्वच्छ अन् घामट झालं आहे."

तिन पोलक्याच्या गुड्या सोडल्या आणि बाह्या काढण्यासाठीं हात वर केले.

परंतु त्याच्च गोष्टीन तिचा घात केला. ती मोरींत पाऊल टाकणार तोच दिनून तिचा हात धरला आणि...

"अरे पण जरा—" अस ती ओरडली आणि त्याच्या कानाशीं तोंड नेऊन म्हणाली "माझ्या गळ्याची शपथ आहे तुला. नको. अगदीं नको. ऐक माझं."

"का ?"

आता यातून सुटका होत नाहीं अशी मालतीची खात्री झाला.मनांतल्या मनात ती अगदीं भेदरून गेली. तिन आणि दिनूनं जी सावधगिरी कित्येक तरी दिवस अगदीं कटाक्षान घेतली होती ती आता मोहाच्या या एका क्षणात वाया जाणार असं तिला वाटल. ती मनाशीं म्हणाली, "नाहीं नाहीं, हें होऊं देता कामा नये." तिन सार बळ एकवटून त्याला ढकललं. पण कामातुर पुरुषाची मिठी का अशी सहज सोडविता येते ? ती मोठ्यादा ओरडली, "दिनू माझी शपथ आहे तुला. ऐक !"

"अ हं" दिनू म्हणाला, "माले, चार महिन्यानीं भेटते आहेस."

" चार महिने थाबलास तसा एक दिवस थाब. उद्या— "

" कशाला उद्याची बात ! " दिनूला तें जुन गाण आठवल आणि त्या गाण्याची लकेर मारताच—

तितक्यात दरवाज्यावर थापा वाजल्या आणि " नामदार ! अहो नामदार ! दार उघडा कीं " अशा हाका ऐकू आल्या.

मत्रिमडळातल्या एका मत्र्याच नाव दिनकर देसाई होत म्हणून दिनूचा एक स्नेही त्याला नेहमीं " नामदार " म्हणत असे. त्याचा आवाज दिनून ओळखला. " धडफळ्या आला वाटतं लेकाचा ! " अस फुसकारून दिनू मोठ्यादा ओरडला, " हा हा आलो रे कोकलू नकोस " त्यानं मालतीच्या गळ्याभोवतालची मिठी काढली, तिचे दोन तीन मुके घाईनं घेतले, आणि बाहेर जाऊन खिडकीच्या गजावरचा पडदा दूर करून त्यातून डोकावून तो म्हणाला, " गुड मॉर्निंग ! ". मग तो दाराशीं गेला आणि त्यान कडी काढली.

आपल जाडजूड शरीर हातातल्या सोट्यासकट खोलींत ढकलून धडफळेनीं विचारल, " काय आली कीं नाहीं मडळी ? "

दिनूच्या मनात आल, त्याला उचलावा आणि बाहेर फेकावा. परतु एकशेसाठ सत्तर पौड उचलण्याचा पराक्रम त्याच्या शक्तिपलीकडचा होता. शूर माणसानहि तारतम्यान वागलेल बर या अर्थाची एक इंग्रजी म्हणहि त्याला आठवली. त्यान सागायच्या आधींच धडफळ्यानीं आरामखुर्ची काबीज केली होती. त्याच्यासमोर तो बसला आणि हसून म्हणाला "माली सकाळींच आली कीं ". मालतीन मधल दार लावून घेतल होत. मोरींत तपेलीचा, बादलीचा आणि पाण्याचा आवाज होत होता. दिनू म्हणाला " आघोळ करते आहे. "

धडफळे म्हणाले " तरीच दारं लावलीं होतीं. मी मनाशीं म्हटल कडी का ? तुमचं दार नेहमीं सताड उघड असायच. "

काहीं काहीं माणसं अशी असतात कीं त्याना वाटेला लावण्याचा सगळ्यात उत्तम उपाय म्हणजे त्याना चहा देऊन टाकण. हीं माणस चहा काढल्याशिवाय कधीं उठायचीं नाहींत. त्याना चहा द्यायला उशीर केला कीं तीं खुशाल बसून राहतील आणि तुमचा वेळ खातील. त्याना स्वतःला

वेळेची किंमत नसतेच. धडफळे अशा माणसांपैकींच असल्याच दिनूला अनुभवानं माहीत झालं होतं त्यानीं टेबलावरच वर्तमानपत्र उचललं आणि वाचायला सुरवात केली तेव्हा दिनून ओळखलं कीं हा गृहस्थ आतां जेठा मारून बसणार. त्यान विचारलं " काय चहा घेणार कीं नाहीं ?"

वर्तमानपत्रांत खुपसलेल डोकं बाहेर न काढतां धडफळे म्हणाले, "वा! घेणार तर! अन् नुसताच चहा देतोस कीं काय ? सासूबाईकडून फराळाच आलं असेल कीं नाहीं काहीं तरी ? ते सपण्यापूर्वी हजर व्हाव म्हणून तर आलों धाईनं. "

" ठीक ठीक " हंसण्याचं नाटक करून दिनू म्हणाला आणि उठला. मधल्या दाराजवळ जाऊन थाप मारून तो म्हणाला " माले, बाहेर धडफळे आले आहेत बरं का. "

धडफळे म्हणजे एक कप चहा हें माहीत झालेल असल्यामुळे मोरींत अग पुसता मालतीनं ओरडून म्हटलं. " समजल समजल. पण जरा वेळ लागेल रे. "

दिनूच्या आधींच धडफळे म्हणाले. " सावकाश होऊं द्या. आमची काहीं घाई नाहीं. " त्यानीं वर्तमानपत्राचं वाचन चालू ठेवलं.

दिनूला वाटलं याच्या डोक्यांत धोंडा घालावा. पण मुंबईच्या चाळींतल्या खोलीत धोंडा कुठून मिळणार ! त्यान आपलं दाढीच सामान काढलं आणि आरशापुढें उभं राहून गालावर साबणाचा फेस चोळीत तो म्हणाला, " ह काय धडफळे ! काय म्हणतो तुमचा रा. स्व. संघ ? "

वाचनांत खंड पडूं न देतां धडफळे म्हणाले, " अरे म्हणायचा काय ? आतां गोहत्त्या बंद करून टाकतों बघ आम्ही ? "

" अस कां ? आनंद आहे त्याच्या मागोमाग मेंढराची हत्त्याही बंद करा. आणखी ती आटपल्यावर ढेकूण, पिसवा, डास— "

" तुम्ही कॉंग्रेसवाले लोक अशीच चेष्टा करणार आमची. माहीत आहे मला. "

" मी कॉंग्रेसवाला आहे म्हणून कोणी सांगितलं तुला ? मी कोणत्याहि पक्षांतला नाहीं बाबा. मी एक साधासुधा सुखानं जिवंत राहूं पाह-

णारा माणूस आहे. अन् माझ्यासारखींच देशांतलीं कोट्यवधि माणस आहेत."

दिनूची आणि धडफळ्याची ती नेहमींची हमरी तुमरी लवकर सपण्या-सारखी नव्हती. दिनूची दाढी सपली, परंतु दोघाचा वाद चालूच राहिला. शेवटीं मालती फराळाच आणि चहाच घेऊन बाहेर आली तेव्हा धड-फळ्याच तोंड आपोआप बद झाल. फराळावर हात मारून आणि चहाची ढेकर देऊन ते आपला सोटा घेऊन उठले. तोपर्यंत पाऊण तास निघून गेला होता. ते गेले तों दिनूच्या कचेरींतले दोन स्नेही आले. त्याच्या मागोमाग आणखी अशींच माणस येत राहिलीं. दिनू शेवटीं मनाशीं उमजला कीं आता चुळबुळ करण्यात काहीं अर्थ नाहीं. अकरा वाजले तेव्हा त्यान आणि मालतीन चागले कपडे केले, आणि तीं दोघ मिळून गिरगावात नानू खरेच्या घरीं जायला निघालीं.

रविवार असल्यामुळें बस मिळायला वेळ लागला. जी बस मिळाली तिच्यातहि एका बाकावर दोन जागा त्याना सापडल्या नाहींत. दिनू पुढच्या बाजूस एक जागा होती तिथें बसला. मालती मागच्या एका बाकावर बसली. तिच्या शेजारीं बसलेल्या बाईन तिला म्हटलं, "तुम्ही अडचण करून बसू नका ह. अगदीं नीट बसा." "हो हो" अस तीहि म्हणाली, परतु जरा अग चोरूनच बसण तिला भाग होत, कारण त्या शेजारच्या बाईनं पदराखालीं तान्ह मूल घेतलेल होत. त्या बाईला सकोच वाटू नये म्हणून खिडकींतून बाहेर पाहात राहण्याची मालतीन काहीं वेळ काळजी घेतली. पण मग तिला न कळत तिची नजर आत वळली. झिरझिरीत वस्त्राखालीं त्या बालकाच सुदर मुखमंडल आणि तितकच सुदर त्या बाईच गोरपान पुष्ट स्तनमडल तिला दिसल ! त्या दृश्या-वरून तिची नजर चटकन हलेना. ते पाहण्यात तिच्या मनाला काहीं एक नवीनच सूक्ष्म परन्तु खोल सुख होत होत, आणि त्या सुखाच्या स्पर्शापासून दूर व्हावस तिला वाटत नव्हत...आपली आणि त्या स्त्रीची नजरानजर होऊ नये अशी तिची इच्छा होती. परतु त्या स्त्रीन खालीं आपल्या मुलाकडे लावलेले डोळे एकदम वर उचलले व मान वळविली त्यामुळें तिची आणि मालतीची दृष्टिभेट झालीच. मालतीला चोरट्यासारखं झालं. परंतु

त्या स्त्रीनं इतकं मनमोकळं हास्य केलं कीं तिला वाटलेला चोरटेपणा लगेच नाहींसा झाला, आणि तीदेखील अगदीं प्रसन्नपणें हसली. हसता हसता त्या स्त्रीनं आपल्या स्तनावरून ब्लाऊझ ओढून सरकवीत मुलाला पदराबाहेर काढून हातात समोर धरलं, व त्याचे मुके घेतले. त्या बालकानं प्रथम आईकडे व नंतर मालतीकडे बघितलं. त्याला काय वाटलं कुणास ठाऊक, पण तो खुदकन गोड हसला आणि त्यानं मालतीकडे झेप घेतली. त्याची आई हसली आणि म्हणाली 'ओळख बिळख काहीं लागत नाहीं लबाडाला. साऱ्या मुलखाचा आगंतुक आहे!' मालतीनं त्याला घेऊन त्याचा मुका घेतला तेव्हा तो आणखीच हसला, आणि पाय झाडून डोकं मागं टाकून आडवं होण्याचा प्रयत्न करू लागला. जणू त्याला तिच्या पदराखालीं व्हायचं होतं...'कसा वेडा आहे बघितलात ना?' त्याची आई म्हणाली. मालती काहीं न बोलता हसली, परंतु अंतर्यामीं काहीं एक विचित्र संमिश्र भावना तिनं त्या क्षणीं अनुभविली. त्या बालकाबद्दल तिला ममतेचे जे पाझर फुटले ते तिला विलक्षण सुखाचे वाटले. परंतु स्वतःची रुक्षता तिला एखाद्या अपूर्णतेसारखी वाटली व त्याची तिला वेदना झाली. जी गोष्ट घडू नये म्हणून तिनं आणि दिनूनं कटाक्षानं काळजी घेतली होती ती घडावी असं तिला एकदम फार फार वाटलं. त्या बालकाला तिनं आपल्या अंगाशीं अगदीं घट्ट धरलं. त्या वेळच्या तिच्या मनातल्या विचाराची त्या बालकाच्या आईला कोठून कल्पना असणार? तिची उतरण्याची जागा आली आणि तिनं हात पुढे केले तेव्हा मुलाला परत तिच्याजवळ देताना मालतीला वाईट वाटलं..जागा रिकामी झालेली दिसल्याबरोबर दिनू शेजारीं येऊन बसला, आणि त्याच्या अंगाचा स्पर्श होताच मालतीनं आपला हात त्याच्या दंडात अडकविला, त्याच्या खांद्यावर मान टेकली, आणि हळूच म्हटलं "दिनू!". त्यानं हळूच विचारलं "काय?" मालती लाजली. तिनं आपला ओठ चावला. ती हलकेच म्हणाली "कांहीं नाहीं."

नानू खरेच्या घरीं जेवणासाठीं जमलेले मित्र दिनूप्रमाणेंच आपापल्या बायका घेऊन आले होते. त्यांच्यापैकीं बहुतेकजणी लेकुरवाळ्या होत्या, आणि जेवणाआधींच्या व नंतरच्या गप्पाच्या वेळेस नानूच्या मुलाच

कौतुक त्यानीं जितकं केलं तितक्याच कौतुकानं आपल्या मुलाच्या हकीगती त्यांनीं सांगितल्या. पुरुषावेगळी बायकाची स्वतंत्र बैठक झाली कीं त्या किती नि:सकोचान अगदीं खाजगी गोष्टींची चर्चा करतात ते पाहून मालतीला आश्चर्य वाटल. मूल न होऊ देण्याचा आपला निश्चय त्या समवयस्क तरुण स्त्रियाजवळ सांगण मालतीला भाग पडल, आणि "अगबाई!" "तुमचं आपलं भलतच दिसत आहे" अशा प्रकारचे काहीशा आश्चर्याचे काहींशा अवहेलनेचे त्याचे उद्गार तिला ऐकावे लागले. नानूची म्हातारी आत्या तर स्पष्टच म्हणाली, "दीड वरीस होऊन गेल तरी तुझ्या घरात पाहिला पाळणा हालला नाहीं म्हणून सांगतेस? अस कसं ग हे? आमच्या वेळेस मुलींचीं लग्न आठव्या नवव्या वर्षीं होत असत. पण आतांच्या तुम्ही मुली लग्नाच्या आधींच न्हात्याधुत्या असता. खर म्हणजे वैशाखात लग्न झालं तर पुढच्या चैत्रात तुमच्या घरीं मुलाच बारस व्हायला हव. नानूच्या बायकोन इतकीं वर्षे लावलीं तेव्हा—"

म्हातारीच्या बोलण्याकडे मालतीन लक्षच दिलं नाहीं.

बाहेरच्या खोलींत पत्त्याचा डाव मांडण्याचा बेत नानू आणि त्याचे मित्र करूं लागले. दिनू म्हणाला, "माफ करा रे बुवा. मला जायला हवं."

कुणी म्हणाल, "अरे हट! मोठा पाहिला आहे जाणारा. बैस."

कुणी म्हणाल, "रविवारच कसलं काम आलं आहे लेका? थापा मारतोस होय?"

दिनू म्हणाला "शपथ काम आहे रे. पत्त्याच्या डावाला मी कधीं नाहीं म्हणेन काय? पण आज नाहीं मला बसता येत."

त्यानं कांचा घालून कोट चढविलाच. "दिन्या, असं माणसांतन उठून जाऊं नये" "आमच ऐकत नाहींस पण हें जड जाईल हं तुला" असे आर्जवाचे धमकावणीचे उद्गार मित्रानीं काढले. परंतु त्याकडे त्यानं दुर्लक्ष केलं. आंतल्या खोलींत डोकावून त्या महिला–समाजांतली आपली अर्धांगी हुडकायला त्याच्या नजरेला थोडा वेळ लागला. पण तिची

आणि त्याची दृष्टादृष्ट होताच तो म्हणाला " माले, आपण जाऊ या. चल. "

आंतल्या खोलींतलं महिला मंडळही मालतीला सोडायला तयार नव्हतं. परंतु दिनूच्या तोंडच्या " चल " या दोनच अक्षरानीं तिच्या अंगावर सुखाचे शहारे उठले होते. घरीं जाण्याची घाई तो का करीत होता तें समजल्यामुळें आनंदाची लहर तिच्या मनात उसळली होती. सगळ्यांचा आग्रह मोडून ती उठली, आणि तिनं आपल नेसण ठाकठीक केल. तिच्या कपाळीं कुंकू लावताना नानूची आई तिला म्हणाली " आता तुझ्या घरच्या बारशाला उशीर होता कामा नये हं. " मालतीन खालच्या नजरेनं दिनूकडे चोरटा कटाक्ष टाकला. नानूच्या आईचे शब्द त्यान ऐकले होते. तो हसत होता.

परत जाताना बस मिळायला पुन्हा उशीर झाला. पुन्हा दोघाना वेगवेगळ्या बाकावर बसाव लागल.

बसमधून उतरून बिऱ्हाडाच्या वाटेनं तीं दोघ जाऊं लागलीं तों फिरायला निघालेलीं जोडपीं रस्त्यातून चाललेलीं त्या दोघाना दिसलीं. सिनेमाच्या थिएटरपुढें गर्दी होती. ' मेरी कफे ' पुढच्या त्या छोट्या बगिच्यात नुकतच पाणी शिंपडलेलं होत. छोट्या छोट्या टेबलावर स्वच्छ आच्छादन घातलीं होतीं. माणसं आइस्क्रीम खात होतीं. परन्तु यापैकीं कशाकडेच मालतीच लक्ष नव्हत. घराची ओढ लागल्याप्रमाणें तिचीं पावल झपाझप पडत होतीं. केवळ दिनूला डिवचण्यासाठीं तिन विचारल,

" इतक्यात घरीं जाऊन काय करायचं आहे रे ? आपणही फिरायला जाऊ कीं कुठें तरी. "

" हं: ! " अस म्हणून दिनून तिच्याकडे एकदा पाहिल्यासारखं केलं आणि हातात धरलेला तिचा हात दाबून तो तिला ओढू लागला.

त्याचीं ती घाई आणि ती नजर पाहून मालती मनांतल्या मनांत हसली

खोलीचं दार उघडल्याबरोबर ती झटकन आतल्या खोलींत गेली. मोरींतला नळ सोडून तिनं आपल्या तोंडावर पाणी मारल.

सकाळच्या प्रमाणेंच बाहेरच्या दाराला कडी लागल्याचा आवाज तिला ऐकू आला ! आणि सकाळच्या प्रमाणेंच टॉवेल घेण्यासाठीं तिनं दोन्ही हात वर उचलले होते तोच दिनूच्या हाताची मिठी तिच्या अंगाभोंवतीं पडली ! परन्तु सकाळसारखी आता ती भ्याली नाहीं. तिच मन पालटलं होत. आपण माहेरीं काय विसरून आलो ते ती विसरली होती.

"माले !" तिच्या तोंडावर टेकलल्या दिनूच्या ओठातून शब्द निघाला.

"दिना !" ती उलट म्हणाली, आणि तिन मान हालविली.

दिनू म्हणाला, "आता तुझ मी ऐकणार नाहीं."

"नको ऐकूस !" मालती म्हणाली, "मीच तुझ ऐकेन."

## ५ : प्रकाश हवा ! पण आग नको !

" यमूकाकू पळून गेल्या !"—

त्या छोट्याशा गावात ज्याच्या त्याच्या तोंडीं हा एकच विषय झाला.

" यमूकाकू " हें नाव ऐकल्यावर कुणाला वाटेल मध्यम वयाच्या कर्त्या सवरत्या लेकुरवाळ्या बाईच हे नाव आहे. पण तस नाहीं. वामनरावाना लोक ' काका ' म्हणत म्हणून त्याच्या बायकोला ' यमूकाकू ' असं नाव पडल होतं इतकच. वास्तविक त्याना ' यमू ' हेच नाव शोभण्यासारख होत. फारच झाल तर ' यमूताई '. परतु गावच्या लोकानीं त्याना यमूकाकू ठरविल होत, त्याला काय इलाज ?

यमूकाकू पळून गेल्या या बातमीचाही अर्थ काहींअसा नव्हता कीं आजन्म यमूकाकू एकाएकीं उठल्या होत्या आणि घरातून चालत्या झाल्या होत्या. गेल्या दीड दोन महिन्यापासून वामनराव खानावळींत जेवू लागल्याच लोकाना माहीत होत. परतु लोकानीं विचारल तर वामनराव सागत बायकोला मंगळागौरीसाठीं माहेरीं पाठविली आहे, आणि लोकाना ते खर वाटत असे. पण श्रावण गेला, भाद्रपद सरला, दसरा झाला, दिवाळी जवळ आली तरी देखील वामनराव जेवणासाठीं खानावळींत जात असलेले दिसले तेंव्हा लोकाना " मंगळागौरीसाठीं पाठविलेली आहे माहेरीं " हें वामनरावाचं सांगण पटेना. यमूकाकू अजून कशा परत येत नाहींत असं विचारून विचारून गावकऱ्यानीं वामनरावाना भडावून सोडलं. शेवटीं कुणाजवळ तरी वामनराव म्हणाले " आता तुम्हाला खर तें सागतो. माझी बायको कधीं परत येणार नाहीं. तुमची यमूकाकू पळून गेली असं समजा. "

मग काय विचारता ? बोलून चालून तें लहानस गाव. घटकाभरांत सगळीकडे बातमी पसरली की यमूकाकू पळून गेल्या. धक्का देणाऱ्या बातम्याची गावकऱ्याची भूक सहसा तृप्त होत नसे. त्या लहानशा गावात खळबळ उडविणाऱ्या घटना कुठल्या घडायला ? त्यामुळें यमूकाकूंची ती बातमी ऐकतांच लोकांनीं तिच्यावर अगदीं अधाशी झडप घातली. जो तो दुसऱ्याला सागत सुटला " यमूकाकू पळून गेल्या, तुम्हाला समजलं कीं

नाहीं !" आणि सारे गावकरी त्या घटनेवरचं आपलं मत प्रदर्शित करूं लागले, " अलीकडच्या मुलींनीं अगदी ताळतंत्र सोडला हो ! " जो तो वामनरावाविषयीं सहानुभूति दाखवू लागला. त्या गावच्या जनता जनार्दनाच्या मतानं यमूकाकू म्हणजे एक ऊठवळ बाई ठरली !

तें गाव आकारानं लहान होतं. परंतु लहानपणा एवढा एकच त्याचा विशेष नव्हता. किंबहुना इतर सामान्य लहान गावाहून हें गाव फारच वेगळ्या तऱ्हेचं होतं. पर्वताच्या पाठीवरून आगगाडीचा रस्ता गेलेला होता. तळाशीं दरीच्या निमुळत्या टोकाशीं वीज उत्पन्न करण्याचा मोठा कारखाना होता. कारखान्याच्या पश्चिमेस दुसऱ्या टोकाचा रुंद विस्तार पसरलेला होता. मोठ्या शहराकडून येणारा रहदारीचा पक्का गाडी रस्ता कारखान्याच्या एका बगलेनं वर चढलेला होता. आगगाडीच्या रुळाचा फाटा डोंगराची एक रांग फोडून तयार करण्यात आला होता तर गाडी-रस्त्याचा घाट आलीकडच्या दुसऱ्याच एका रांगेला वळसे घालीत वर चढला होता, आणि गाडीरस्त्याचा हा घाट अर्धा संपून ज्या ठिकाणीं मोठा टप्पा होता तिथेंच रस्त्यापासून जरा आतल्या बाजूस वीस पंचवीस बंगले होते. त्या बंगल्याच्या समूहालाच गाव असं म्हणत असत. दरीच्या तळाशीं विजेचा कारखाना निघण्यापूर्वीं या ठिकाणीं घर तर राहोच, साधी कात-कऱ्याची झोपडीदेखील नव्हती. नुसतं जंगल होतं. परंतु कारखाना निघाला तेव्हा कारखान्यांतल्या वरिष्ठ नोकराना राहाण्याच्या जागा बांधाव्या लागल्या. तळाशीं हवा चांगली नाहीं, आणि कारखान्यापासून वरिष्ठ कामगार फार दूरही असतां कामा नये म्हणून अर्ध्या घाटावरच्या टप्प्याची ही सपाटीची जागा पसंत करण्यात आली आणि छोटे मोठे टुमदार बंगले वीजकंपनीनं बांधले. या छोट्या गावाचा जन्म झाला.

अशा प्रकारें वसलेलं हें छोटं गांव आकारानं अगदीं लहान होतं खरं. परंतु तें एक खेडं होतं असंही म्हणता येत नव्हतं, आणि तें खेडं नव्हतं असंही म्हणायची सोय नव्हती. त्या गांवाला खेडं म्हणावं तर सारीं घरं सुबक आणि उत्तम बांधणीचीं होतीं, पाण्याची आणि विजेच्या प्रकाशाची सोय पहिल्या प्रतीची होती. रस्ते दोनच होते, पण ते नेहमीं सुस्थितींत असत. घाण, केरकचरा कुठें दिसत नसे. कोंबड्या, बदकं, डुकरं, गाढवं

इत्यादि खेड्यातले ठराविक रहिवासी कधीं दिसत नसत. परंतु तें खेडेगांव नव्हतं असंही म्हणण्याची सोय नव्हती. कारण ते हमरस्त्यापासून दूर नव्हतं तरी एकदर जगापासून तोडल्यासारखच होतं. शहरातला गजबजाट, रहदारीची वर्दळ, आणि माणसाची धावपळ या गोष्टींचा त्या गावाला बिलकुल संपर्क नव्हता. इथे सारं शात आणि स्तब्ध होत. सामान्यतः खेड्यात जी हालचाल असते तीही येथें नव्हती. कारण आजूबाजूला शेती नव्हती, मळे नव्हते, रानात चरायला जाणाऱ्या अगर परत येणाऱ्या गायी, म्हशी, अगर मेंढ्या गावात नव्हत्या. खेड्यातल्या लोकाचे जे उद्योग असतात ते करणारी माणसं या गावात नव्हती, नागरी जीवनाची गडबड आणि धावपळ या ठिकाणीं नव्हती, ग्रामीण जीवनाच्या विशेष खुणाही येथें नव्हत्या. शहर तर नव्हेच, पण खेडेगांवही नव्हे, अशा विचित्र प्रकृतीचं यांत्रिक युगातल हे एक नवं लहानस गाव पर्वताच्या कुशींत निर्माण झाल होत.

अशा या गावात वामनरावाची गृहिणी म्हणून कमू एके दिवशीं आली, व यमूकाकू झाली.

ती रूपानं अगदींच सामान्य होती. तिच्या लहानपणींच तिचे आईबाप वारल्यामुळे चुलत्यान तिला लहानाची मोठी केली होती. हुडा द्यावा न लागता एखाद स्थळ मिळालं तर तो बघत होता. बिजवर वामनराव आढळल्याबरोबर यापेक्षा अधिक चागलं स्थळ कोठून मिळणार असा विचार करून त्यानं यमूच लग्न करून टाकल. लग्नाचा समारभ यमूच्या गावींच झाला, आणि तो आटपल्यावर लगेच यमू जी आपल्या नवऱ्याबरोबर निघाली ती एके दिवशीं संध्याकाळीं बसमधून खालीं उतरली, आणि दिवेलागणीच्या सुमारास आपल्या नव्या घरात प्रविष्ट झाली.

बंगल्यातल्या चार खोल्या, पुढचा मागचा व्हराडा, रात्रदिवस पाण्याची भली मोठी धार सोडणारा न्हाणीघरातला नळ, दालना-दालनांतले विजेचे दिवे, या साऱ्या गोष्टी पाहून यमू खुष झाली. तिला वाटल आपल नशीब चांगलं म्हणून या अशा घरात आपण आलों. तिच्या मनाची ही खुषी नंतरच्या दिवसात वाढली. बंगल्याच्या एका व्हराड्यातून गर्द झाडीनं आच्छादलेली डोंगराची भिंत आणि घाटातून वळण घेत गेलेला सुंदर रस्ता

दिसे, दुसऱ्या बाजूच्या व्हराड्यात उभं राहिलं कीं दरीच्या तळाशीं असलेल्या कारखान्याच भल मोठं पत्र्याच लाल छप्पर व करखान्यापासून वहात दूर गेलेला नदीचा नागमोडी प्रवाह उन्हात चमकताना दिसे, आणि ठिकठिकाणच्या झाडाच्या झुपक्यानीं व लहान मोठ्या जलाशयानीं नटलेला भूप्रदेशाचा सपाट विस्तार फारच शोभिवत वाटे. पुढच्या किंवा मागच्या व्हराड्यात नुसत बसून राहिल तरी घटका दोन घटका सहज मजेन जातात अस यमूला आढळून आलं. घरकाम करण्यात आणि सार काम आटपल कीं व्हराड्यात बसून राहण्यात सारा दिवस केव्हाच निघून जात असे. चुलत्याच्या घरात मोलकरणीसारखे कष्ट उपसता उपसता कटाळलेल्या यमूला आपण किती सुखात पडलों अस वाटल मुख्य म्हणजे चुलत्याच्या घरात तिची कशावरसुद्धा सत्ता नव्हती, पण आता ती एका पुरुषाची गृहस्वामिनी झाली होती. घराची मालकीण झाली होती आपली कशावर तरी सत्ता आहे ही जाणीव माणसाच्या सुखाला आवश्यक असते. ही जाणीव यमूला आयुष्यात प्रथमच मिळाली. तिला वाटल आपले दुःखाचे व कष्टाचे दिवस सपले. आता यापुढे आपण मोठ्या सुखान राहू...

परंतु माणसाच मन मोठ चमत्कारिक आहे. चमत्कारिक म्हणजे अस्थिर आहे. त्याला दुःखाची सवय होते, तसच सुख अपुर वाटू लागत. ज्या गोष्टी आपल्या सुखाला पुरेशा आहेत अस यमूला प्रथम प्रथम वाटल त्याचाच अपुरेपणा तिला हळूहळू जाणवू लागला. बगला चागला होता, दिवे विजेचे होते, पाण्याचा नळ अखड वहात होता, व्हराड्यातून मनोहर सृष्टिशोभा दिसत होती ! परतु यापलीकडे काहीच नव्हत ! वामनरावाच्या कामाच्या वेळा ठरलेल्या नव्हत्या. कधीं सकाळची, कधीं दुपारची, कधीं रात्रीची पाळी त्याना करावी लागे. ते खालीं कारखान्यात कामावर गेले कीं आठ तासाची निचिंति असे. जेव्हा त्याची कामाची पाळी नसे तेव्हाही त्याचा पाय घरात नसेच. गावातल्या पुरुषानीं पत्त्याचा अड्डा काढला होता. त्या अड्ड्यावर ब्रिजचा डाव रात्रदिवस चालू असे. वामनराव जेवायला केव्हा येतील त्याचा नियम नसे. रात्रीं झोंपण्यासाठीं येतील कीं नाहीं त्याचीही खात्री नसे. कित्येकदा उजाडण्याच्या वेळेस ते ब्रिजचा डाव आटपून घरीं येत, आणि आल्याबरोबर यमूकाकूंना हुकूम

सोडीत, "आज सकाळची आठाची पाळी आहे. चटकन् जेवायला वाढ बघू." जेवण आटोपून ते निघून जात, आणि असे गेले कीं परत केव्हा उगवतील ते एक परमेश्वरालाच माहीत असे. त्याच्या या वागण्याबद्दल यमूकाकूनीं नापसती दाखवून पाहिली, गोडीगुलाबीन सागून पाहिलं, रुसण्याचेदेखील प्रयोग केले. तिची कल्पना होती कीं नव्या बायकोचे लाड आपले पतिराज करतील. बिजवर नवरे बायकोच्या धाकात राहतात असं तिन ऐकल होत. परतु तिला लवकरच कळून आल की वामनराव त्यापैकीं नाहींत. केवळ जेवण करून घालायला आणि घर संभाळायला हक्काच माणूस हव म्हणून लग्न केल्याप्रमाणे त्याच सारं वागण होत. शृगाराची देखील त्याना चटक नव्हती. यमूच रूप सामान्यातल होत, परतु तिच्या अंगात तारुण्य तर मुसमुसत होत! खर म्हणजे आपल्या नवऱ्यान व्यसन लागल्याप्रमाणें आपल्याभोवतीं नाचायला हव अस यमूकाकूना वाटे. पण कारखान्यातली आठ तासाची पाळी व पत्त्याचा अड्डा यापलीकडे तिसरी गोष्ट वामनरावाच्या गावींच नव्हती! वाचण्याचीदेखील त्याना आवड नव्हती. त्याच्या घरात पुस्तक किंवा वर्तमानपत्रही औषधालादेखील मिळण्यासारख नव्हत

चार सहा महिन्यातच यमूकाकू अगदीं कटाळून गेल्या. असल्या ससारात सुख कुठे आहे अस त्याच मन विचारू लागलं. कित्येकदा त्याना वाटे माहेरीं जावं. परतु तिकडे तरी सुख कुठे होत? त्याना प्रेमाचं माहेर नव्हत, सुखाच सासर नव्हत! आयुष्यातला कंटाळा त्याना असह्य वाटूं लागला.

गावांत सुमारें पचवीस लहान मोठे बगले होते. परंतु तितकीं बिऱ्हाडं नव्हतीं. 'साहेब' या रागेत बसणारे ऑफिसर सहकुटुब रहात असत, पण थोड्या पगाराचे कामगार होते ते कारखान्याच कत्राट घेऊन चालविलेल्या खाणावळींत जेवीत असत. त्यानीं बायकामुल या गावीं आणलेली नव्हतीं. यामुळें पुरुषमाणसाना संगत सोबत खूप होती, पण बायका दहासुद्धा नव्हत्या. आणि ज्या होत्या त्या वामनरावापेक्षा पगारान वरिष्ठ असलेल्या 'साहेबा'च्या घरातल्या असल्यामुळे स्वतःचा मोठेपणा मिरवून नेहमीं वागत. मैत्रिणी जोडून तरी कंटाळा घालावण्याचं साधन निर्माण करावं अशा

हेतूनं वरिष्ठ साहेबाच्या या मडमाना आपल्या घरीं बसायला बोलविण्याचे व त्यांच्या घरीं बसायला जाण्याचे प्रयोग यमूकाकूंनीं करून पाहिले. परतु त्यातून सुखाऐवजीं मनस्तापच निर्माण झाला. मग त्यानीं तो नाद सोडून दिला. चागली लग्न होऊन संसाराला लागलेली, सुखात असावी अशी वीस वर्षाची यमूकाकू, पण या गावातल्या आणि घरातल्या आयुष्यात मनाच समाधान तिला कोठें सापडेना . दिवसामागून दिवस, आणि महिन्यामागून महिने जात होते. यमूकाकूंच्या जीवनक्रमात कोणताही बदल होत नव्हता. दिवस सपला कीं रात्र होते, आणि एक महिना सपला कीं दुसरा सुरू होतो, एवढीच काळाच्या ओघाची जाणीव यमूकाकूंना होती...

कधीं कधीं आपल्याला मूल व्हाव अशी त्याना फार इच्छा होई. आयुष्यातल्या साचपाण्याला त्या इतक्या विटल्या होत्या कीं अपत्याची कल्पना मनात आल्यावर त्याना काव्याचे विचार मुळींदेखील सुचत नसत. ज्यावर प्राणापलीकडे प्रेम कराव असा एक जीव आपल्याला लाभेल, आपल्या मुलाचे आपण परोपरीचे लाड करू, त्याला न्हाऊ घालूं, कपडे करूं, हिडवू, फिरवू असे बेत त्याच्या मनात येत नसत. त्याच्या आयुष्यातला आणि मनातला काव्यरस इतका आटून गेला होता कीं मुलाची इच्छा त्या एवढ्याचसाठीं करीत कीं त्याना वाटे मूल झाल म्हणजे आपल्याला हक्काची सोबत मिळेल. एवढ्या साध्या गद्य हिशेबान त्या परमेश्वराची प्रार्थना करीत, माझ्यावर थोडा तरी प्रसन्न हो आणि मला मूल होऊ दे... परंतु देव त्याचं मागण ऐकेल असं लक्षण दिसेना. लग्नाला जवळ जवळ दीड वर्ष झालं तरी यमूकाकूना दिवस गेले नव्हते...

कटाळा आणि एकटेपणा यमूकाकना इतका नकोसा झाला कीं व्हरांड्यांत बसून दरीकडे पहाताना त्याच्या मनात येई, एखाद्या कड्यावरून खालीं दरींत उडी घ्यावी...

एके दिवशीं सूर्यास्त झाल्यानंतर वाढणाऱ्या अधारात दरात उडी घेण्याच्या उद्देशानं त्या खरोखरच बंगल्याबाहेर पडल्या, आणि गांवचा मुख्य रस्ता ओलांडून घाटापलीकडच्या डोंगर माथ्याकडे निघाल्या. वामनरावाची कारखान्यांतली पाळी तिसरे प्रहरीं चार वाजतां सुरू होणार होती. त्यांना चहा करून देताना यमूकाकू मनाशीं म्हणाल्या होत्या, आतां रात्रीं बारा

वाजता पाळी संपल्यावर पत्ते खेळायला न जातां घरीं आलांतच तर मी कांहीं तुमच्या डोळ्याना दिसायची नाहीं. वामनराव पोषाख चढवून गेले. त्यानतर त्या चार घटका देवासमोर बसल्या, आपल सार दुःख त्यानीं देवाजवळ पूर्वीं हजार वेळा सागितलं होत पण पुन्हा सागितल, मनाशीं योजिलेला विचार देवाला सागितला, परमेश्वरा माझ चुकत तर नाहीं ना असं निर्गुण निराकार देवाला पुनः पुन्हां विचारल, आणि मग दिवस खालीं गेलेला दिसला तेव्हा त्या देवापुढून उठल्या, व बगल्याबाहेर पडून झपाझप चालू लागल्या.

गावचा रस्ता ज्या ठिकाणीं घाटातल्या मोठ्या सडकेला मिळत होता त्या ठिकाणीं खालून आलेली एक बस उभी राहिलेली त्याना दुरून दिसली. एक तरुण पुरुष खालीं उतरलेला त्यानीं पाहिला. त्या तशाच घाटरस्ता ओलाडून पुढे जाणार होत्या. बस पुन्हा सुरू होऊन घाट चढू लागली बसमधून उतरलेला तरुण पुरुष हातातली लहानशी सूटकेस सावरून गावाकडे जाणाऱ्या रस्त्याच्या रोखानं पावल टाकू लागला. यमूकाकूना पहाताच तो थबकला व गावाच नाव घेऊन त्यान विचारल,

"हाच रस्ता ना?"

यमूकाकूनीं मान हालविली. त्या पुढें निघाल्या होत्या, परतु त्या तरुण पुरुषान आणखी प्रश्न केला,

"खालच्या विजेच्या कारखान्यात कुणी वामनराव टिपणीस कामावर आहेत काय?"

"होय."

"त्याचा बगला आहे ना इथे?"

"होय."

"कितीसा दूर आहे?"

"जवळ आहे. या रस्त्यानं गेलं कीं डाव्या हातचा सातवा बंगला."

"काका घरीं असतील ना?"

"खालीं कारखान्यात पाळीवर गेले आहेत."

"परतु त्याच्या पत्नी तर असतील कीं नाहीं? मला त्याच्याकडे उतरायचं आहे."

यमूनं त्या अगदीं अस्पष्ट प्रकाशात त्या प्रवाशाच्या चेहऱ्याकडे पाहिल. तितक्यात रस्त्यावरचे सगळेच दिवे लागले त्याबरोबर कोपऱ्यावरचा दिवा लागला, व त्या उजेडात तो तरुण तिला अगदीं स्पष्ट स्पष्ट दिसला. ती त्याला एकदम म्हणाली,

" तुम्ही आमच्याच घरीं उतरायला आलात याची मला कल्पना नव्हती. चला. "

" म्हणजे तुम्हीच काकाची–" तो तरुण अडखळला.

" हो " अस म्हणून यमू हसली.

त्यानं विचारल, " कुठें कामाला निघाला होतात काय ? " यमूबरोबर गावच्या दिशेनं पावल टाकीत पाहुण्यानं विचारल.

ती म्हणाली, " कोपऱ्याच्या जरा पुढें घाटातल्या रस्त्यावर मारुति आहे, तिथें वात लावायला चाललें होतें–"

" मग वाटल तर आपण जाऊ या कीं. तुमच वात लावण्याच काम करा. मग जाऊं आपण घरीं–"

यमू म्हणाली, " नको, आज नाहीं वात लावली तरी चालेल. आज कांहीं शनिवार नाहीं. "

मग तीं दोघ बंगल्यापर्यंत चालत गेलीं.

यमूकाकूनीं टेलिफोनवरून वामनरावाना पाहुणे आल्याची वर्दी दिली. पाहुणाही त्याच्याशीं टेलिफोनवरून बोलला. यंत्रावर देखरेख ठेवण्याचं काम वामनरावाकडे होत, त्यामुळे ऐन वेळेस त्याना रजा मिळण सहसा शक्य नसे. परतु वामनरावानीं फोनवरून सागितल कीं सुटका झाली तर पहातो अन् घरीं येतो.

वामनराव दहा वाजता घरीं आले. तोंपर्यंत यमूकाकूंनीं अगदीं उत्तम-पैकीं जेवण तयार केलं. सैपाक करतांना आज किती तरी दिवसानीं त्या आनदात होत्या. सुगरणपणान सारे पदार्थ केले पाहिजेत ही त्याची मेलेली इच्छा किती तरी दिवसानीं आज टवटवीत झाली होती. ज्याला रुचकर, खमग असं काहीं तरी करून वाढाव व वाहवा मिळवावी असं कुणी मनुष्य आपण केलेले पदार्थ खाणार आहे असं तिला वाटेनासच झालं होतं, परंतु आज तिची ती इच्छा पुन्हा जागृत झाली. वामनरावाची गृहिणी

म्हणून ती या बंगल्यात आल्यापासून त्याच्याकडे कुणी पाहुणा आलाच नव्हता, तो आज एकाएकीं आला होता. तरुण, देखणा, मोकळेपणानं खूप बोलण्याची ज्याला आवड होती अशा त्या पाहुण्याचं आगमन म्हणजे यमूला एक मोठीच घटना वाटली. तिच्या कटाळवाण्या एकाकी जीवनाच्या साचपाण्यात एकदम खळबळ उडाली. नवीनच तरंग उठले. निश्चेष्टता संपली. हालचाल होऊं लागली. यमूला कित्येक दिवसांनीं एकदम उत्साहाचा अनुभव आला. कुणाजवळ क्वचितच तोंड उघडणारी ती उल्हासानं बोलण्यासाठीं उत्सुक झाली.

वामनरावांना फोन केल्यानंतर तिनं पाहुण्याला कपडे काढायची खोली दाखविली होती, न्हाणीघर कुठे आहे तें सांगितलं होतं. तो सारं आटपून पुढच्या खोलींत केव्हा बसतो यावर स्वैंपाकघरातून तिनं लक्ष ठेवलं होतं, आणि शिरा, पोहे आणि चहा घेऊन ती बाहेर गेली होती. हातातल्या वस्तू ती टेबलावर मांडीत होती, तेव्हा त्या तरुणानं हातातलं वृत्तपत्र दूर टाकलं आणि म्हटलं,

" काका असते म्हणजे त्यांनीं तुम्हाला माझी ओळख करून दिली असती. आता ते नाहींत तेव्हा माझी मीच ओळख करून देतों. इंग्लंड-मध्ये हा शिष्टाचारच समजतात..."

'तुम्ही इंग्लंडमध्ये होता?' असा प्रश्न यमूच्या जिभेवर आला. परंतु तो विचारण्याचा धीर तीला झाला नाही. त्या तरुण पाहुण्याची तिला थोडी भीति वाटूं लागली. त्याचं पुढचं बोलणं ऐकताना त्याच्या नजरेला नजर देण्याचा धीर तिला होईना. तो सांगत होता,

" तुमच्या लग्नात माझ्या आईला तुम्ही पाहिलं असेल. खरं म्हणजे मी काकांना मामाच म्हणायला हवं. लहानपणीं काकामामा अशी हाक मी त्यांना मारीतही असे. परंतु पुढे त्यातला चमत्कारिकपणा मला कळूं लागल्यावर मी त्यातला मामा गाळून टाकला व इतरांप्रमाणे काकाच म्हणूं लागलों." तो हसला आणि त्याच्या बोलण्यातल्या विनोदानं यमूलाहि हंसूं आलं व हसताना तिनं त्याच्याकडे पाहिलं. तो पुढे म्हणाला, " इंग्लंडला अभ्यासासाठीं जाण्यापूर्वी मी काकांच्याकडे कधीं कधीं येत असे. त्या वेळेस त्यांनीं इथल्या कारखान्यात नोकरी धरलेली

नव्हती. काकाकडे वारंवार यावंसं वाटे. परंतु आमच्या पहिल्या मामीला पाहुणे आलेले फारसे आवडत नसत. तीन आठवड्यापूर्वी मी विलायतेहून परत आलों. आई म्हणाली एकदा मामाकडे जाऊन आलं पाहिजे तुला. मीं म्हटलं जाणारच आहे, आणि दोन दिवसाची सवड सापडल्याबरोबर निघालो. म्हटलं हें गाव फार सुदर आणि हवेशीर आहे असं ऐकतो तेव्हा तें कसं आहे पहाव, आणि— " तो किंचित् थांबला आणि मग म्हणाला, " आणखी आपला नवी मामीही बघावी. "

त्याच ते बोलण ऐकून यमूला गोंधळल्यासारख झालं.

तो म्हणाला, " माझी ओळख करून देण्यासाठीं आणखी काय सागूं? पण खरंच ! माझ नाव मी अजून तुम्हाला सागितलं नाहींच ! माझ नाव सदानंद काका मला लहानपणापासून नुसतच " सदा " म्हणतात. तुम्ही-सुद्धा म्हटल तरी चालेल. मी तुम्हाला काय म्हणूं ? "

आता यमू फारच गोंधळून गेली. परतु तिला एकदम हसूंही आल व ती म्हणाली " काकू म्हणू नका म्हणजे झालं. "

सदानद मोठ्यादा हसला. तो म्हणाला " खरं म्हणजे मला भूक अगदीं-सुद्धां नव्हती. पण मी किती खाल्ल हो ! याच श्रेय माझ्या अधाशीपणाला द्यायचं कीं तुमच्या सुगरणपणाला ? "

यमू गोंधळून पहात राहिली. परतु तिच्या तोंडून उत्तर गेल " मी कांहींही म्हटलं तरी ते माझ्या अगाशींच येणार. तुमचा प्रश्न मोठा गैरसोयीचा आहे ! "

तो म्हणाला "तें कां ? मला अधाशी म्हटलत तरी मी कांहीं रागवणार नाहीं. एवढंच म्हणेन कीं इतके चागले पदार्थ केल्यावर कोण नाहीं अधाशीपणा करणार ? "

यमूनं विचारलं " शिरा आणि पोहे आवडले तुम्हांला ? "

" बशींत एक कण तरी शिल्लक ठेवला आहे कां बघा कीं ! "

" आणखी आणतें हं." असं म्हणून यमू जाऊं लागली तेव्हा सदानद म्हणाला " आणखी नको रे बाबा. मी तर आतां जेवणार देखील नाहीं."

" वा वा ! " असं म्हणून तिनं मान वेळावली.

तो म्हणाला " खोटं नाहीं. आतां अगदीं भूक उरली नाहीं."

" अजून दीड तास अवकाश आहे. पुन्हा लागेल भूक. इथली हवा अशी चागली आहे कीं तासातासान खावसं वाटत." तिन हसत हसत टेबलावरच्या कपबशा उचलल्या व ती सैपाकघराकडे गेली. जेवणाचे पदार्थ उत्तम करण्याच्या धादलींत ती अगदी गुगून गेली...

" फारच चागला आहे तुमचा बंगला ! " हे शब्द ऐकून यमू दचकली. तिन माग वळून पाहिलं तों सदानद सैंपाकघराच्या दारात उभा होता ! हात पुसता पुसता ती म्हणाली, " बाहेर हिंडायला गेलात उद्या तर फारच आवडेल तुम्हाला आमच हें ठिकाण."

" तुम्ही आणि काका रोज जात असाल?"

काहीं उत्तर न देता यमून चुलीकडे मान वळवली.

तो दारातून पुढें येऊन तिच्यासमोर उभा राहिला आणि म्हणाला, " तुमच्याशीं बोलत इथें बसलो तर तुमची काहीं हरकत नाहीं ना ? " एक स्टुल ओढून घेऊन तो बसलासुद्धा. " तुमच्या हातचे पदार्थ इतके रुचकर कसे होतात तें मला समजेल तरी. तुमच्या हातांत खास कांहीं तरी जादू आहे—"

यमूच्या हातातली पळी खालीं पडली. ती म्हणाली " कुणाशीं बोलता बोलता सैपाक करायची मला सवय नाहीं. तुम्ही इथें बसलात तर माझ लक्ष नाहीं लागायच. "

" अस ? " म्हणून तो हसला परतु उठला नाहीं. बसूनच राहिला. आणि मधून मधून बोलतही राहिला. यमूच्या मनात सारख येत होत, हा उठून बाहेर जाईल तर बर होईल, माझ चुलीकडे थोड तरी लक्ष लागेल, सैपाक चागला होईल. परंतु त्यानं उठून जाऊ नये असही तिला वाटल. कारण त्याच बोलण तिला फार आवडत होत. विलायतेंतील कारखान्याच्या गोष्टी तो तिला सागत होता, आणि मधूनच तिकडल्या सृष्टिशोभेचीं वर्णनं करीत होता. एकदा ती म्हणाली,

" पण इथल्या डोंगरमाथ्याची आणि दरीची शोभादेखील तुम्हांला खचित फार आवडेल. "

तो म्हणाला, " संध्याकाळीं बसमधून घाट चढतां चढता जे पाहिलं

त्यावरून या दरीची शोभा फार चांगली असली पाहिजे अस वाटलं खरच. आता रात्र सपून दिवस केव्हा उजाडेल अस झालंय मला."

यमू म्हणाली, " पूर्वेकडच्या बाजूस एक पॉइंट आहे, तिथून सूर्योदय फार चागला दिसतो. हे दाखवतीलच तुम्हाला."

परंतु वामनराव आपल्या पाहुण्या भाचाला घेऊन हिंडायला जातील ही यमूची अपेक्षा खोटी ठरली. वामनराव रात्रीं दहा वाजता घरीं आले. जेवताना आणि नतर त्यानीं सदानदशीं खूप गप्पा मारल्या. त्याची खूप विचारपूस केली. परतु झोपण्यापूर्वी ते त्याला म्हणाले, " उद्या तू मला सुटी द्यायला हवीस बरं का. पुण्याहून दोघे पटाईत ब्रिज खेळणारे उद्या यायचे आहेत. आमचा अड्डा सकाळीं आठला जो सुरू होईल तो रात्रीं किती वाजेपर्यंत चालेल त्याचा नियम नाहीं. या कारखान्यातले आम्ही सारे लोक ब्रिजचे मोठे षोकी आहोत. आमचा डाव पाह्यला तू ये वाटलं तर. तुझी इच्छा असली तर खेळायलासुद्धा बैस. ब्रिजची आवड तुला आहे कीं नाहीं?"

" अ हं " अस म्हणून सदानंदानं मान हालविली. " पत्ते खेळण मला बिलकुल आवडत नाहीं. बायकाचा घरबशा खेळ आहे तो."

" चुकीची समजूत आहे तुझी!" वामनराव उसळून म्हणाले "बायका काय खेळतात ब्रिजचा डाव? बुद्धिमान पुरुषानींच फक्त खेळावा असा डाव आहे तो!" त्यानीं सदानदशीं वाग्युद्धच सुरू केलं.

सदानंद म्हणाला, " परंतु हा वाद हवाय कशाला? मी तुम्हांला उद्यां सुटी दिली पाहिजे आणि तुम्ही सकाळपासून पत्यांच्या अड्ड्यावर जाणार एवढंच ना? काहीं हरकत नाहीं. मी एकटाच भटकेन उद्या डोंगरावर."

त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो एकटाच हिंडून आला. पण तिसऱ्या प्रहरचा चहा घेतल्यावर तो यमूला म्हणाला, " आतां सध्याकाळीं पुन्हा एकटाच पाठवणार कां हिंडायला तुम्ही मला? नवरा पत्त्याच्या अड्ड्यावर, घरधनीण सैंपाकघरांत चुलीपाशीं! पाहुणा एकटांच रानात भटकतो आहे! काय तुमची ही आदरातिथ्याची रीत? विलायतेहून परत

आलेला भाचा पाहुणा आला, पण मामा आणि मामी त्याला बरोबर घेऊन हिंडायला जायला सुद्धा तयार नाहींत. मी गाशा गुंडाळून संध्याकाळच्या बसनंच परत जावं अशी तर इच्छा नाहीं तुमची ?"

त्याच्या बोलण्याची नाटकी तऱ्हा पाहून यमूला फारच गमत वाटून हसू आल. ती म्हणाली, "इतक्या निकरावर यायच काय कारण ? मी येतें की तुमच्याबरोबर हिंडायला ?"

"हा, अस काहीं म्हणा" असं म्हणून सदानंद हसला. त्यानं कपडे चढविले. त्याच्याबरोबर झपाझप चालता चालता व बोलता बोलता त्याची व आपली फक्त चोवीस तासाची ओळख आहे अस यमूला वाटेना. तिला वाटल, याची आणि आपली फार दिवसाची मैत्री आहे. याला आपला स्वभाव पुरता माहीत आहे. त्याचा आपल्याला माहीत आहे. दोघाच्या परस्पराशीं वागण्यात संकोच मुळींच उरला नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सदानंद परत जावयास निघाला तेव्हा तिला वाटलं आपल्या अंतःकरणाची जागा एकदम रिकामी होत आहे. बसमध्यें तो बसला आणि बस चालू लागली तेव्हा त्याला उद्देशून हात हालवितांना तिला वाटलं ओरडून सागाव "पुन्हा लवकर या."

परतु तिनं न सागताच सदानंद पुन्हा आला !

मग वारवार येऊ लागला !

इतक्या वारंवार कीं यमूला त्याची भीति वाटूं लागली. तो अगदीं प्रथम आला तेव्हा त्याला निरोप देताना "पुन्हा लवकर या" असं ओरडून सागावस तिला वाटल होतं. परन्तु आता दर वेळेस तिला वाटे त्याला सागाव "पुन्हा कधीं येऊ नकोस." एकदा तिन आपल्या मनातल्या साऱ्या गोष्टी त्याला स्पष्ट करून सागितल्याही. "तूं अगदीं प्रथम आलास त्याच्यापूर्वीं माझ आयुष्य कंटाळ्यानं आणि एकटेपणान अंधारं झालेलं होत." ती म्हणाली. "तुला खर वाटणार नाहीं, पण त्या दिवशीं संध्याकाळीं मीं दरींत उडी घेण्यासाठीं निघाले होतें. तूं भेटला नसतास तर मीं जीव दिलाच असता. परन्तु तुला पाहिल्याबरोबर माझं मन बदललं. मरण्याची इच्छा मावळली, जगावंसं वाटूं लागलं. तुला घेऊन घरांत आले

त्याबरोबर वाटल, सगळीकडे कसा प्रकाश भरलेला आहे. ज्या आनंदाचा मला कधीं अनुभव नव्हता अशा आनंदानं माझं आयुष्य तूं भरून टाकलंस. अंधार नाहींसा केलास. प्रकाश पसरलास. तुझे माझ्यावर फार उपकार झाले. पण सदानद, आता हें सारं बंद झाल पाहिजे. कारण या प्रकाशाला आगीचं स्वरूप यायला लागलं आहे. मला प्रकाश हवा होता, परन्तु आगींत भाजण्याची माझी इच्छा नाहीं. मला सुख हव होत, परन्तु मला पाप नको आहे. मला एकटेपणा असह्य झाला होता. मी जीव द्यायला निघालें होतें. परतु आता हे मिळालेल सुख कितीही हवंस वाटलं तरी त्यातलं पाप मला असह्य वाटतं. तू मला फार हवा आहेस. परन्तु म्हणूनच मला तुझी भीति वाटते. तुझ येण बद झाल पाहिजे..."

परन्तु तिचं हे सागण न मानता सदानंद पुन्हा आला. ती त्याच्यावर रागावली नाहीं. "पुन्हा येऊ नकोस" असही तिन त्याला सागितलं नाहीं. सदानदला वाटल तिच मन पालटलं.

तो पुढच्या वेळेस आला तो सुखाच्या नाना कल्पना करीतच! पण तो येऊन पाहतो तो बगल्यात यमू दिसेना. वामनरावानीं त्याला सागितल, "तुझी यमुकाकू मंगळागौरीसाठीं माहेरीं गेली आहे." तें ऐकून त्याला फार आश्चर्य वाटल.

श्रावण संपून भाद्रपद सुरू झाला तेव्हा तो पुन्हा आला. पण वामनराव त्याला म्हणाले, "तुझी यमूकाकू अजून आली नाहीं."

गावातले लोक वामनरावाना विचारीत "काकू केव्हा येणार? तुम्ही खाणावळींत किती दिवस जेवणार?" वामनराव सागत "येईल ती लवकरच." परतु दीड दोन महिन्यानंतर या लपडावाला वामनराव कटाळले व शेवटीं कुणाजवळ तरी ते म्हणाले, "तुमची यमूकाकू पळून गेली अस समजा." मग काय विचारता? घटकाभर गावात सगळीकडे बातमी पसरली कीं, यमूकाकू पळून गेल्या. जो तो वामनरावास सहानुभूति दाखवू लागला आणि त्या गावच्या जनता जनार्दनाच्या मतानं यमूकाकू म्हणजे एक उठवळ बाई ठरली.

वामनरावाबरोबर ससार करता करता वैतागलेली यमू एके दिवशीं

संध्याकाळीं दरींत उडी घ्यावयास निघाली होती हें फक्त सदानंदाला माहीत होत. आणि त्याचप्रमाणे पातिव्रत्याची मर्यादा आपल्याकडून ओलाडली जाऊ नये म्हणून व ज्यावर प्रेम जडल त्याची गाठच पुन्हा पडूं नये म्हणून ती घरातून नाहींशी झाली होती हेंही एकट्या सदानदाला माहीत होतं. कारखान्याच्या गावान जिला दुराचरणी ठरवल होतं त्या यमूची सदानदाला वरचेवर आठवण होई. आणि प्रत्येक वेळेस तिच्या पापभीरुत्वापुढे आणि शुद्ध चारित्र्यापुढें तो आदरान मस्तक वाकवी ! यमूनं स्वतःच्या आयुष्यातून त्याला कायमचं जावयास लावल होतं. ती स्वतः त्याच्या आयुष्यातून कायमची दूर झाली होती. तिच्या इच्छेविरुद्ध तो वागणार नव्हता परन्तु तिची त्याला वारवार आठवण होई व त्याला वाटे यमूच्या दुःखाला आणि त्यागाला काहीं अर्थ आहे काय ? माझी आणि तिची अशी ताटातूट व्हावी याला काहीं अर्थ आहे काय ?—मग त्याच्या मनात येई, कीं हे प्रश्न आजपर्यंत माणसापुढे कितीदा तरी उभे राहिले आहेत ! आणि अजूनपर्यंत कुणालाही या प्रश्नाचीं उत्तरं सापडलेलीं नाहींत !...

मडईवरच्या घड्याळाकडे सुधाताईनीं नजर टाकली आणि ताज्या भाजीनं भरलेली पिशवी हातात नीट सरसावून घेत त्या मनाशीं म्हणाल्या, " अग बाई ! लवकर घरीं गेलं पाहिजे. " अजून त्याचं स्नान व्हायचं होतं, ते आटपून, जेवण करून शाळेची वेळ त्याना साधायची होती. लगबगीनं जावं म्हणून त्यांनीं पाय उचलला. तितक्यात " सुधा " अशी हाक त्याना ऐकू आली. त्यांनीं थबकून वळून पाहिलं, त्याच्याच वयाची एक स्त्री त्याच्याजवळ येता येता म्हणाली, " अग बाई ! तूच का ती ? कशी अचानक भेटलीस ग ! "

त्या स्त्रीला सुधाताईनीं मुळींच ओळखलं नाही. परंतु फार जुनी ओळख असल्याप्रमाणें त्या बाईनं त्याचा मोकळा हात धरला व ती म्हणाली, " बेळगावाहून निघालें तेव्हा तुझ्या अक्काकडून तुझ्या बिऱ्हाडाचा पत्ता विचारून घ्यायला विसरलें. तिनं मला बजावून सांगितलं, कीं पुण्यास जात आहांत तर सुधाला भेटल्याखेरीज राहू नका. मी तिला म्हटलं, हे तू मला सांगायला का हवंस ? पण मग घाईत पत्ता विचारून घ्यायचं विसरलेंच. तुझ्या बिऱ्हाडाचा शोध कुणाजवळ करावा अशा काळजींतच होतें मी, तों तूच अचानक कशी भेटलीस बघ ! कुठें राहतेस तू ? "

आपल्या राहत्या जागेचा संपूर्ण पत्ता सुधाताईनीं सांगितला तेव्हा त्या स्त्रीनं विचारलं, " पण मला कसा ग हा पत्ता सापडायचा ? या पुण्यांतले हे रस्ते अन् हीं घरं भारी गोंधळ उडवतात माणसाचा ! "

तें ऐकून सुधाताई साहजिक म्हणाली, " मी आता घरींच निघालें आहे, आत्ताच येता का माझ्याबरोबर ? "

ती स्त्री म्हणाली, " येता का म्हणजे काय विचारतेस ? तुझ्याकडे यायला मला संकोच का वाटेल ? लहानपणीं तू, तुझी आक्का, आणि मी किती तरी एकत्र खेळलों आहोत. तुझ्याबरोबर नुसती येणारच नाहीं मी, आत्ता जेवायलासुद्धा तुझ्याकडेच राहीन. तुझ्या घरीं संकोच करायला तूं कुणी परकी कां आहेस ? आत्ताच्या सैपाकासाठींच भाजी घेतली आहेस ना? कोबी घेतली आहेस वाटतं ? खरं म्हणजे बेळगांवाहून येतांना तुझ्यासाठीं

कोबी, फ्लॉवर, नवलकोल अशी ताजी भाजी घेऊन यायचं माझ्या मनात होत; पण घाईत सारं राहिलंच बघ.'' खाली वाकून सुधाताईंच्या हातातली पिशवी थोडी उघडी करीत ती बाई पुढे म्हणाली, '' भुईमुगाच्या ओल्या शेंगाहि घेतल्यास वाटत? ही मिठाई काहीं बेळगावला कधीं पाह्यला मिळत नाहीं हो. तुम्ही आक्का पुण्याला आली कीं बेळगावला परत येताना टोपलीभर ओल्या शेंगा आणते आणि आणल्या कीं मला त्यातल्या चार मुठी तरी पाठविल्याखेरीज राहात नाहीं. मला फार आवडतात भाजलेल्या शेंगा.. !''

भाजलेल्या शेंगाची भोक्ती ही बडबडी बाई कोण असावी याचा जोरजोरान तर्क करीत सुधाताई तिला घेऊन बिऱ्हाडाच्या वाटेन पावल टाकीत होत्या. एखाद्या खूप वर्षांच्या ओळखींतल्या माणसाप्रमाणें ती बाई बोलत होती, आक्काचं नाव वरचेवर घेत होती, परतु त्या बाईच नाव सुधाताईंना काहीं केल्या आठवत नव्हत इतकच नव्हे, तर त्या बाईला आपण पूर्वी कधीं कुठें पाहिल त्याची देखील आठवण होत नव्हती. असा विसराळूपणा त्याच्या स्वभावात नव्हता. उलट, माणसाचे चेहरेच नव्हे, तर त्याचीं सबद नावदेखील आपल्या लक्षात उत्तम राहातात या गोष्टीचा त्याना अभिमान होता. हाताखालून गेलेल्या विद्यार्थ्यांचीं आडनावच नव्हे तर आद्याक्षरदेखील त्याना मुखोद्गत असत. का. न. भिडे, वि. रा. पटवर्धन अशा प्रकारें सबद कॅटलॉग त्याना पाठ असे. परंतु या बाईच नाव त्याना काहीं केल्या आठवेना! रस्त्यान जाता जातां त्या सारखा विचार करीत राहिल्या कीं हिच्या भावना न दुखविता हिच्याकडून हिच नाव काढून घेण्यासाठीं काय युक्ति करावी? वाटभर त्या बडबड्या बाईचं बोलण चालू होत. सुधाताई एकीकडे हु हु करीत होत्या, परतु दुसरीकडे तिचं नाव माहित करून घेण्याची युक्ति त्याचं मन शोधीत होत.

दारात पाऊल टाकताच त्यानीं सैपाकीणबाईला हाक मारली व तिच्या हातीं भाजीची पिशवी देत म्हटल, ''मी एकटीच जेवायची नाहीं बर का. या पाहुण्या आल्या आहेत. आमच दोघींचं.'' मग त्याच्या डोक्यात एक कल्पना एकदम आली व पाहुण्या बाईकडे पाहात त्या हसून म्हणाल्या, '' आमच्या या सैपाकीणकाकू मोठ्या विचित्र आहेत. माझी

कुणी मैत्रीण आली की नुसतं माझी मैत्रीण एवढच समजल्यान त्याचं समाधान होत नाहीं, त्या सरळ मैत्रिणीला म्हणतात, तुमच नाव सा।.।. ” त्यानीं हळूच सैपाकीणकाकूना डोळा घातला आणि त्या बाईच्या तोंडून तिच नाव आतां बाहेर पडेल अशा मोठ्या आशेन त्या तिच्या तोंडाकडे बघत राहिल्या,

परतु नाव सागण्याऐवजीं ती बाई सैपाकिणीला म्हणाली, “ काकू, आधी चागला गरम चहा करा बाई. ” सुधाताईकडे पाहून ती पुढे म्हणाली, “ तुझ्या घरात मला कसला संकोच ? तू कुणी परकी कीं आहेस मला ? ”

सुधाताई हसल्या, परतु मनातल्या मनात त्या अगदीं अस्वस्थ झाल्या. ही बाई अगदी पहिल्यादा मडईपाशीं भेटल्याबरोबरच आपण सरळ तिला तिचं नाव विचारल असत तर बर झाल असत, तिला ओळखल्याच सोंग आपण त्या वेळेस केल हेंच चुकल, आता तिला तिचं नाव विचारणं अवघड झालं आहे व अधिकच अवघड होणार आहे, या विचारन त्याना थोडीशी चीड येऊं लागली.

त्या बाईन विचारलं “ हें ग काय सुधा ? तुझे मिस्टर कुठें दिसत नाहींत ? सैपाकीणकाकूंनाहि आपण दोघीच जेवायचं म्हणून सागितलंस ? ”

“ फिरतीवर गेले आहेत. ” अशी आपल्या नवऱ्याबद्दलची माहिती त्या चौकस बाईला पुरवून सुधाताई पुढे म्हणाल्या, “ आता चहा झाला कीं आघोळीबिंघोळ लवकर आटपायची बर का. जेवण आटपून मला शाळा साधायची आहे. ”

“ म्हणजे, तूं नोकरी करतेस कीं काय ? ”

“ दिवसभर घरात बसून राहून तरी काय करायचं ? म्हणून –”

“ मूल झालं नाहीं तोवर अस म्हणशील ! का मूलच नको म्हणून ठरवलय तुम्ही नवराबायकोनीं ? हे अलीकडचे थेर मला नाहीं पसत. घरात मुलं पाहिजेत बाई. मला चार मुलं झालीं आहेत; पण आणखी हवीशीच वाटतात. आमचे हे मला सागतात, अमुक वस्तु वापरू, तमुक वापरू; पण असला घाणेरडेपणा मला नाहीं आवडत.”

तितक्यात काकूंनीं चहा तयार करून आणला. तो ढोसून ती बाई खोलींतल्या तसबिरी पाहूं लागली, आणि हा फोटो कुणाचा, तो कुणाचा अशी चौकशी करू लागली. सुधाताई तिला म्हणाल्या, " ते फोटो मग बघा. आधीं आघोळ करून घ्या, मला शाळेंत जायचं आहे."

ती बाई म्हणाली. " वा ग वा ! कधीं नव्हे ती मी तुझ्या घरीं आलें आणखी तू मला घाईन जेवायला घालून शाळेत जाणार होय ? तें कांहीं नाहीं आजच्या दिवसाची रजा काढ."

सुधाताईंच्या मनात आलं, आता काय कराव या बाईला ! ही कांहीं आता झटपट आटपणार नाहीं, जेवायला तासभर लावील. शाळेतले पहिले दोन तास तरी बुडवण मला भाग पडेल. आणि चमत्कार असा, की हिचं नांवदेखील मला आठवत नाहीं, तें हिच्याकडून कसं काढून घ्याव ते सुचत नाहीं, हिची माझी ओळख कुठली तें कांहीं केल्या लक्षात येत नाहीं !... पण आता त्या बाईच्या कचाट्यांत त्या पुरत्या सापडल्या होत्या. शेजारच्या बिऱ्हाडातला मुलगा त्याच्या शाळेंतच जाणारा होता. दोन तासाची रजा मागण्यासाठीं त्यांनीं चिठी खरडली व त्या मुलाबरोबर पाटवून दिली.

पाहुण्या बाईन बंबातल दोन बादल्या पाणी सपवून आघोळ करायला एक तास लावला. सुधाताईंना गार पाण्यानंच कसं बसं स्नान आटपावं लागलं. जेवणाच्या वेळेस त्या बाईची चर्पटपजरी पुन्हा सुरू झाली. तिचा दीर बेळगावच्या म्युनिसिपालिटींत अकाऊंटंट होता वाटत. त्याच्यावर पैसे खाण्याबद्दल कुभांड कसं रचण्यात आलं व खटला करण्यांत आला त्याचं आख्यान तिनं चालू केल. या आख्यानात सुधाताईंना कशी गोडी वाटणार परतु ती बाई ज्याप्रमाणे सपासप घास घेत होती, त्याप्रमाणेंच बोलत होती. सुधाताईंच्या मनात एक युक्ति आली व त्या खोटंच म्हणाल्या,

" होय, वर्तमानपत्रांत या केसबद्दल वाचल्याच आठवत खरं. तुमच्या दिराचं नावदेखील छापून आल होतं नाहीं ? ... काय बरं त्याचं सबध नाव ? " त्या मोठ्या आशेनं त्या बाईच्या रवंथ करणाऱ्या जबड्याकडे पहात राहिल्या. त्याना वाटलं ती आपल्या दिराचं सबंद नाव सागेल आणि मग निदान हिचं आडनांव तरी कळेल.

पण ती बाई आता कढीची दुसरी वाटी रिकामी करून खालीं ठवीत म्हणाली, काय सागायच मेल्याचं नाव ! मोठं रामलक्ष्मणाच पवित्र नावच कीं नाहीं ? मी आमच्या ह्याना नेहमीं म्हणते, कीं तुमचे सख्खे भाऊ असे दिवटे कसे हो ? नवऱ्याला नात्यागोत्याचीं फार माणस असण वाईटच बघ ! तुझ्यामाग दीरानणदाचा लबेदा नाहीं, फार सुखी आहेस तू. ”

सुधाताई स्वतःशीं म्हणाल्या, पण हिला माझी इतकी खडान् खडा माहिती आहे ? आक्काला आणि मला ही फार वर्षांपासून ओळखत असली पाहिजे खास. परतु मी तर हिला पूर्वीं कधीं पाहिल्याच आठवत नाहीं. काय चमत्कार आहे ! त्या तिच्याकडे इतक निरखून पाहू लागल्या, कीं जणु एखाद्या पत्रातल्या किरट्या अस्पष्ट अक्षराकडे सूक्ष्मदर्शक काचेतून त्या पाहत होत्या. परतु काहीं केल्या ती ‘ लिपी ’ त्याना लागेना.

जेवण आटपल्यावर पुढल्या खोलीत बसून सुधाताईंनीं पुढे केलेल्या डब्यातल्या सुपारीच्या भुकटीचा फराळ त्या बाईन सुरू केला, आणि दुसरं एक आख्यान सुरू केल. तिच्या भाचीच सोलापूरला लग्न होतं. तिकडेच ती निघाली होती. ती भाची लाखातली एक मुलगी असल्याच सुधाताईंना पटवून देण्यासाठीं तिच गुणवर्णन ती करू लागली. “. . .सघात जाते ती. नाटकात काम करते फिडिल अस वाजवते कीं ऐकतच राहव बाळी म्हणजे एक रत्न आहे. तू पाहिली असलशीच की तिला. आठवते ना. ?”

बाळीला पाहिल्याच कबूल करण्याऐवजीं सुधाताईंना जबरदस्त इच्छा झाली, कीं त्या बाईला सरळसरळ विचाराव, “ माफ करा, पण तुमची ओळख कांहीं मला अजून पटत नाहीं. तुम्हाला मी जेवायला घातल, तुमच्यासाठीं शाळेतले दोन तास बुडवले, पण खर म्हणजे तुमच नावसुद्धा मला माहीत नाहीं. विचारते याबद्दल रागावूं नका, पण तुमच नाव काय ?” परंतु हा अशिष्टपणा करण्याच धाडस त्याना करवलं नाहीं. उलट त्यानीं म्हटल, “ बाळी आठवते तर ! न आठवायला काय झाल ? ”

या उत्तेजानं त्या बाईच्या “ बाळीवर्णना”ला आणखी भरती आली. बाळीच्या लग्नाच आख्यान तिनं आणखी अर्धा तास चालवल ; आणि मग एकदम आठवण झाल्याप्रमाणें ती म्हणाली, “ तुझ्याकडे एक काम आहे सुधा. विसरतच होतें. कशी वेंधळी पहा मी ! ”

सुधाताई तिच्याकडे पहात राहिल्या. आता ही बाई कसल काम काढते ?

ती बाई म्हणाली, " भाचीच्या लग्नाला जायच तर आहेर न्यायला हवा ना चागला ? निघताना मी पुरेसे पैसे घेतले होते बरोबर, पण आता कमी पडणारस वाटतय. या दिवसात पैसे कसे उडतात ते तुला माहीत आहे. सोलापुरला काहीं मनाजोग्या वस्तू मिळणार नाहींत म्हणून आहेराची खरेदी इथे पुण्यालाच करणार आहे. मला पंचवीस रुपये देशील तर मोठं काम होईल. सोलापुरला गेल्याबरोबर तुला पाठवून देईन. करतेस का माझ एवढ काम ? कर बाई. "

" मोठ्या आनदानं दिले असते हो, पण घरातच इतके शिल्लक नाहींत बघा ! " अस सुधाताईना उत्तर देता आल असत. परन्तु वीस मिनिटापूर्वींच पोस्टमनन त्याचा मार्ग बद केला होता. त्याच्या एका गोष्टीचे बरोबर पचवीस रुपये सपादकाकडून आले होते. ही बाई एकदाची गेल्यावर ठेवू सावकाश कपाटात, अशा विचारानं मनिआर्डरीच्या नोटा सुधाताईनीं पुढच्या बसायच्या खोलींतच टेबलावरच पेपरवेटखालीं राहू दिल्या होत्या. वक्तशीर पैसे पाठविणाऱ्या सपादकाचा आणि ते आणून देणाऱ्या पोस्टमनचा सुधाताईना भयकर राग आला. त्यानीं पाहिल तो त्या बाईची काकदृष्टि पेपरवेटखालच्या त्या नोटावरच होती...!

ती बाई पुन्हा म्हणाली, " सोलापूरला गेल्याबरोबर तुला मनीआर्डर करीन. का तुझे पैसे बुडवीन असे वाटतय तुला ? तस असेल तर — "

" छे छे ! हे काय हो तुमचं बोलण ? मी काय इतकी ही आहे होय ?" असं काहींसं पुटपुटत सुधाताईनीं मुकाट्यान पेपरवेट उचलल, आणि नोटा त्या बाईच्या हातात कोबल्या !

अगदीं जिवणी फाडून हसत ती बाई म्हणाली, "आता माझ्या बाळीला माझ्या मनाजोगा आहेर घेता येईल हो मला...तुझे कसे आभार मानूं ? "

" शी, आभार कसले मानता !" मनातला सारा संताप दडपून सुधाताईनींसुद्धा दात विचकले.

अखेर ती बाई उठली व निघाली. जाताना तिन सुधाताईना धीर दिला, " अगदीं सोलापूरला गेल्याबरोबर पाठवून देतें हं तुझे पैसे."

" सावकाश पाठवा हो. पैशाचं काय मोठंसं ? " सुधाताई म्हणाल्या. ती बाई गेल्याबरोबर त्यानीं धाडकन् दार लावून घतल आणि " सुटलें बाई एकदाची !" असा उद्गार काढला. त्या बाईचं नाव अजूनदेखील त्याना आठवलं नव्हतं.

संध्याकाळीं शाळेतून आल्याबरोबर त्यानीं आपल्या बेळगावच्या बहिणीला पत्र लिहिल. त्या बाईच वर्णन लिहिलं, एकंदर प्रकार इथ्थंभूत लिहिला आणि शेवटीं त्यानीं आक्काला विचारल, " या बाईच नाव काय ? मला काहीं केल्या आठवत नाहीं. "

तीन दिवसानीं आक्काच उत्तर आल. तें वाचून सुधाताई थक्कच झाल्या. त्यानीं लिहिल होत–" तूं लिहितेस त्या वर्णनाची बाई थोड्याच दिवसापूर्वी माझ्याकडे अशीच आली होती. पुण्याहून आले आणि आक्काना भेटल्याखेरीज राहू नका म्हणून तुमच्या सुधान बजावल आहे अस ती म्हणाली. अशीच माझ्याकडे जेवायला राहिली; खूप बडबडली. भाचीच्या लग्नासाठीं धारवाढला निघालें आहे, वाटेत बेळगांवला उतरले, अस तिन सागितलं. चांगला आहेर घ्यायचाय, पैसे कमी पडताहेत, असंच मलाहि म्हणाली अन् माझ्याकडून पंचवीस रुपये घेतलेन्. धारवाडला गेल्याबरोबर मनिऑर्डर करतें अस वरचेवर बजावून गेली. तिचं नाव तिच्या तोडून काढण्यासाठीं मीं हजार युक्त्या केल्या, पण तिन तें काहीं सागितल नाहीं. मला तर तें मुळींच आठवेना. खूप दिवसांच्या ओळखीच्या मैत्रिणीप्रमाणे तिन गप्पा मारल्या. मी अगदीं बुचकळ्यात पडलें, की ही बाई कोण अन् मला हिच नाव कस आठवत नाहीं ? तुला विचाराव म्हणून मी तुला पत्र धाडणारच होतें, इतक्यांत आज तुझच पत्र आलं !"

सुधाताईनीं अक्काच्या पत्राची घडी केली. त्या मनात समजल्या कीं आपले पंचवीस रुपये गेले !

जयंतचं आडनाव 'खरे' होतं. 'खरेपणा'चा आणि त्याचा अशा प्रकारे जन्माचा संबध जडला असल्यामुळे आणि या जन्माच्या गुलामगिरी-विरुद्ध शक्य तेवढ बंड करण्याच्या साहजिक इच्छेमुळेंच कीं काय कोण जाणे, तो फार क्वचित् खरं बोलत असे. आपल्या आडनावाविरुद्धचा हा बडावा त्यानं अगदीं लहानपणापासून पुकारला होता. अगदीं नाईलाज झाला तरच तो लहानपणीं खरं बोलत असे. क्षुल्लक बाबतींतच खोट बोलाव महत्वाच्या बाबतींत बोलूं नये, असा पक्तिप्रपच त्यानं कधींच ठेवला नाहीं. किवा अमक्याशीं खरं बोलायचं, तमक्याजवळ खोट बोलायच, असाहि भेदभाव त्यान केला नाहीं. खर सागण्यापेक्षा खोटं सागितलं कीं काहीं तरी घोटाळे निर्माण होतात व गंमत होते अशी अनुभवान त्याची खात्री पटली होती, आणि या गंमतीची त्याला चटक लागली होती. कित्यकेदा ही गमत अक्षरशः त्याच्या अंगावर बेतत असे. परन्तु तशी बेतली तरींदेखील 'कस फसवल ! कशी गंमत केली !' अस त्याला म्हणता येतच असे, व खोटं बोलण्याचा आपला प्रयोग वाया गेला नाहीं अस समाधान त्याला मिळत असे. त्याचा दादा शिकवणीसाठीं मास्तराकडे गेलेला असला आणि कुठें गेला म्हणून वडिलानीं विचारल तर तो चटकन् सागत असे दादा मघाशींच पोहायला गेला. आपल्या ताईच्या हालचालींबद्दलहि तो अशाच खोटया कंड्या उठवी, आणि नतर होणारी गंमत बघत राही. खोटंनाटं रचून सागण्यासाठीं त्याला आपली कल्पना-शक्ति चालवावी लागे. त्या गोष्टीचा त्याला अवर्णनीय आनंद होत असे. खोटं बोलण्याचा त्याचा सराव जसजसा वाढत गेला तसतशी त्याची कल्पना-शक्ति अधिकाधिक तरल होत गेली. पाहता पाहता खोट बोलणं म्हणजे त्याला तळहाताचा मळ वाटायला लागला. घरचीं माणसं, शाळेंतले मास्तर, सवंगडी, सगळ्यांना प्रत्येक गोष्टींत थापा मारण्याचं त्याला व्यसनच लागल...

तो मोठा होत गेला, शाळा पुरी करून कॉलेजांत गेला तरी खोटं बोलण्याचं त्याचं हें व्यसन काहीं सुटल नाहीं. त्याच्या त्या व्यसनाला थोड

निराळं वळण लागलं इतकंच. अगाशीं येणारी भलतीच थाप ठोकायची नाहीं असा विवेक तो ठेवू लागला. हें तारतम्य बाळगूनहि पुष्कळ बाबतींत थापा मारता येतात, असं त्याला आढळून आलं. ज्या गोष्टींचा खरे-खोटेपणा पडताळून पाहणं अशक्य आहे, अशा गोष्टींत तो आपली तल्लख कल्पना चालवी आणि वाटेल तसं खोटं बोले. उदाहरणार्थ, माझे वडील टिळकांच्या अगदीं निकटवर्ती मित्रांपैकीं होते असं सांगायला काय हरकत होती ? टिळक आता हयात नव्हते, आणि जयंत बी. ए. च्या वर्गात असताना त्याचे वडीलहि निवर्तले होते. मी गडकऱ्यांचा अगदीं आवडता चेला होतों, अशी गरगरीत थाप पुष्कळ कवि आणि साहित्यिक ठोकून देतात हे तो पाहत होता. त्या ' फॉर्म्युल्या 'चा उपयोग करून खोट्या थापा देण्याची आपली हौस त्याला हवी तेवढी भागविता येत असे. हयातांपेक्षा मयतांची संख्या अधिक होती, आणि त्यामुळें त्याच्या खोट्या थापांचं क्षेत्र अगदीं विस्तृत होतं रामजी, निसार यांसारखे क्रिकेटर, दीनानाथ, लोंढे यांसारखे गायक नट, मास्टर विनायकसारखे दिग्दर्शक, खाडिलकरांसारखे नाटककार व संपादक, ही सारी मंडळी इहलोक सोडून गेलेली होती. या साऱ्यांशीं आपली फार दाट ओळख असल्याचं जयंताला सहज सांगता येत असे. कुणी म्हटलं होतं तू मोठा क्रिकेटर होशील, कुणी त्याच्या गाण्याची तारीफ केली होती, कुणी तो नट होणार म्हणून भविष्य केलं होतं, कुणी त्याला म्हणाले होते तूं मोठा साहित्यिक होशील...

कॉलेजात प्रोफेसरचं काम करू लागल्यापासून जयंत असल्या थापा जास्त प्रमाणात देऊं लागला. " मी मोठा क्रिकेटर व्हायचा हो " किंवा " मी मनात आणलं असतं तर मोठा नट झालों असतों " असं तो म्हणे, आणि आपली प्रोफेसरकी म्हणजे आपल्या आयुष्यातला एक अपघात आहे असं दर्शवून स्वतःचा चौफेरपणा ऐकणारांना पटवी. जिचा खोटेपणा उघडकीस येणार नाहीं अशींच थाप मारण्याची काळजी प्रोफेसरचा प्रतिष्ठित धंदा करूं लागल्यापासून जयंतला घेणं भाग पडूं लागलं. त्यामुळे त्याच्या खोटं बोलण्याच्या हौसेचा कोंडमारा होत असे. व्याख्यान ऐकणाऱ्या वर्गातल्या मुलांमुलींवर " इंप्रेशन " मारण्यासाठीं सारेच प्रोफेसर थापेबाजी करीत असतात, ही गोष्ट फार सोयीची वाटल्यामुळेच त्यानं फक्त दीडशें

रुपये पगाराची प्रोफेसरकी पत्करली होती. परतु नेमलेला विषय वर्गात शिकविताना– म्हणजे तो व्यवस्थित शिकविण्याची स्वतःची नालायकी झाकताना– माणूस मारून मारून कितीशा थापा मारणार? जयतनं लहानपणापासून अभ्यासपूर्वक कमाविलेल्या कलेला एवढी सधि पुरेशी वाटण्यासारखी नव्हती. पुण्या-मुबईच्या मुलुखात स्वतःचा प्राध्यापकाचा दर्जा सभाळण आवश्यक असल्यामुळें त्याला आपल अभिजात कलासामर्थ्य आवरून धराव लागे. दिसेल त्या झाडावर कुऱ्हाड चालवू पाहणाऱ्या छोट्या वॉशिंग्टनप्रमाणें लहानपणीं जयतनं खोटंनाटं रचून सागण्याचं जें हत्यार अनिर्बंध चालविल होत, ते तसच चालविण आता मोठेपणीं त्याला शक्य नव्हतं. "रम्य ते बालपण" हें पद गुणगुणताना त्याच्या मनात हाच अर्थ असे...

मात्र पुण्या-मुबईत त्याला जे करता येत नसे ते तो अनोळखी मुलखात प्रवासाला गेला कीं मनसोक्त करून घेई. एकदा मद्रास-मदुरा या बाजूला तो एकटाच हिंडायला गेला तेव्हा विख्यात हॉकी खेळणारा ध्यानचद याचा भाऊ रूपचद तो मीच, अस त्यानं खुशाल सागितल. एका गावीं तर त्यान सत्कारदेखील करून घेतला, आणि वृत्तपत्रात वाचून मिळविलेल्या माहितीवरून हॉकीच्या सामन्यातले आपले अनुभवदेखील श्रोत्याना सागितले. एकदा तो गोव्यात हिंडत असताना रात्रीच्या वेळेस एका हॉटेलात पलिकडच्याच टेबलावर बसलेल्या तीन चार मंडळींनीं त्याला विचारलं,

"प्रोफेसर जयंत खरे आपणच काय?"

त्यान उत्तर दिल, "फार लोक मला हा प्रश्न करतात बुवा! मी खरोखरच प्रोफेसर खऱ्यासारखाच दिसतो कीं काय?"

प्रश्न विचारणारे चाट झाले. त्यातला एकजण म्हणाला "हॅ! तुम्ही बनवता आहा आम्हाला."

"का तुम्ही बनवता आम्हाला?"

"म्हणजे प्रोफेसर खरे खरच नाहीं तुम्ही?"

"आता काय सागाव?—"

"मग?"

" माझा कॉट्रॅक्टरचा धंदा आहे. "

" कुठे ? "

' मुबईत !'

" अरे वा ! बरं झाल कीं, आम्ही मुबईचेच आहोंत. कधी मधीं भेट—"

" जरूर " अस म्हणून तोंडाला आला तो ऑफिसचा पत्ता जयतनं ठोकून दिला होता. आणि नतर त्याच्या बैठकींत सामील होऊन कॉट्रॅ-क्टरच्या धद्यातल्या कित्येक गमती त्यानं त्या मुशाफिराना सुनावल्या होत्या.

त्याच्या अगीं कल्पकता होती त्याप्रमाणेंच बहुश्रुतपणा होता. त्यामुळे जें खोटं सोग तो आणी तें उत्तम प्रकारें वठाविण त्याला शक्य होई.

साराश जयत खरे जरी एका नामाकित कॉलेजातला प्रतिष्ठित प्रोफेसर झाला होता तरी खोटेपणाची जन्मजात हौस त्यानं सोडली नव्हती. ती हौस भागविण्याचे प्रसंग तो जरा काळजीपूर्वक निवडीत असे एवढंच. खोटे-पणावर त्याचं फार प्रेम होत. मंजुळेवर जेव्हा त्याचं प्रेम जडलं तेव्हा तिचं नाक त्याला चाफेकळीसारखं वाटल, ओंठ तोंडल्यासारखे, डोळे कमळा-सारखे, भुंवया धनुष्यासारख्या, हें सारं झालच. परंतु सगळ्यात अधिक त्याच्या पसंतीस काहीं उतरलं असेल तर तें तिच आडनाव ! तिच आडनाव " खोटे " होतं ! वर्गाच्या हजेरीपटात जेव्हा " मंजुळा खोटे ' हें नांव त्यानं वाचलं त्या वेळेसच तिच्यावर प्रेम करायला त्यान सुरवात केली. तिच्याशीं सूत जमविण्याचे त्याचे प्रयत्न जेव्हा सफल होऊ लागले तेव्हा त्यानं तिला कॉलेज बदलायला लावल. ती त्या गोष्टीला तयार होईना. ती म्हणाली,

" मी दुसऱ्या कॉलेजात गेलें तर तुम्ही कसे मला सारखे दिसाल ? "

त्यानं तिची समजूत घातली, " तुझा प्रश्न बरोबर आहे. परंतु एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी. "

" कोणती ? "

" ज्या कॉलेजांत मी काम करतों त्या कॉलेजचे चालक आहेत भटजी. माझ्या वर्गातल्या एखाद्या मुलीशीं मीं लग्न लावलं तर शातं पापम् म्हणून ते ओरडत उठतील, आणि मला नोकरीवरून काढतीलसुद्धां ! ते

सारेजण मोठे शुद्ध आहेत असं नाहीं. त्याचींहि एकेक लफडीं आहेत, पण " जें करायचं तें चोरून " या आर्यसंस्कृतीचे चाहते आहेत ते. तू दुसऱ्या कॉलेजात असलीस तरी विद्यार्थिनीच असशील, पण माझ्या वर्गातली नसशील. मग मी तुझ्याशीं एक सोडून दहा लग्नं केलीं तरी आमचे भटजी चालक अक्षता टाकायला येतील ! म्हणून म्हणतों तू कॉलेज बदल."

मंजुळेनं त्याचं ऐकलं होतं. नंतरच्या तीन वर्षांत दोघानीं एकमेकांवर मनसोक्त प्रेम केलं होतं. मंजुळेचे वडील दादासाहेब खोटे मुंबईत सी. आय. डी. खात्यांत मोठ्या हुद्यावर होते. त्यांना मंजुळेच्या आणि जयंतच्या प्रेमाची कल्पना नव्हती. पण आता साऱ्या गोष्टी त्यांच्या कानावर घालण्याची वेळ आली होती. चालू सुटींत मंजुळा मुंबईस गेली तेव्हां जयंतला सांगून गेली होती कीं " हलके हलके मी दादांना सारं सांगेन. त्यांचं मन तयार करीन, आणि आपल्या लग्नाला सम्मति देण्याच्या लहरींत ते आहेत असं दिसल्याबरोबर तुला बोलावीन. तूं ये, दादांना भेट आणि मला मागणी घाल."

तेव्हां आता आज रात्रीं मुंबईला जाणाऱ्या रात्रीच्या शेवटच्या पॅसेंजरमध्यें सेकंडक्लासच्या एका डब्यात बसलेल्या दोघा सहप्रवाशाशीं गप्पा मारणाऱ्या जयंतला जेव्हां त्यानीं विचारलं, " मुंबईला कशासाठीं चाललां आहात ? " तेव्हां जयंतनं खरं म्हणजे सांगायला हवं होतं, अमक्या अमक्या गृहस्थांना भेटण्यासाठीं. त्यानं मंजुळेवरच्या प्रेमाची हकीगत आणि दादासाहेब खोट्यांचं नाव प्रवासातल्या त्या सोबत्यांना सांगायला हवं होतं असं नाहीं, परंतु काहीं कामासाठीं एका गृहस्थांना भेटायला चाललों आहे एवढं म्हटलं असतं तरी भागलं असतं, आणि मग गप्पा दुसऱ्या विषयाकडे वळल्या असत्या. पण एक विलक्षण थाप मारण्याची जयंतला लहर आली आणि ती ठोकल्यावाचून त्याला राहवेना...

डब्यात एकंदर चार बर्थ्‌स होत्या. खालच्या दोहोंपैकीं एकीवर एक गृहस्थ गाडी सुटल्यापासून तोंडावर गुडुप पांघरूण घेऊन निजले होते. खालची दुसरी बर्थ जयंतची होती. वरच्या दोन बर्थस् ज्यानीं रिझर्व केल्या होत्या ते वर चढून निजण्यापूर्वीं थोडा वेळ म्हणून जयंतच्या बर्थवर बसले. गप्पा सुरू झाल्या. त्या दोघानीं जयंतला विचारलं, " कुठें मुंबईला

कां ?" तेव्हा त्यानं "हो" म्हटलं. पुढचा प्रश्न ओघानंच आला, "कशासाठीं जाता ?"

हा प्रश्न ऐकल्याबरोबर फार दिवस उपाशी राहिलेली गरगरीत थाप लगावण्याची जयतची भूक एकदम कडकडून उठली. एखाद्या लेखकाच्या मनांत लघुकथेचा किंवा नाटकाचा विषय येतो तो ज्याप्रमाणे कथानकाचा सबद आराखडा घेऊनच, त्याप्रमाणे जयतला पुष्कळदा एखादी थाप सुचे ती तिच्या साऱ्या तपशिलासकट ! आता तसच झाल. मुबईला कशासाठीं चालला आहात हा प्रश्न ऐकल्याबरोबर नुसतच खोटं बोलायच जयतच्या मनांत आल नाहीं, तर जी थाप द्यायची तिची सपूर्ण संपादणी कशी कशी करायची त्याचा देखील "ब्ल्यू प्रिंट"च त्याच्या कल्पनेन तयार करून त्याच्यापुढे धरला.

योग्य अभिनय करून तो म्हणाला, "बिझिनेससाठीं !"

त्याचे दोघे सहप्रवासी बुचडेवाले मद्रासी होते. कपाळाला मोठ गंध, कानात हिऱ्याच्या फुल्या, कमरेला लुंगी, अगात रेशमी शर्ट, गळ्याभोवतीं रुईफुली जरीकाठाच उपरणं, डाव्या मनगटावर सोन्याच घड्याळ अशा थाटाचे दक्षिणात्य होते ते. त्याच आणि जयताच सार बोलण इग्रजींत चालल होतं. "बिझिनेससाठी" म्हटल्यावर पुढचा प्रश्न ओघानच आला.

"कसला बिझिनेस करता ?"

जयंतनं उत्तर दिल, "हैद्राबादला टॉफीचा कारखाना आहे आमचा. 'सालरजग टॉफीचे' चे डबे तुम्ही पाहिले असतील. मद्रासच्या 'हिंदू' मधे देखील आमची जाहिरात असते. तुम्ही पाहिली असेल कीं."

'सालरजंग टॉफी' त्या बुचडेवाल्यानीं जन्मात पाहिली नव्हती. तिची जाहिरात त्याना कधीं दिसली नव्हती. परतु असेल बुवा अस म्हणून सालरजग टॉफीची बात गिळून टाकणं त्याना भागच होत. हेच तर जयतचं खरं कौशल्य होतं.

एका बुचडेवाल्यानं विचारलं. "सालरजग हें तर मुसलमानी नांव आहे —"

जीभ जरासुद्धा अडखळू न देता जयत म्हणाला, "हा बरोबर आहे. मी मुसलमानच आहे माझं नाव हुसेन."

कल्पकता आणि बहुश्रुतपणा हे गुण जसे जयतच्या थापेबाजींत उपयोगी पडत त्याप्रमाणें त्याच्या शरीराची आणि चर्येची ठेवण उपयोगी पडे. त्याला सुटाबुटात पाहणाराला तो ब्राह्मण तर राहोच, पण हिंदुदेखील वाटत नसे तो मुसलमान असावा असं वाटे.

एक बुचडेवाला म्हणाला, "अस्स ?"

दुसऱ्यानं विचारलं, "मग मुंबईला कशाला चालला ?"

जयत म्हणाला, "करीमभाई खटखटे ऐकून माहित असतील आपल्याला."

त्या दोघानीं हें नाव ऐकलं नव्हतं. तथापि ते म्हणाले. "बरं–"

"कोट्याधीश आहेत. आगाखानाचे जवळच्या नात्यातले आहेत. त्याच्याशीं एक मोठा 'डील' करायचा आहे.

"अस्स ?"

"हा. 'डील' जर का ठरला तर खोऱ्यानं पैसे ओढीन मी. अन् माझी खात्री आहे कीं, माझी योजना करीमभाई खटखट्यांना मान्य होईल, आणि मी म्हणतों त्या बिझिनेसमध्ये दहा लाखाचं भाडवल ते गुंतवितील."

"टेन लॅक्स ? ओ यो यो ? माय गॉड ? कसला नवा बिझिनेस काढणार आहात ?"

"तुम्हाला सांगितलं तर हसाल. पण शेंकडा आठशे टक्के फायदा देणाऱ्या धंद्याची कल्पना काढली आहे."

"ओ यो यो. सांगा तरी."

जयतनं विचारलं, "चिकी खाल्ली आहे का कधीं, चिकी ?"

एक बुचडावाला म्हणाला, "चिकी ? व्हॉट इज दॅट ?"

पण दुसरा बुचडा म्हणाला, "चिकी ? ओ यो यो ! खाल्ली आहे. माहीत आहे." त्यानं वर्णन करून आणि जबडा हालवून आपल्या देशबांधवाला चिकीची कल्पना दिली.

दोघेहि बुचडेवाले जयतची "चिकी–योजना" उत्सुकतेनं ऐकूं

लागले. जयंत सागत होता, "आपल्या देशात ज्याप्रमाणें पानपट्टी खाण्याची लोकाना सवय आहे त्याप्रमाणे अमेरिकेत "च्यूइंग गम" लोक सारखा तोंडात धरतात. उत्तमपैकीं चिकी तयार करून अमेरिकेंत धाडली तर हा हां म्हणता पॉप्युलर होईल आणि प्रचड मार्केट मिळेल. आपल्या इकडे लोक सिनेमाला गेले कीं शेगदाणे खातात. अमेरिकेंत श्रीमत लोक चॉकोलेट खातात. गरीब लोक च्यूइंग गम चघळतात. उत्तम खमंग चिकी करून करून सुदर सुंदर डब्यात भरून पाठविली तर गरीब अमेरिकन तर ती आवडीन घेतीलच, पण श्रीमंत लोकदेखील चॉकोलेट डबे टाकून देतील आणि आमची चिकी खाऊ लागतील. एकट्या न्यूयॉर्क शहरात चारशें थिएटर्स आहेत, म्हणजे एकदर अमेरिकेंत किती असतील बघा. रोज कित्येक लक्ष अमेरिकन स्त्री-पुरुष सिनेमा पहातात. त्याच्या तोंडात आपल्याकडची चिकी भिजू लागली कीं आमच्या 'सालरजंग चिकी'चे डबे टनावरी खपतील कीं नाहीं सागा. चिकीच्या छोटया छोटया खमंग तुकड्याचा पाव पौंडाचा डबा आम्हाला पडेल चार आण्याना आणि अमेरिकेंत विकला जाईल सहज एक डॉलरला. टनावरी डबे खपू लागले कीं फायद्याचा केवढा डोंगर उभा राहील!—"

जणु नोटाचा प्रचड ढीग दृष्टीस पडल्याप्रमाणें दोघा बुचडे-वाल्यांनीं छाती बडविली आणि "ओ यो यो" असा कोरस केला. त्यांतला एकजण म्हणाला, "अगदीं सोन्याची खाणच तुम्ही शोधून काढली आहे."

जयंत म्हणाला "हां, पण ही खाण खोदायला कुदळ-फावडं सोन्याचच हवं ना?" बुचडेवाले मनापासून हंसले. "लाखानीं फायदा ओढायचा तर आधीं लाखानीं पैसे घातले पाहिजेत धंद्यात. हो कीं नाहीं?" दोन्ही बुचड्यानीं मान हालविली. "म्हणून चाललो आहे करीमभाई खटखट्याच्या भेटीला—"

"तुमची मुबईची ट्रिप यशस्वी व्हावी अस आम्ही इच्छितों" असा साहेबी आशीर्वाद त्या दोघा मद्राशानीं तोंडभर दिला. मग ते म्हणाले "आतां तुमच्या बर्थवर आम्ही अधिक वेळ नाहीं बसत. तुम्हाला झोंप आली असेल ना? निजा तुम्ही. पसरा आपला बिस्तरा. तुमची नव्यानं

ओळख झाली. फार आनद झाला. कधीं मदुरेला आलात तर या आमच्या ऑफिसात."

जयत म्हणाला "हा हा जरूर येईन. पण हें आपल उगीच म्हणायच. कारण, आता इकडे तिकडे हिंडायला मला क्षणाची तरी फुरसत होईल काय? लवकरच अमेरिकेस सुद्धा जावं लागेल मला. एका वर्षाच्या आत सालरजंग चिकीचा साऱ्या अमेरिकेत सुळसुळाट करून टाकतो बघा."

"हा टाकाल, टाकाल बुवा. तुम्ही मोठे धाडसी बिझिनेसमन आहात खरे हुसेनभाई. अच्छा गुड नाईट!" असं म्हणत एक बुचडा वर चढला.

दुसरा त्याच्या आधींच वर चढून, आडवा पसरून घोरायला देखील लागला होता.

जयंतनं विस्तरा पसरला, कपडे काढले, आणि अखेर दिवा मालवून डब्यात अंधार करण्यापूर्वी सिगारेटचे झुरके ओढीत तो जरा वेळ मांडी घालून बसला. मनसोक्त खोटनाटं बोलण्याची हौस बऱ्याच दिवसांनीं त्याला भागविता आली होती, आणि अगदीं बेहद्द अफाट थाप त्याला सहजासहजीं सुचली होती. तो स्वतःवर अगदीं खूष होता, आणि त्या खुषींतच तो सिगारेट ओढीत होता. समोरच्या बर्थवर निजलेल्या माणसाकडे त्याची नजर गेली. त्याच्या मनात आल, काय चमत्कारिक माणूस आहे! गेल्या दोन तासांत त्यानं फक्त एक दोन वेळा डोक्यावरच पांघरूण काढून जरा बघितल्यासारखं केल होतं. बाकी सारा वेळ घुंघट घेऊन तो झोंपला होता. जयंतचं आणि त्या दोघा मद्राशाचं सारं बोलणं तर त्यान ऐकल असलच पाहिजे. परतु त्यात लक्ष घालण्यासाठीं तो उठूनहि बसला नव्हता, किंवा बोलण्याची कटकट होते अशी तक्रारहि त्यान केली नव्हती. तो स्वस्थ पडला होता...

जयतन सिगारेटचं थोटूक खिडकीबाहेर टाकल, आणि विचार केला, आता दिवा मालवावा आणि झोंप घ्यावी.

परतु तितक्यात समोरच्या बर्थवर निजलेल्या त्या माणसानं पांघरूण दूर केलं आणि तो उठून बसला. त्यानं जांभई दिली, दोन्ही पजांनीं

कपाळ दाबून केस मागं सरकविले आणि खालीं पडलेल्या स्लिपरमध्ये पावलं घातलीं. त्याची आणि जयन्तची दृष्टादृष्ट झाली. किंचित हसून त्यान विचारलं, " किती दिवस राहणार मुंबईला ? " या प्रश्नावरून हे उघडच्च झालं कीं त्या दोघां बुचडेवाल्याना जयतन मारलेल्या साऱ्या बाता या गृहस्थान निजल्यानिजल्या ऐकल्या होत्या व त्या संदर्भातच तो किती दिवस राहणार म्हणून विचारीत होता.

म्हणून जयतन उत्तर दिलं, " बघूं या आता बिझेनेससाठीं किती दिवस राहावं लागतं तें. "

तितक्यात लोणावळ्याचं स्टेशन आलं. गाडी उभी राहिली. डब्यावरून जाणारे प्लॅटफार्मवरचे दोन पोलीस शिपाई जयन्तच्या डब्यात वाकले. जयतच्या समोरच्या बर्थवर बसलेल्या माणसाला पाहताच त्यानीं एकदम पावलं जुळवून पोलिसी थाटाची खडी ताजीम दिली. डाव्या दंडावरची बाही वर करून खाजवता खाजवता त्या बर्थवरच्या माणसानं त्या सलामीकडे उगीच पाहिल्यासारखं केलं, आणि विचारलं, " काय रे ? ठीक आहे ना ? सापडला कीं नाहीं अजून ? "

एक पोलीस म्हणाला, " सापडला ना साहेब संध्याकाळींच ! मुंबईला रवाना केला त्याला ! "

" होय का ? बरं झालं. बाकी काय ? "

" कांहीं नाहीं साहेब. आलबेल. "

" अच्छा. "

त्या "अच्छा"चा अर्थ ते दोघे शिपाई समजले. त्यानीं पुन्हा खडी ताजीम दिली व ते पुढे गेले.

तो माणूस उठला आणि मोरीच्या खोलींत गेला.

तो बाहेर आल्यावर दिवा मालवण्याचं काम करील अशा समजुतीनं जयंतन अथरुणावर अंग पसरलं, डोळे मिटले, आणि तो मंजुळेचे विचार करूं लागला. तिच्या पत्रातला मजकूर त्याला आठवूं लागला.

"... दादाचं मन मीं तयार केलं आहे. आता तू ये, आणि त्याना भेट. शिकार साधेल. दादा इतक्यात काहीं दिल्लीला जाणार नाहींत, परतु ते केव्हा कुठें जातील त्याचा नेम नसतो. तेव्हा तू लवकरच ये. दादाशीं

कसं बोलायचं काय बोलायचं तें नीट पाठ करून ये. आणि हें बघ जयत, दादाशी बोलताना कसलीही थाप देण्याच्या भानगडींत पडू नकोस. आमच्या दादापुढे कुणाचीहि लटपट चालत नाहीं. लक्षात ठेव ... ” हा मजकूर मनाशीं आठवता आठवता जयतच्या डोळ्यापुढें मजुळा उभी राहिली. तिचा मुका घेऊन जयत म्हणाला, तूं अगदीं काळजी करूं नकोस ग. मला खोट्या थापा मारायची सवय आहे, असा सशयदेखील तुझ्या दादाना येऊ देणार नाहीं. कोर्टांत उभा राहणारा साक्षीदार शपथ घेतों तशीच मनाशी घेईन “ देवाशपथ खरं तें सागेन. खोट बोलणार नाहीं ” मग तर झाल ना ! त्याच्याशीं काय बोलायच तें अगदीं चोख पाठच करून येतो. तू काळजी करू नकोस. ” मग मंजुळेच्या बापाशीं जे बोलायच त्याची आत्तापर्यंत शभर वेळा पाठ केलेली नक्कल आठवून तिची तो उजळणी करू लागला, आणि ती करता करताच त्याला झोंप लागली...

दुसरे दिवशीं दाढी–आटपून पहिल्या प्रतीचा जामानिमा करून तो दादासाहेबाची भेट घेण्यासाठीं निघाला तेव्हाही तो आपल्या भाषणाची पुन्हा एकदा मनाशीं उजळणी करीत होता. “ तूं येशील त्या वेळेस मी मुद्दामच्च घरात असले तरी आत लपून बसेन,” अस मजुळेन त्याला लिहिल होतं, ते मात्र त्याला पसत नव्हत, आणि आता वाटेन जाता जाता तेंच त्याच्या मनात वरचेवर येत होत. खर म्हणजे मजुळेनं हजर राह्यला हव होत. तिन आणि त्यान मिळूनच दादासाहेबापुढें उभ राहून म्हणायला हव होतं ..पण दादासाहेबाना तोंड देण्याच काम त्यान एकट्यानंच कराव अस तिन ठरविल होत...अच्छा, काहीं फिकीर नाहीं, असा मनाला धीर देत दादासाहेबाच्या घराच्या जवळ जवळ तो जात होता...

त्यान घटा वाजविली. शिपाई आला तेव्हा त्यानं विचारलं “ साहेब आहेत का ? ” ‘ आहेत ’ असं उत्तर देऊन शिपायानं त्याला पुढच्या खोलींत बसवल आणि सागितलं, “ साहेब बाहेर जाण्यासाठीं कपडे करीत आहेत. इतक्यात येतीलच खालीं.”

जयत चुळबुळ करीत बसला.

उजवीकडल्या खोलीच्या दाराचा आवाज झाला तेव्हां तो चटकन् उठून उभा राहिला. परन्तु त्यानं पाहिल तों दाराआड लपलेल्या मंजुळेनं

अर्धे तोंड बाहेर काढलेलं त्याला दिसलं. तो हसला. मंजुळेनं त्याला खुणेनं सांगितलं, कीं मी आंत येत नाहीं. दादा आता येतील खालीं. व्यवस्थित काम कर. मी शेजारच्या खोलींत आहे. उलट कांहीं सांगण्यासाठीं तो खुणा करणार होता. परंतु मंजुळेनं दार लोटलं आणि ती नाहींशी झाली.

जयंत पुन्हा चुळबुळ करीत बसला.

परन्तु दोन मिनिटं झालीं नाहींत तोंच दादासाहेब खालीं आले. हस्तांदोलनासाठीं हात पुढे करून ते इंग्रजींत म्हणाले,

" मी जरा घाईत आहे. "

हें सांगताना ओळखीच्या माणसाशीं बोलतांना करावं तसं हास्य त्यानीं केलं.

जयंत इंग्रजींत म्हणाला " मी पुन्हा येईन वाटल्यास. केव्हा येऊं ? "

" तें कांहीं सांगता येणार नाहीं. आज कदाचित् दिल्लीला जावं लागेल मला." ते थोडेसे थांबले आणि नंतर म्हणाले, "आत्ताच काढतों तुमच्या-साठीं पांच दहा मिनिटांची सवड. काय काम आहे बोला."

" काम म्हणजे तसं कांहीं नाहीं विशेष. आपण मनांत आणलंत तर पांच मिनिटांतदेखील होईल. "

" अच्छा. सांगा. "

" तुमच्या मुलीबद्दल कांहीं विचारायचं आहे— "

अत्यंत आश्चर्यानं दादासाहेबानीं विचारलं, " आमच्या मंजुळेबद्दल ? "

" हां, तिच्या लग्नाचा तुम्ही कांहीं विचार करीत असाल कीं— "

" तिनं आपला नवरा शोधून काढावा असं मीं ठरविलं आहे. हल्लींच्या तरुण मुली— "

त्यांना पुढें बोलूं न देता जयंत म्हणाला, " हें आपल्याला पसंत आहे ! तिनं काढला आहे एक नवरा शोधून—"

भयंकर आश्चर्यानं दादासाहेब म्हणाले, " तुम्हाला काय माहीत ? "

" काय माहीत म्हणजे ? ज्याला मंजुळेनं शोधून पसंत केला आहे तो मीच कीं ! "

" आं ? " असा तिरसट उद्गार काढून दादासाहेब एकदम तडातड

बोलूं लागले. " तुमची तिची ओळख तरी कशी झाली? ती शिकते पुण्याच्या कॉलेजात. तुम्ही असतां हैद्राबादला. तुम्ही तिला भेटलात केव्हा? कुठे?— हें सागतां तरी काय तुम्ही मला? आणि माझ्या मुलीला मागणी घालायच धाडस करता कसं तुम्ही? दुनियेंतले सारे हिंदु नवरे मेलेत कीं काय म्हणून तुमच्यासारख्या मुसलमानाला मी माझी मुलगी देऊ? उठा! चालायला लागा पाहू! गेट आऊट!"

दादासाहेब सुटाबुटाचा थाटबाज पोषाख करून वरून खालीं आले तेव्हा जयंतनं त्याना एकदम ओळखल नव्हतं. पण आता एकदम त्याच्या लक्षात आल, कीं रात्रीं समोरच्या बर्थवर फक्त स्लीपिंग सूट घालून जे गृहस्थ निजले होते व त्याच्याशीं थोडस बोलल होते, ते दादासाहेबच होते. आणि सालरजग चिकीची जयतची प्रचंड थाप साग्रसगीत ऐकल्यामुळें ते त्याला साहजिकच हुसेनभाई समजत होते. त्याच्या मनात आलं, झाला का आता ब्रह्मघोटाळा! आता मजुळेच्या या बापाला खरी गोष्ट पटवायची कशी? पण त्यान मनाशीं ठरविल, कीं तितकी वेळच आली तर आपला सुता झालेला नाहीं ही गोष्टसुद्धां......

तो एकदम इंग्रजीऐवजी मराठींत बोलू लागला, " दादासाहेब, मी मुसलमान नाहीं आपला काहीं तरी गैरसमज झाला आहे. "

दादासाहेब म्हणाले " गैरसमज काय? काल रात्रीं डब्यांत तुमचं सारं बोलण मीं ऐकल आहे. तुमची सालरजग चिकीची स्कीम-- "

" अहो दादासाहेब, कसला सालरजग अन् कसली चिकी? साऱ्या बाता!"

" बाता?" भ्रमांत पडलेल्या एखाद्या माणसाप्रमाणें चर्या करून दादासाहेब त्याच्याकडे बघत राहिले.

" अहो, बाता नाहीं तर काय? सारं सारं खोटं. केवळ करमणुकीसाठीं. माझं नांव जयत खरे. पुण्याच्या एका कॉलेजात मी प्रोफेसर आहे. माझं आणि मंजुळेचं आज तीन चार वर्ष प्रेम आहे. आता आम्ही लग्न करावं म्हणतों, म्हणून तुमचा रुकार घेण्यासाठीं—"

एखाद्या माणसाला पिशाच्च दिसावं आणि नंतर तें त्याच्या दृष्टिपुढून

नाहींसं व्हावं म्हणजे तो जसा पहात राहील, तसे दादासाहेब जयंतकडे पहात राहिले. मग ते एकदम मोठ्यादा हसू लागले आणि म्हणाले,

" वाहवा वाहवा ! तुम्ही एक ' जीनियस ' आहात खरे. सुसाट थापा मारण्यात, आणि बिझिनेसच्या कल्पना काढण्यातसुद्धा ! करीमभाई खटखटयाकडे दहा लाख रुपये मागायसाठीं मुबईत आला होता ना तुम्ही ? "

आपली थाप फारशी अगावर बेतली नाहीं आणि सुत्याचा निर्णायक प्रश्न निघाला नाहीं म्हणून जयताला फार आनंद झाला. तो म्हणाला, "दहा लाख रुपये ज्यावरून ओवाळून टाकावे अस रत्न मागायसाठीं तुमच्याकडे मी आलो आहे दादासाहेब."

दादासाहेब पुन्हा हसले मग " मजू मजू ! ए मजू ! " अशा त्यानीं हाका मारल्या. आणि दाराशीं डोकावून " काय दादा ? " अस मजुळेन विचारताच ते म्हणाले, " अग सालरजग चिकी कधीं खाल्ली आहेस का तू ? "

लग्नाशीं बिलकुल सबध नसलेल्या त्या विचित्र प्रश्नान मजुळा गोंधळून गेली. तिन विचारल, " काय खाल्ल आहे का ? "

" चिकी ! सालरजंग चिकी ! " अस म्हणून दादासाहेब खो खो करून हसत सुटले आणि लेकीला म्हणाले, " ये, अशी पुढे ये. सालरजग चिकी म्हणजे काय ते सागतों."

मजुळा बापाजवळ आली, आणि हसली. परंतु सालरजग चिकी ही काय भानगड आहे तिला कळेना, आणि त्यामुळें तिची चर्या गोंधळल्यासारखी दिसत होती. तिन हळूच चोरटी खूण करून जयतला विचारलं, अरे बाबा, ही काय भानगड आहे ? त्यान उलट चोरटी खूण करून तिला सागितल, काहीं भानगड नाहीं, आपल काम फत्ते झालं आहे.

मजुळेच्या मुद्रेवरचा गोंधळ कायमच राहिला. परंतु बापाकडे बघून " दादा " एवढच ती म्हणाली, आणि मग तिला खुदकन हसू आलं.

आपल्याला न आवडणाऱ्या अशा एकाद्या गावाचा आपला संबंध सुटणार असं ठरलं, कीं तें गाव अधिकच अप्रिय वाटूं लागतं व त्या गावांत इतके दिवस आपण राहिलों तरी कसे याचं मनाला आश्चर्य वाटूं लागतं. ज्या दुसऱ्या गावीं आपण जाणार असतो तें फारच आकर्षक वाटूं लागतं आणि तिकडे जाण्याचा ओढीमुळे आपण एक एक दिवस मोजूं लागतो.

याचा अनुभव तुम्हाला असेल अगर नसेल, परंतु माझी मुंबईला बदली झाली—म्हणजे खटपट करून मी करवून घेतली तेव्हा हा अनुभव मला अगदीं पुरता येऊं लागला. ज्या गावांत मी नोकरीला होतो तें अगदीं रद्दड गाव होतं. तिथल्या नोकरींत मीं कसं बसं एक वर्ष काढलं आणि इतका कंटाळून गेलो, कीं या गावातच मी किती वर्षं पिचत कुजत पडणार या विचारानं घायाळ झालों. लहानसं जिल्ह्याचं गाव होतं तें. आजूबाजूस निसर्गसौंदर्य खूप होतं, हवा चांगली होती. मोठ्या शहराच्या मानानं स्वस्ताईदेखील पुष्कळ होती. पंचवीस रुपयांत खाणावळवाला चांगलं सुग्रास जेवण घाली. बाजारकट्टयावर सकाळ-संध्याकाळ म्हशीचं ताजं दूध पिळून मिळत असे.

प्रथम काहीं दिवस माझं मन त्या गावांत रमलं. नोकरी काहीं मोठी प्रतिष्ठेची नव्हती. माझ्यासारख्या पदवीधर माणसाला जें काम करण्यांत मौज वाटावी असं कचेरींतलं काम नव्हतं. येणाऱ्या आणि जाणाऱ्या घाऊक मालाचा हिशेब ठेवायचा म्हणजे कितीसं मनोरंजक काम असणार याचा तुम्हीच विचार करा. परंतु पहिल्या पहिल्यांदा त्या खर्डेघाशीचा मला वीट आला नाहीं. उलट, सकाळीं तीन तास आणि दुपारीं चार तास मिळून सातच तास नोकरी करावी लागत होती, मालक सुस्वभावी होता, पेढीवर जायला थोडा उशीर केला किंवा संध्याकाळीं लवकरच जातो म्हटलं तरी तो चालवून घेई, इत्यादि गोष्टींमुळें नोकरी सुखाची वाटत होती. गावाच्या शाळेतले तालीममास्तर ओळखीचे झाले होते. मी आखाड्यांत जाऊं लागलों होतों. गावालगत बागा होत्या. त्यांतल्या विहिरींवर मनमुराद पोहता येत होतं.

स्वच्छंदानं भटकण्यासारख्या किती तरी रमणीय मोकळ्या जागा आजूबाजूस होत्या. टेकडीवर शंकराचं देऊळ होतं. नदीचा लहानसा घाट होता. पहिल्या दोन महिन्यात मी अगदीं खूष होतों. मनाला वाटत होतं, शंभर सवाशे रुपये मिळताहेत, खायला प्यायला रगड आहे, कुणाची भगभग नाहीं, एकट्या फटिंग ब्रह्मचाऱ्याला याहून अधिक काय पाहिजे ? अगदीं मिजाशींत होतो म्हणानात मी !

परतु ही माझी मिजास फार दिवस टिकली नाहीं. त्या गावातलं आयुष्य मला कटाळवाण वाटू लागल. त्या ठिकाणीं काय आहे याऐवजीं काय नाहीं याचाच विचार मी जास्त करू लागलों; आणि तो करू लागलो तेव्हा माझ्या तक्रारींची यादी रोजच्या रोज वाढतच चालली. त्या गावात इराण्याचं हॉटेल नव्हतं, जिथे चागलीं चांगलीं नवीं पुस्तकं वाचायला मिळतील अस वाचनालय नव्हतं, समुद्रकाठ नव्हता, एखादा सुदर बगीचा नव्हता, नाटक पहायला मिळत नव्हत, एका जुन्या गुदामाची थोडी डागडुजी करून त्याच सिनेमा थिएटर बनविण्यात आल होतं, परतु 'हरिश्चंद्र,' 'अमरज्योत' अशा वीस वर्षांपूर्वींच्या जुन्या फिल्मा दाखविल्या जात असत आणि सगळ्यात वाईट गोष्ट होती ती ही, कीं माझी मैत्रीची भूक भागत नव्हती. ज्याच्या सहवासांत गोडी वाटावी असा मित्र मला कधीं या गावात मिळेल अशी आशा धरता येत नव्हती. मैत्रीण तर स्वप्नातदेखील डोळ्याना दिसण्यासारखी नव्हती !

त्या गावाचा मला कंटाळा येऊ लागला. तिथल्या रुक्ष जीवनाच्या चाकोरींतून बाहेर पडण्यासाठीं मी वाट शोधू लागलों. परतु तें गाव आणि त्या गावांतली माझी नोकरी म्हणजे एखाद्या बद बोळासारखी होती. त्या बोळातून पलीकडचा रस्ता दिसत नव्हता !

परतु एके दिवशीं अकस्मात् मला रस्ता दिसला ! या गावातून मला माझी सुटका करून घेता येईल अशी आशा उत्पन्न झाली, आणि ती सुटकादेखील या पेढीच्या नोकरींत राहूनच होण्यासारखी होती. आमच्या पेढीचा मुंबईतला मुनीम नोकरी सोडून रंगूनला निघाला होता व त्यानं आमच्या मालकांना लिहिलं होतं कीं कुणी तरी एखादा नवा उमेदवार

इकडे पाठवा, त्याला पेढीचा सर्व व्यवहार समजावून देऊन तीन महिन्यात तयार करीन आणि काम पहाण्यास लायक झाला की मग मी रगूनला जाईन. या गोष्टीचा सुगावा लागल्याबरोबर मी मालकाकडे गेलों आणि त्याना म्हटलं, " मला मुबईला पाठवा."

ते म्हणाले, " कुणाला पाठवायच तें आधींच ठरवलय् मीं "

मीं विचारलं, " कुणाला ? "

" कचेरींत तुझ्या टेबलाशेजारच्या टेबलावर बसून जो काम करतो त्याला. "

" म्हणजे व्यकू कुळकर्ण्याला ? "

" होय, तो तुझ्या आधीं एक वर्ष माझ्याकडे कामाला लागला आहे; सीनियर आहे तो. त्याला मुंबईला धाडायच ठरविल आहे मी "

" त्याला ! " असा वेड्यासारखा उद्गार मीं काढला आणि हताश मुद्रेन मालकापुढे क्षणभर उभा राहून मग दूर झालो बोळातून पलीकडे जणारा रस्ता माझ्या दृष्टीस पडला न पडला तोच ' रस्ता बंद'ची पाटी आडवी आली होती माझ्या सुटकेचा संभव बुडबुड्यासारखा क्षणमात्र तरंगला होता आणि लगेच फुटला होता !

परतु काहीं वेळान मला या निराशेच्या अधःकारातहि एका नव्या कल्पनेचा किरण दिसला ! माझ्या मनांत आल, व्यकू कुलकर्ण्यानं जर मालकाना सागितल " मला मुबईस जाता येणार नाहीं " तर ? मग मालक साहजिकच मला विचारतील, " जातोस का ? " पण मुंबईस जाण्याची सधि आयती चालून आलेली असताना व्यकू कुलकर्णी ती हातची सुखासुखीं जाऊ देईल हें शक्य नव्हतं. पण त्याच मन वळवूं पाहणं तर माझ्या हातच होतं. त्यानं फारच ओढून धरल तर त्याला लाच देऊं करायलादेखील माझी तयारी होती. पैशान काय विकत घेता येत नाहीं ? व्यकू म्हणजे काहीं कुणी साधुसत नव्हता.

हा मार्ग दिसल्याबरोबर मी त्या मार्गान झपाट्यान निघालों. माझ्या हेतूचा पत्ता लागू न देतां मुंबई शहरात जागेची केवढी टंचाइ आहे, साऱ्या वस्तूची केवढी महागाई आहे, खानावळी किती वाईट आहेत, पॉवडरच्या दुधाचा चहा कसा प्यावा लागतो, वाईट हवेमुळ तब्येतीचं

कस मातेर होत या गोष्टीच पुराण मी व्यंकोबाला सागू लागलों. त्या पुराणाचा मला हवा तो परिणाम होईना. तेव्हा अखेर माझ्या मनातली गोष्ट मीं त्याला स्वच्छच सागितली आणि म्हटल, " व्यकोबा, तूं बोलून चालून या गावचाच रहिवासी आहेस. तुझ घरदार आहे, शेतवाडी आहे. कशाला जातोस त्या मुबईत? मुबईतल्या नोकरीचा मोठा पगार तुला दिसतो आहे, पण बाबा, त्या लकेतल्या सोन्याच्या विटा. इथल्या दीडशे रुपयाची सर मुबईतल्या पाचशे रुपयाना नाहीं बघ."

पण या मदगति फसव्या गोलदाजीन व्यंकोबाची विकेट काही पडेना. तेव्हा मग सरळ सरळ तुफानी गोलदाजीच काढली मीं त्याला म्हटल, "हप्त्याहप्त्यान पाचशे रुपये तुला देईन, पण तुझा चान्स मला दे." ही मात्रा मात्र लागू पडली. व्यकू कुलकर्णी कबूल झाला. मुंबईची नोकरी नको म्हणून त्यानं मालकाना सागितल. मग मालकानीं अर्थातच मला विचारलं " जातोस का?" मीं म्हटल, " तुम्ही म्हणताच आहात तर जातो."

माझी नेमणूक झाली. मला मोठा आनद झाला. 'सुटलो या गवातून' असं वाटू लागल. मुबईत आपल्याला किती मजा करता येईल त्याचीं स्वप्न मला पडूं लागलीं. हें गाव सोडण्याचा दिवस दहा दिवसावर आला, नऊ दिवसावर आला, आठच दिवस उरले—असा मनाशीं हिशोब करीत राहिलों.

चोवीस तारखेला रविवार होता. सकाळच्या प्रहरीं मी डोक्याचे केस चोळीत खिडकींत उभा होतो. तितक्यात कोपऱ्यावरच्या तालमीला वळसा घालून एक टागा आला, आणि ज्या वाड्यात माझी खोली होती त्याच्या दाराशीं उभा राहिला. एक म्हातारे गृरस्थ खालीं उतरले आणि त्याच्या मागोमाग——

सुमारे सतरा अठरा वर्षांची एक तरुण मुलगी खाली उतरलेली मला दिसली!

वाड्यातल्या देशपाडे मास्तरांचीं दोन मुल धावत दारात गेलीं आणि नाचत ओरडूं लागलीं, " काका आऽले!", " उषाताई आऽली!"

दाराकडे येता येता उषान वर पाहिल. माझी तिची दृष्टादृष्ट होताच ती थोडीशी चमकली, पदर सावरीत पायऱ्याकडे आली, देशपाडे मास्तराच्या छोटया बेबीला उचलून तिचा पापा घेऊन आत गेली व मला दिसेनासी झाली. तिच्या पाठोपाठ ते वृद्ध गृहस्थहि गेले. रस्त्यानं परत खडखडत जाणाऱ्या रिकाम्या टाग्याकडे बघत मी उभा राहिलो.

दाढी-आघोळ आटपून, पोषाख करून मी वाड्याच्या अगणात उतरलो त्याबरोबर देशपाड्याची छोटी बेबी धावत माझ्याकडे आली व मला म्हणाली, " उषताईन मला किती गमतीदार बाहुली आणलीय् पाहिलीत का ? ती डोळे मिटते, उघडते, आणि उघडताना म्याव असा आवाज करते. ही बघा ! " तिन बाहुलीच खोक खालीं वर केल आणि आवाज झाल्या-बरोबर " पाहिलत्, कशी गमत आहे ? " म्हणून ती नाचू लागली.

" फार छान आहे बाहुली ! " अस बेबीला म्हणताना माझी नजर सहज देशपाड्याच्या दाराकडे गेली. दारात उभी असलेली उषा माझ्या दृष्टीस पडली.

" आणखी गोष्याला काय आणलंय् ते पाहायचय् का तुम्हाला ? या ! या ! " अस म्हणून बेबी माझा हात धरून ओढू लागली.

" आत्ता मी कामात आहे ग, दुपारीं येईन ह. " असं बेबीला सागत हात सोडवून घेतना मी पुन्हा दाराकडे सहज पाहिलं. उषा गालातल्या गालात हसताना मला दिसली.

नतर दिवसभरात ती माझ्या दृष्टीस पडली नाहीं. घरातून बाहेर आणि बाहेरून परत खोलीवर अशा मीं चार पाच खेपा घातल्या. प्रत्येक वेळेस मास्तराच्या दाराकडे नजर टाकली. परतु ती एकदाहि दिसली नाहीं. माझ्या खोलीला फक्त रस्त्याच्या बाजूस एक खिडकी होती. जिच्यातून आगणात खालीं पाहता येईल अशी खिडकी नव्हती, ही गैरसोय एक वर्षांनंतर प्रथमच माझ्या लक्षात आली ! एकदा मनात आल, खुशाल काहीं तरी निमित्त काढून देशपाडे मास्तराकडे जाव. त्याच्याकडून एखाद पुस्तक घेण्यासाठीं कधीकधीं त्याच्या बिऱ्हाडांत मी जात असे. परतु मी कोणत्या हेतून आलो ते मास्तर ओळखतील अशी भीति वाटून मी गेलो नाहीं.

संध्याकाळीं मी अगदीच कटाळलों आणि टेकडीवरच्या शंकराच्या देवळांत गेलो. देवळाच्या दाराच्या दोन बाजूस दगडी चौथरे होते. त्यावर बसलं की खालच्या घाटाच्या पायऱ्या आणि नदीचं पात्र याची शोभा पाहण्यासारखी दिसे देवळाच्या दारापर्यंतच्या तीस चाळीस पायऱ्या नेहमीप्रमाणे खाली मान घालून मी धावत चढलो आणि अखेरच्या पायरीवर पोचल्यावर मान वर करून पाहतों तों दोन्ही चौथरे भरलेले दिसले. एकावर मास्तरांचा गोप्या आणि बेबी गसली होती, दुसऱ्यावर उषा गुलबक्षीच्या रंगीबेरंगी फुलांची माळ करीत बसली होती.

मला पाहिल्याबरोबर गोप्या टाळ्या वाजवून ओरडला, " उषाताई, ए उषाताई ! हे वसतराव आलेत बघ. आता पतग कसा उडवायचा तें आपल्याला दाखवतील ते ! " चौथऱ्यावर त्याच्या माडीपाशीं त्यानं घेतलेला पतग व दोऱ्याच बडल पडलं होत, ते घेऊन त्यानं चौथऱ्या-खालीं उडी मारली, आणि पतग माझ्या हातांत देत तो म्हणाला, " उषाताईला काहीं केल्या उडविता येईना. आतां तुम्ही उंच उडवून दाखवा. म्हणजे उषाताईची हुर्यो होईल ! "

तें ऐकल्यावरोबर उषाला खुदकन् हसू आलं. आणि त्याच वेळीं तिन माझ्याकडे पाहिलं. मीं हळूच म्हटल, " मला तरी कुठें उडवता येतो आहे पतंग ? तुमच्याऐवजीं माझीच हुर्यो होणार आहे ! "

फुलाची माळ किती लांब झाली तें पाहण्यासाठीं ती हातात धरून बघत उषा म्हणाली, " कधीं उडवला नाहींत पतग ? लहानपणींसुद्धा ? "

" अं हं " असं म्हणत मी हसलों. " आता परीक्षाच आहे माझी ! "

आम्हां दोघाचं सभाषण चालावं ही गोष्ट गोप्याला आणि बेबीला बिलकुल पसंत नव्हती. तीं दोघंहि माझा कोट ओढून म्हणूं लागलीं, " उडवा ना हो वसंतराव ! उडवा कीं ! "

देवळाच्या डाव्या बाजूस थोडी मोकळी सपाट जागा होती. तिकडे जाऊन गोप्याच्या हातीं पतंग देऊन आणि मांज्याचं टोक धरून मीं त्याला म्हटलं, " हं, सोड वर आतां. " पण तें काही जमेना. दर वेळेस त्यानं पतंग वर सोडावा आणि वाऱ्याच्या झोतान तो खालीं जमिनीवर फरफटावा

असं होऊं लागल. काय करावं अशी मला पंचाईत पडली. मीं उषाकडे पाहिलं. माझ्या त्या पाहण्याचा अर्थ ओळखून ती लगबगीनं आली आणि म्हणाली, " मी धरून सोडूं का पतंग ? "

तिच्याजवळ पतग देण्यात गोप्याला पराभव आणि अपमान वाटला. तो काहीं केल्या तिच्या हातीं पतग देईना. पण मीं त्याला पुष्कळ चुचकारलं आणि पतग खूप उंच उडविण्याची खात्री दिली तेव्हा तो कबूल झाला.

माझं सुदैव असं कीं पतग वर सोडण्याची कामगिरी उषान उत्तम केली आणि मलाहि माजाचे व्यवस्थित हिसके देण्याची कला कशी एकदम अवगत झाली कुणास ठाऊक, परतु पतग डौलानं वर चढत उंच गेला खरा ! गोप्या आणि बेबी टाळ्या वाजवून ओरडू लागलीं " बघा वसंतरावानीं पतग कसा उडविला. उषाताईची हुर्यो ! "

उषा मला म्हणाली, " चागल येतय् कीं तुम्हाला. "

मीं म्हटलं, " पतग सोडणार माणूस चागल असलं कीं येत. "

तितक्यात वाऱ्याचा झोत आला आणि पदर उडू नये म्हणून तिनं वळून माझ्याकडे सरळ तोंड केल. माझ्या तोंडून एकदम प्रश्न गेला, "किती दिवस राहणार ? "

सरळ उत्तर देण्याऐवजीं तिन विचारल, " का ? "

त्या उलट प्रश्नान मी थोडासा गागरलो. परतु तिन ज्याप्रमाणे अनपेक्षित प्रश्न केला त्याप्रमाणे आपणहि अनपेक्षित उत्तर द्यावं अशा धीट विचारानं मीं म्हटल, " तुमचा जास्त परिचय व्हावा अशी इच्छा आहे. माझं हें बोलणं तुम्हांला वावग तर वाटायच नाहीं ना ? वाटणार असेल तर क्षमा मागून टाकतों. "

" अरे बापरे ! " अस म्हणून ती मोठ्यादा हसू लागली.

मीं म्हटलं, " पण माझ्या प्रश्नाच उत्तर अजून मला मिळालंच नाहीं."

" कोणता प्रश्न ? तुमच्या क्षमायाचनेच्या बोलण्यामुळं तो प्रश्न विसरलेंच मी. "

" किती दिवस राहणार आहात ? "

ती म्हणाली " बघायच. जमलं तर कायमचीच या गांवीं राहीन.

मास्तराच्या शाळेत एक जागा रिकामी झाली आहे; ती मला मिळण्या-सारखी आहे असं मास्तराचं पत्र आलं म्हणून काकाच्याबरोबर मी निघून आलें. उद्या इंटरव्ह्यू व्हायचा आहे. नेमणूक झाली तर गांवात कुठे तरी जागा मिळते का बघायचं ? "

" मला वाटल, तुमच अन् मास्तराच काहीं नात आहे."

" नाहीं, आमचं त्याच काहीं नातं नाहीं. "

" पण ही बाबामडळी तर तुम्हाला नात असल्याप्रमाणच चिकटलीं आहेत. "

" मास्तराची आणि आमच्या काकांची फार जुनी ओळख. या दोन्ही मुलाना घेऊन ते पुष्कळदां आमच्या घरीं आले आहेत. "

" अस होय ? "

तिनं एकदम विचारलं, " तुम्ही इथें कायमचेच असता ? "

माझ्या ध्यानात एकदम आलं कीं थोड्याच दिवसानीं मी हे गाव सोडून मुंबईस जाणार आहे. पण मी म्हणालो, " होय, नेहमींच इथें असतों. "

" एकटेच ?"

" सध्या तरी एकटा आहे. "

" सध्या तरी ! " अस म्हणून ती हसली. आणि तिच्या बोलण्यातली खोच कळल्यावर मलाहि हसू आल.

मुलाना घेऊन ती परत निघाली तेव्हा तिच्याबरोबर घरापर्यंत जाण्याचा मला विलक्षण मोह झाला; पण " मीं थोडा चौथऱ्यावर बसणार आहे " असं सागून मीं तो आवरला. माजा गुडाळून बंडल आणि पतंग गोप्याच्या हातांत मीं दिला तेव्हा त्यानं विचारलं, " उद्या पुन्हा उडवूं या ना ? "

मीं उषाकडे पाहात म्हटलं, " काहीं हरकत नाही. उद्यासुद्धां येईन हं मी. "

मुलांना घेऊन ती पायऱ्या उतरूं लागली. तिनं गुंफलेली माळ चौथऱ्यावर पडलेली दिसली. ती उचलून मी ओरडलों, " ही माळ विसरलात." मीं ती माळ उचलून उंच करून दाखविली.

उषानं वळून माझ्याकडे पाहिलं. मीं ओरडून विचारलं, "देऊं का आणून ?"

तिन ओरडून सागितल. "नको–" आणि पाठ फिरवून ती पायऱ्या उतरूं लागली. खालच्या रस्त्याला लागून ती दिसेनाशी झाली तेव्हां मी चौथऱ्यावर बसलो.

माझ्या मनात आल, मुंबईला कशाला जायचं ? हे गाव काहीं वाईट नाहीं. 'उद्या इंटरव्ह्यू होणार आहे. माझी नेमणूक झाली तर–' हे उषाचे शब्द मला आठवले व ते मनाशीं घोकीतच तिन्हीसाजाच्या प्रकाशात कमीकमी दिसूं लागणारं नदीच पात्र मी बघत राहिलो.

दुसऱ्या दिवशीं कचेरींत काम करीत असताना शाळेच्या मुख्याध्यापकाशीं उषाचा इटरव्ह्यू कसा काय होत असेल याच्याच कल्पना माझ्या मनांत चालू होत्या. त्या इटरव्ह्यूचा निकाल कळावा म्हणून घटकाभर आधींच कचेरींतून पळण्याचा विचार मीं केला होता; परतु कधीं नव्हे तें एक किचकट काम निघाल आणि मालक मला म्हणाले, "एवढं पुरं केल्याशिवाय घरीं जाऊ नका." पेढीच्या एका गिऱ्हाईकानं बिलाबाबत वाधा काढला होता आणि गेल्या तीन वर्षांत त्याच्याकडे रवाना झालेल्या मालाच्या जुन्या फायलींवरून उतारा काढून वकिलाला समजावून देण्यासाठीं त्याची केस लिहून काढायला हवी होती. रोजच्यापेक्षा जरा आधीं सोडतां का असं विचारयला मी मालकाकडे गेलों त्या वेळेस त्यानीं मला हें काम सागितल ! आधींच दुपारीं सागितलं असत तर संध्याकाळपर्यंत मीं ते सहज हातावेगळ केल असत. आतां यापुढें तें करायचं म्हणजे कचेरींतून सुटायला रात्रीं आठ वाजणार होते !

मालकाजवळ मी काही बोललों नाहीं. पण मनातल्या मनात मी चिडलों. शक्य तितक्या झटपट मीं काम केलं तरीदेखील पेढींतून बाहेर पडायला आठ वाजलेच. उशीर झाला तर गार जेवण मिळेल या भीतीनं खोलीवर न जातां खाणावळीकडे जाणं भाग होतं. जेवण आटपून बिऱ्हाडाकडे परत आलों तों दरवाजा लागलेलाच होता ! दरवाजाची दिंडी तेवढी उघडी होती. आंत पाऊल टाकल्याबरोबर

आजूबाजूंस सगळीकडे नजर टाकली. खालीं वर एकाहि खोलींत दिवा दिसेना.

वाड्यातल्या इतर बिऱ्हाडांप्रमाणेंच मास्तराच्या घरातहि सामसूम आणि निजानिज झाली होती. इंटरव्ह्यू मनाजोगा न झाल्यामुळे आणि शाळेतली जागा न मिळाल्यामुळे उषा आपल्या काकाच्याबरोबर निघून तर गेली नाहीं अशी शका माझ्या मनात आली. देशपाडे मास्तराचा रोज पहाटे चार वाजता उठण्याचा क्रम असल्यामुळें रात्रीं आठ वाजताच ते निजत असत हें मला माहीत होत. तरीदेखील त्याच्या बिऱ्हाडाचीं तीं बंद दारं, ती स्तब्धता, आणि तो गुडूप अधार, या सगळ्या गोष्टींचा एकच वाईट अर्थ माझ्या मनानं केला. वाटल, उषा आली तशी परत गेली. आता आपल्याला ती पुन्हा कधीं दिसणार नाहीं !

माझ्या खोलीकडे जाणाऱ्या जिन्याला नऊच पायऱ्या होत्या, परन्तु त्या चढायला मला अठरा मिनिटं लागलीं असतील. पाय खोलीकडे जायला मुळीं तयारच नव्हते. मनाला वाटत होत परत खालीं जाव, आंगण ओलाडून मास्तराचं दार ठोठावावं आणि सरळ विचाराव ... परतु इतका धीर कुठला व्हायला? नेहमींप्रमाणे हात उंच केले, कुलूप काढल, दार लोटल, पुन्हा धाड्दिशीं लावल आणि दिवा न लावताच अंगातला कोट फेकून देऊन अंथरुणावर पडलों. झोपेवाचून तळमळत ! उषाला नोकरी मिळाली कीं न मिळाली याबद्दल तर्क करीत !...

दुसऱ्या दिवशीं सकाळींही मला असच वाटत राहिल कीं उषा निघून गेली असावी. दहा वेळा जिना उतरून खालीं आगणात गेलों; काहीं ना काहीं निमित्त काढून रेगाळलों; परन्तु काहीं अदमास घेताच येईना. शेवटीं एकदा गोप्या दारात आला आणि तिथूनच त्यान मला ओरडून सागितल, " काका गेले ! " " उषाताईसुद्धा ? " अस ओरडून त्याला विचाराव अशी मला जबरदस्त इच्छा झाली, परतु ती मीं मोठ्या प्रयत्नान दाबली व खोलीकडे गेलों आणि निजून राहिलो. खाणावळींत जावंस किंचित्‌देखील वाटेना. पेढीवर जायची वेळ झाली तेव्हां कोट घातला आणि निघालों. रस्ता भयाण आणि उदास वाटत होता. खालीं मान घालून अंधारात पावलं टाकीत चालल्याप्रमाणे मी चाललो होतों.

पण मधेंच मागून येणाऱ्या बैलगाडीची चाक ऐकू आलीं म्हणून झटकन् कडेला होऊन मान वर केली आणि त्याच क्षणीं रस्त्यातला सारा अधार एकदम नाहींसा होऊन लख्ख प्रकाश पडल्यासारख मला वाटल ! माझ्यापुढे पांच दहा पावलाच्याच अतरावर लगबगीन चालणारी उषा मला दिसली !

मीं झपाझप पावल टाकलीं, तिच्या जवळ गेलो, आणि म्हणालो, " कॉग्रॅच्युलेशन्स ! "

माझ्याकडे पाहताच ती किंचित् चमकली, पण मग लगेच हसली व म्हणाली, " थॅंक्स. पण तुम्ही कस ओळखलंत ? "

" मी कसं ओळखल ते नका विचारू, तुम्ही मला कालच का कळवल नाहीं ते सागा ! "

तिन तिरप्या डोळ्यानीं माझ्याकडे बघत म्हटलं, " रात्रीं साडेआठपर्यंत तुम्ही काल कुठें होता तें तुम्हींच सागा "

तिचं ते बोलण ऐकताच मला आनंद झाला. मीं म्हटलं, " म्हणजे आनदाची बातमी मला कळविण्याची तुमची इच्छा होती तर ? "

" मला नका विचारूं " असं म्हणून तिनं फणकऱ्यान मान हालविली.

काल कचेरींत अचानक जादा काम निघाल्यामुळें खोलीवर यायला मला कसा उशीर झाला, सकाळीं आगणात मीं किती घिरट्या घातल्या, आणि काका निघून गेले अशी गोप्यान बातमी सागताच मीं कोणता तर्क साहजिकच केला, तें सार तिच्याबरोबर चालताना मीं सागितलं.

ती हसून म्हणाली. " काका सामान आणण्यासाठीं परत गेले. आता इथे बिऱ्हाड केलं पाहिजे ना मला. मास्तराच्या घरीं किती दिवस राहायचं ! "

" हो, तेहि बरोबरच आहे " अस काहीं तरी मी पुटपुटलों आणि मग मीं एकदम विचारल, " आम्हाला पेढे केव्हा देणार ? "

ती म्हणाली, " देऊं कीं—पेढ्याचं काय एवढ ? "

शाळेचा रस्ता जिथें फुटत होता त्या कोपऱ्यावर आम्ही आलो तेव्हा मीं म्हटलं, " आता तुमची आमची वाट निराळी ! "

उजवीकडच्या रस्त्याकडे बघून ती म्हणाली, " तुमची पेढी या बाजूला आहे होय ? "

मीं म्हटल " मी पेढीवर असतो हें तुम्हाला कस कळलं ? "

" मास्तरानीं सांगितलं. "

" तुम्ही त्यांना विचारलत ? "

तिन हसून मान हालविली.

तिन मास्तराजवळ माझी चौकशी केली या साध्या क्षुल्लक गोष्टीचा मला विलक्षण आनद झाला. मी हसलो आणि म्हणालो, " बर आहे, बाई ! तुम्ही आता ' बाई ' झालात, नव्हे काय ? सार गाव तुम्हाला बाई म्हणून ओळखणार ! "

" शीः ! मला नाहीं ह बाई म्हटलेलं आवडायच ! निदान तुम्हीं तरी नये बाई म्हणता कामा ! "

" बर बरं ! " अस म्हणून मी पुन्हा हसलों आणि आपल्या वाटेला लागलों. माझ्या दृष्टीला तो रस्ता एकदम किती शोभिवत दिसू लागला होता. ज्या गावाचा मला कटाळा आला होता तेंच गाव मला एकदम सुदर वाटूं लागलं होत ! ते सोडून मुबईला जाण्याची मला आतां बिलकुल इच्छा नव्हती. मीं मनाशीं ठरविलं कीं पेढीवर गेल्याबरोबर मालकाना सागायच माझ्याऐवजीं व्यंकोबालाच मुंबईला पाठवा. ज्या व्यकोबाची मुंबईला न जाण्याबद्दल मनधरणी केली होती, त्याच व्यकोबाची आता मुंबईस जाण्याबद्दल मनधरणी करावयास मी तयार होतों. जाण्याबद्दल पांचशे रुपये त्यानं मागितले तरी ते देण्याची माझी तयारी होती. कारण या गावात आता उषा राहणार होती. तिची माझी ओळख पुरत्या चोवीस तासांचीदेखील नव्हती. अजून कशाचाच पत्ता नव्हता. परतु मुंबईस न जातां या गावांतच राहण्याचं मीं मनाशीं पक्क ठरविलं होत !...

तिच्या गळयात हार पडल्याबरोबर थिएटरात टाळ्याचा कडकडून गजर झाला ! बाबलीला वाटल, आपण जाग्या नसून खाचित स्वप्नांत आहोत.... थिएटरातली ती प्रचंड गर्दी, तो दिव्याचा झगझगाट, तिच्या कानावर आलेलीं तिच्या प्रशंशेचीं मोठमोठ्या लोकाचीं भाषणं, त्या भाषणात तिच्या नावाचा उल्लेख झाला कीं पडलेल्या टाळ्या, आणि सुगधी फुलाच्या दरवळाचा अंगाभोवतीं पडलेला विळखा—या गोष्टी खऱ्या नसून आपल्याला त्याचा भास होत आहे, अस बाबलीला वाटलं. भोंवतालचे हे सारे प्रकार प्रत्यक्ष घडत असतानाही तिला सारख वाटत होतं, छे, हें खर नव्हे. मला स्वप्न पडत असावं ...

गेले कित्येक दिवस बाबली एक प्रकारच्या स्वप्नांत होती. तिनं ज्या चित्रपटात प्रथमच भूमिका केली तो कल्पनेपलीकडे गाजला होता. सिनेमाच्या जगात पूर्वी कुणालाहि माहीत नसलेली बावीस वर्षाची ही मुलगी एका रात्रींत असंख्य प्रेक्षकाची लाडकी तारका बनली होती. चित्रपटातल्या तिच्या गाण्यावर आणि नृत्यावर दुनिया बेहद्द खूष झाली होती. तिनं ज्याच तोंडहि कधीं पाहिलं नव्हतं असे हजारो पुरुष तिच्यावर लुब्ध झाले होते. त्याचीं प्रशंसापत्र आणि प्रेमपत्र रोज रोज येऊन त्याचा ढीग साचला होता. तिचा चित्रपट अनेक ठिकाणीं प्रकाशित झाला होता व त्या त्या गावीं चिक्कार गर्दीचे आठवड्यामागून आठवडे लोटत होते. मुबईच्या थिएटरात तो जिथे प्रथम प्रकाशित झाला तिथें त्याच्या रौप्य ज्युबिलीचा आठवडा साजरा होत होता...या साऱ्या गोष्टी बाबलीला एकाद्या स्वप्नासारख्या वाटल्या होत्या ... आणि आज चित्रपटाच्या रात्रीच्या 'शो'ला ती हजर राहिली आणि तिचा जाहीर सत्कार झाला त्या वेळेस प्रत्यक्ष स्टेजवर ती खुर्चीत बसली, मोठमोठ्या लोकानीं भाषण केलीं, तिच्या गळयात हार पडले, टाळयांचा कडकडाट झाला तेव्हा तिला वाटलं, सहा महिने सतत पडत असलेल्या या स्वप्नाचा कळस होत आहे, आतां मात्र या स्वप्नातून आपण जाग्या होऊ...

परंतु तिचं तें जागेपणचं स्वप्न चालूच राहिलं. ती स्टेजवरून खालीं

उतरली. आपल्या बॉक्सकडे जाऊं लागली. तिच्या एका बाजूला चित्र-पटाचे दिग्दर्शक मालक आणि दुसऱ्या बाजूला रंगनाथ सावकार तिचे शब्द झेलीत, तिला शाबासकी देत, मधूनच तिचा हात धरल्यासारखं करीत चालले होते तिच्या मागोमाग किती तरी लोकांचा थवाच्या थवा होता, बॉक्सच्या दाराशी पोचल्यावर लोकांचा तो घोळका बाहेर राहिला. तिनं आत पाऊल टाकलं, कोचाच्या एका कडेला दिग्दर्शक–मालक बसले, दुसऱ्या कडेला रंगनाथ सावकार बसला, मधोमध ती बसली. घर्रर्र अशी घंटा झाली. लोकांचा गलगा शान्त होऊं लागला, दिवे विझले, अंधार झाला. थिएटरात संपूर्ण स्तब्धता झाली. प्रकाशाचा झोत पडद्यावर पडला, चित्रपट पुढें सुरू झाला. वेषभूषेनं सजलेली स्वतःची छाया बाबलीला पडद्यावर दिसली. एका नदीच्या किनाऱ्यावर वेलींनीं वेढलेल्या एका झाडाच्या बुध्याला टेकून ती उभी होती. रानातल्या पक्ष्यांचा किलबिलाट चालू होता. पाण्याच्या प्रवाहाचा बारीक खळखळाट ऐकू येत होता. तिच्या तोंडच्या गाण्याचा पहिला चरण उमटला. त्या चरणाच्या शब्दांनीं प्रेक्षकांच्या हृदयाचा एकदम ठाव घेतला. हजारो हातांच्या टाळ्यांनीं गाण्याचा ताल धरला.

बॉक्समध्ये बसलेल्या बाबलीच्या अंगावर एकदम शहारे आले. तिला वाटलं, आपण खचित स्वप्नांत आहोंत...आणि ते रोमांच तिच्या अंगावर असतानाच चित्रपटातलं तें गाणं संपलं. इतका वेळ पायाशीं तसाच रिकामा राहिलेला घडा तिनं उचलला, आणि पाण्याच्या काठाशीं जाऊन तिनं तो पाण्यात बुडविला...

बाबलीला एकदम आठवण झाली. हुबेहूब हाच प्रसंग तिच्या आयुष्यात एकदा प्रत्यक्ष घडला होता...अशीच नदी, असंच पाणी, असंच झाड, असच तें पाण्याजवळ जाणं, आणि अगदीं असच घागर पाण्यात बुडविणं !—पण त्या गोष्टीला आता जवळजवळ—किती बरं ?—तीन वर्षं झालीं होतीं. या चित्रपटातल्या नायिकेप्रमाणेच ती एके दिवशीं नदीवर जाऊन घागर पाण्यात बुडवीत होती. फरक एवढाच कीं, ती या नायिकेप्रमाणे आनंदानं गाणं म्हणत नव्हती, तर उलट अंतःकरणात दाटलेला दुःखाचा आणि निराशेचा पूर सोशीत होती. नदीच्या पाण्यात

आपल्या डोळ्यातलीं आसवं साडीत होती. तिला वाटत होतं, आता यापुढें जगण्यात अर्थ नाहीं. या गावात आपली अब्रू आता राहिलेली नाहीं. सावकाराच्या मुलाच्या नादान बिघडलेली एक अक्कलशून्य, चारित्र्यहीन, कलंकित मुलगी म्हणून सारा गाव आता आपल्याकडे पाहील. आपला सावत्र बाप यापुढें आपल्याला घरात ठेवणार नाहीं. त्यान घरात जरी ठेवल तरी त्याची शिवीगाळ आणि मारहाण सोशीतच आपल्याला राहाव लागेल. आता यापुढें जगण्यात काहीं अर्थ नाहीं. हातातली घागर भरण्यासाठीं पाण्यात बुडविण्याऐवजीं स्वतःच पाण्यात बुडी घेऊन हें जिणं संपवाव हेच चागल...तिन आजूबाजूला पाहिल, कुणी नाहीं अशी मनाची खात्री करून घेतली. घागर दूर ठेवली. ओचा–पदर खोवला, देवाच नाव घेतल. आणि ती पाण्यात उडी घेणार तोच तिला हाक ऐकू आली, " बाबली ! " तिन दचकून पाहिलं. तिला हाक मारीत पडित तिच्याकडे धावत येत होता ! ..

बॉक्समधल्या कोचावर बसून चित्रपट पाहणाऱ्या बाबलीच्या डोळ्यापुढे तीन वर्षांपूर्वीच्या तिच्या प्रत्यक्ष जीवनाचा हा चित्रपट सरकत होता.

गावच्या सावकाराचा मुलगा रंगनाथ उडाणटप्पु आणि चगीभंगी म्हणून प्रसिद्ध होता. त्यान गावातल्या किती तरी मुलींच वाटोळ केल होतं. आणि हे माहीत असूनही ती त्याच्या नादीं लागली होती. तिच्या काळ्या सावळ्या रूपावर, आणि मुसमुसणाऱ्या तारुण्यावर तो लुब्ध झाला यात आश्चर्य नव्हत, ती त्याच्या भुलावणीला बळी पडली होती हे आश्चर्य होत. तिच्या बापान तिला बजावून सागितल होत " त्या रग्याच्या नादीं लागलीस तर तोड फोडून टाकीन लक्षात ठेव. " साऱ्या गावानही हाच इशारा दिला होता. पण तारुण्याच्या पहिल्या वेड्या अवस्थेत ती होती. सावकाराचा रगनाथ तिला हवासा वाटू लागला होता. तो तिला पैसे देऊं शकत नव्हता. कारण सावकारीची सारी जिंदगी त्याच्या कद्रू बापाच्या हातात होती. पण गोड गोड थापांची खैरात तो वाटेल तेवढी करू शकत होता. त्या थापा तिला पैशापेक्षा लाख मोलाच्या वाटल्या. रंगनाथच्या जाळ्यात ती सापडली आणि पुरती अडकली. ती त्याच्या चोरून गाठी भेटी घेऊं लागली.

हवालदार भोसल्याचा तरुण मुलगा पडित तिच्याशीं लग्न करायला

तयार होता. पण तिला वाटे, शिपाई पेशाच्या या तरुणाशीं लग्न करण्यात कोणतं हशिल आहे ? हा काय मला ख्यालीखुशालींत ठेवील, माझ्या गुणाच कौतुक करील, मला मोठमोठ्या शहरीं घेऊन जाईल, कीं उंची उंची साड्या नेसवील, कीं दागिने घालील ? लष्करी नोकरी करता करता हा मला गावोगाव हिंडवील, आणि एक दिवस कुठल्या तरी लढाईत हा मेला कीं सरकारांतून मिळणाऱ्या पेन्शनीवर चार मुलं संभाळीत मला आयुष्य काढाव लागेल. त्यापेक्षा रंगनाथाशीं लग्न करणं किती तरी चांगल. तो रगेल आहे, गुलहौशी आहे, त्याचा कद्रू बाप मेला कीं सावकारी आणि इस्टेट त्याचीच आहे.

या हिशोबानं तिनं पडित भोसलेला झिडकारलं आणि रगनाथाच्या नादाला ती जास्त जास्त लागली. त्यान तिला लग्नाचीं वचनं दिलीं तीं तिला खरीं वाटलीं. ती त्याला आपलं सर्वस्व देऊन बसली.

आणि एके दिवशीं रंगनाथचं लग्न झालेलं तिनं डोळ्यानीं पाहिलं. त्याच्या लग्नानंतर तो जेव्हां भेटला तेव्हा तिनं त्याला खूप शिव्या दिल्या. पण तो निर्लज्जपणान हंसून म्हणाला, "उगीच का भाडतेस ? मी काय तुझ्याशीं खरंच लग्न करणार होतों ? तू माझी रखेली होतीस. आणि यापुढें देखील तुला रखेली म्हणून ठेवायला मी तयार आहे." तें ऐकताच तिनं त्याच्या खाडकन मुस्कटांत मारली होती. त्याचं भाडण ऐकून तिचा बाप बाहेरच्या सोप्यात आला होता. रंगनाथानं त्यालाही सांगितलं होतं कीं. "आजपर्यंत तुझी ही बाबली माझी रखेली होती. यापुढेंही ती माझी रखेली राहील. तिचं आणि तुझंही कल्याण होईल." तिच्या बापानं रगनाथाला हाकून दिल होतं, पण तिला घरात नेऊन यथास्थित बडवून तो म्हणाला होता, यापुढें तू माझ्या घरात राहू नकोस ...

त्या दिवशीं तिनं जीव दिलाच असता, पण पंडित अकस्मात् हाका मारीत आला होता. त्यान तिला नदीवरून परत नेल होतं. तिला तो म्हणाला होता, "माझ्याशीं लग्न कर असंच मी तुला म्हटल असतं, पण लढाई सुरू झाली आहे. आघाडीवर जाण्याचा मला तातडीचा हुकूम झाला आहे."

ती त्याला म्हणाली, " मग मला नदीवरून परत कशाला आणलंस ? "

" तुझा जीव मोलाचा वाटतो म्हणून."

" मोलाचा ?" तिनं विचारलं, " आता काय मोल राहिलं आहे माझं ? "

पंडित म्हणाला, " असं म्हणूं नकोस बावली ! माणसाच्या जीवनाचं मोल कधीं संपत नाहीं. तुझं तर सारं आयुष्य तुझ्यासमोर आहे. तूं तरुण आहेस, देखणी आहेस, पुष्कळ गुण तुझ्या अंगीं आहेत. "

ती एकदम म्हणाली, " त्या गुणानींच मला पागल केलं कीं ! "

तो म्हणाला, " पण त्या गुणांनींच कदाचित् तुझ्या हातून झालेला पागलपणा तूं पुसून काढशील, आणि मोठी होशील. तुझ्याबद्दल मीं मनाशीं काहीं एक गोष्ट ठरविली आहे. तूं हो म्हणशील तर —"

ती म्हणाली, " तू मला वाचविलंस. आतां माझं वाटेल तें तूंच कर. "

त्यानं तिला आपल्याबरोबर मुंबईस नेलं होतं, आणि त्याचा एक स्नेही सिनेमाच्या धंद्यात होता, त्याच्या स्वाधीन करून तो आघाडीवर निघून गेला होता. त्यानंतर गेल्या तीन वर्षांत त्याची बातमी तिला मुळींच नव्हती...ती आपल्या गुणानीं मोठी मोठी होत गेली होती. आज तिच्या यशाचा कळस झाला होता...आनंदाचा मात्र नव्हे ! कारण बॉक्समध्यें बसून चित्रपट पाहात असताना आज तिला पंडितची विशेष आठवण होत होती. त्यानं तिला वांचविली नसती तर तिचं आयुष्य त्याच दिवशीं नदीच्या पाण्यांत संपलं असत. कीर्तीचे हे सोहाळे बघायला बावली शिल्लकच राहिली नसती. तिचा मानसन्मान होत होता, तिच्या गळ्यात हार पडले होते. आणि ज्यानं तिला आत्महत्येपासून परावृत्त केलं आणि कीर्तीच्या या मार्गावर आणून सोडलं तो भोसल्यांचा पंडित कुठें आहे तें देखील तिला माहीत नव्हतं ! उलट ज्यानं एकदां तिच्या तारुण्याशीं गंमतीनं खेळ केला, तिच्या अब्रूला कलंक लावला, तो रंगनाथ मात्र तिच्या आयुष्यांत आज पुन्हां परत आला होता. तिच्या

डाव्या हाताला, तिच्या शेजारीं, तिला खेटून बसला होता. त्याला ती दूर ढकलू शकत नव्हतीं...

ज्या दिग्दर्शक–निर्मात्यानीं हा चित्रपट काढला होता त्याना मोठ्या भाडवलाची गरज होती. रगनाथचा बाप आतां मेला होता. त्याच्या हातात लाखो रुपये खेळू लागले होते. चित्रपटाच्या धद्यात वाटेल तेवढे पैसे घालायला त्याची तयारी होती. बाबलीन त्याच्याजवळ रखेली म्हणून रहाव एवढीच एक त्याची अट होती. त्यान हव तेवढ भाडवल दिल तर धद्यात तिला भागीदार करण्याची दिग्दर्शकाची तयारी होती. तिच्यापुढें आणखी आणखी पैसा, आणखी आणखी कीर्ति हात जोडून उभी होती. फक्त तिन रगनाथला ‘ हो ’ म्हणायचा अवकाश होता. तिच्यापुढे एकच प्रश्न होता, रगनाथला रुकार द्यायचा काय? ‘ हो ’ म्हणायच काय?...

एकदम दिवे लागले तेव्हा ती आपल्या विचारातून जागी झाली... थिएटरातले हजारो लोक जागेवरून उठले. गलगा झाला. बॉक्स-खालच्या जागावरचे लोक पुन्हां थवा करून तिच्याकडे पहात राहिले. तिचा एक हात दिग्दर्शकानीं धरला. दुसरा रगनाथन धरला. दोघाकडे पाहून ती हसली. त्या दोघानीहि तिला न बोलता विचारल, मग काय, ठरलं ना ? आपणही न बोलताच त्याना ‘ हो ’ म्हणून सागितल अस बाबलीला वाटल. त्या दोघाबरोबर ती बॉक्सच्या दाराशीं आली...

तितक्यात एक स्त्री तिच्यापुढे येऊन उभी राहिली आणि हातातला एक मोठा थोरला हार तिन तिच्या गळयात घातला. गुच्छ तिच्या हातीं देता देता ती स्त्री म्हणाली, “ मध्यातरच्या वेळेस स्टेजवर येऊनच हा हार मी तुमच्या गळयात घालणार होतें, पण मला धीर झाला नाहीं. ”

बाबलीन हसून विचारल, “ तुम्ही कोण ते मला कळेल काय ? तुमच नाव— ? ”

ती स्त्री म्हणाली, “ माझं नांव नका विचारू. हा हार मी तुम्हाला घातलेला नाहीं. ज्यांनीं माझ्याबरोबर मुद्दाम धाडला ते इथल्या मिलिटरी

हॉस्पिटलमध्ये अथरुणावर पडून आहेत. मी तिथली एक नर्स आहे. त्याचं नाव विचारा— '

बाबलीनं हसून म्हटलं, " सांगा. "

" कॅप्टन पंडित भोसले. "

" काय, म्हणता काय ?" बाबलीनं अत्यंत आश्चर्यानं आणि आतुरतेनं विचारलं, " ते इथे मुंबईत आहेत ? "

" होय, ते आज महिनाभर इथल्या हॉस्पिटलमध्ये आहेत. "

" माझी त्यांची भेट होऊ शकेल ? '

" कां नाहीं होऊ शकणार ? जरूर होईल. '

" आत्ता येऊ मी तुमच्याबरोबर ? "

ती नर्स हंसली आणि म्हणाली, " आत्ता अपरात्रींच्या या वेळीं कशी भेट होईल ? "

" मग केव्हा ? उद्या सकाळीं ? "

" हो, सकाळीं होईल. "

" मला त्यांचा पत्ता देऊन ठेवा. "

त्या नर्सनं हॉस्पिटलचा पत्ता लिहून दिला.

रात्रीं बाबलीला मुळींसुद्धा झोंप लागली नाही. ज्युबिलीचा तो समारंभ तो सत्कार, तीं भाषणं, ते हार यापैकीं तिला काहीं एक आठवत नव्हतं. तिचं सारं लक्ष ही रात्र केव्हा एकदाची संपते याकडे होतं. सूर्योदय झाल्याबरोबर ती अथरुणावरून उठली. तिनं स्नान केलं. साधे कपडे केले. नऊ वाजल्याबरोबर ती हॉस्पिटलकडे निघाली. जाता जाता वाटेंत तिनं खूप फुलं विकत घेतलीं.

हॉस्पिटलच्या आवारात ती शिरली. गाडींतून खालीं उतरली. कुठे जावं, कुणाला विचारावं या शंकेनं क्षणभर उभी राहिली. आणि तितक्यात कॅप्टन पंडित भोसले तिच्या नजरेस पडला. तिला अतिशय आनंद झाला. पण तिच्या पोटांत एकदम् धस्स झालं... कारण तिनं पाहिलं तों हिरवळीवर एका चाकाच्या खुर्चींत तो बसला होता. खुर्चीच्या पायड्यावर एक पाय त्यानं ठेवला होता. त्याचा दुसरा पाय लाकडी होता !

ती हात रुमाल दाखवीत धांवतच गेली. ती दृष्टीस पडल्याबरोबर तो चकित झाला अन् हसला. ती जराशीं दूर असतानाच तो म्हणाला, "बाबली !" ती जवळ गेली. "पंडित" असं म्हणून तिनं बरोबर आणलेल्या फुलांचा भारा त्याच्या पायांवर ठेवला.

त्यानं हंसून म्हटलं, "तू येशील असं मला वाटलं नव्हतं."

तिनं त्याचे दोन्ही हात धरले आणि म्हटलं, "माझ्यासाठीं तूं हार पाठविशील असं मला तरी कुठें वाटलं होतं? पंडित, तू मला विसरला नाहींस!"

तो म्हणाला, "बाबली, मी तुला कसा विसरेन."

तितक्यात तिनं आपल्या लाकडी पायाकडे पाहिलं अशी त्याला शंका आली, त्याची चर्या एकदम खिन्न झाली. त्याच्या मनांतले विचार ओळखून ती म्हणाली, "पंडित, तू उगीच वाईट वाटून घेऊं नकोस, तू कसाही असलास तरी मला हवास. मागं लढाईवर निघाला होतास म्हणून मला टाकून गेला होतास. आता तसं करूं नकोस. आतां नाहीं ना तुला लढाईवर जायचं?"

"आता कसचा जातों! इथून डिस्चार्ज मिळाला, कीं मी गांवीं जाणार."

"एकटा जाऊं नकोस. आपण दोघ मिळून जाऊ. देवीच्या पाया पडायला म्हणून जाऊं. तुझ्या वडिलांचे आशीर्वाद मागायला जाऊं जोडीनं!"

त्यानं आपल्या लाकडी पायाकडे नजर टाकल्यासारखं केलं आणि म्हटलं, "हें चालेल तुला?"

तिनं हुंदका गिळतां गिळतां मान हालविली आणि मग उभ्या उभ्याच त्याचं मस्तक ओढून घेऊन आपल्या छातीशीं टेकलं.

पिंपरी स्टेशनाच्या अलिकडच्या चढतीवर गाडी एकदम थांबली तेव्हा त्या पहाटेच्या प्रहरीं एकमेकाच्या अंगाखांद्यावर मरगळलेल्या माना टाकून व रात्रभरच्या जागरणानं तारवटलेले डोळे मिटून झोपेच्या चार डुलक्या मिळाल्या तर घेऊ पाहणारे, माणसांनीं खचून भरलेल्या थर्डक्लासमधले, उतारू डब्याला बसलेल्या धक्क्यानं खडबडून जागे झाले. परंतु त्यापैकीं बहुतेकानीं गाडी फक्त धावायची बंद होऊन उभी राहिली आहे, आपल्या जिवाला ज्यायोगें धोका उत्पन्न होईल असा अपघात झालेला नाहीं, एवढा अदमास घेतल्यावर एखाद दुसरी जांभई देऊन शेजारच्या माणसाच्या अंगावर अथवा खिडकीच्या फळीवर डोक्याचा पुढचा अगर मागचा भाग टेकून झोपेच योगसाधन पुन्हा सुरू केलं. दहा वीस जणानीं मात्र विड्या शिलगावल्या, खिडक्या उघडून त्यावाटे तोंडं बाहेर काढून गाडी अशी एकदम आचके देऊन का उभी राहिली त्याची पाहणी केली, आणि सिग्नल पडला नसल्यामुळें गाडी थांबली हे समजल्यावर "हात्-त्येच्या !" असा निराशेचा उद्‌गार काढून, थुंकून, आपापल्या माना खिडकींतून आत घेतल्या, व जांभया देतां देता आणि नाकातोंडातून धूर काढता काढता गाडी पिंपरी स्टेशनावर किती लेट झाली होती त्याची आपसात चर्चा सुरू केली. ती चर्चा लवकरच थांबली असती व घामाच्या दर्पानं आणि अर्धवट अंधारानं भरलेल्या त्या डब्यात पुन्हा सारं स्तब्ध झालं असतं. पण तितक्यात संडासाच्या फळीला टेकून अंग दुमडून घेऊन णा उतारूच्या मिरच्याच्या पोत्यावर अवघडून निजलेल्या संभून एक भयंकर किंकाळी फोडली आणि अंगाला वाकडे तिकडे हिसके दिले !

ती ऐकताच सारीं माणसं खडबडून जागीं होऊन सावरून बसलीं व तारवटलेले डोळे ताणून संडासाकडे पाहू लागलीं. "कोण ओरडलं ?" "कुणीं किंकाळी फोडली ? काय झालं हो ?" अशा घोगऱ्या प्रश्नाची गजबज माजली. संभूच्या जवळच्या माणसानीं ओळखलं होतं कीं झोपेंत कसल तरी स्वप्न पडल्यामुळें तो दचकून किंचाळला होता. एकदोघानीं याला गदगदां हालवलं व म्हटलं, "काय झालं रे ? जागा झालास कीं

नाहीं ? डोळे उघड, डोळे उघड ! ” चोराला काढण्यानी बाधून घेऊन निघालेले दोन पोलीस शिपाई सडासाजवळच्याच बाकावर बसले होते; त्याच्यापैकीं एकान आपल्याबरोबरच्या वॉटरबॅगमधल पाणी घेऊन ते सभूच्या तोंडावर मारल. त्याबरोबर संभूनं मान झटकली, दोन्ही पजानी पाणी पुसल, आणि डोळ्याची उघडझाप केली. कुणी तरी त्याला विचारल, “ काय रे, स्वप्न पडल होय ? ” त्यान फक्त मान हालविली. त्या माणसान पुन्हा विचारल. “कसल स्वप्न पडल ? आम्हाला साग तरी. ही घे विडी ! ” पण सभून मान हालवून नको म्हटल आणि त्या माणसाच्या प्रश्नालाहि त्यान काहीं उत्तर दिल नाहीं. त्याला जे स्वप्न पडल होत ते तो कुणाला सागू शकत नव्हता ते सागितल तर बाकावरच्या दोन पोलीस शिपायाच्या मधोमध काढण्यानीं आवळलेले हात एकमेकावर दुमडून बसलेल्या त्या चोरासारखी आपली अवस्था होईल हें त्याला कळत होत. तो गप्प राहिला. सडासाच्या फळीवर मान टेकून त्यानं डोळे मिटले. पुन्हा तें भयंकर स्वप्न पडू नये म्हणून झोप न घेण्याचा त्यान निश्चय केला. मात्र ज्या गोष्टींतून त्याच्या त्या भयकर स्वप्नाचा उगम झाला होता त्या गोष्टींबद्दलचे विचार त्याच्या मनात सुरू झाले.

एका माणसाचा खून करण्याची कामागिरी पत्करून तो निघाला होता ! हा खून शक्य तितक्या लवकर आणि बिनबोभाट उरकण्याच त्यान कबूल केल होत, व बक्षिसाची सबध रक्कम आगाऊ घेतली होती. ही त्याची नेहमीची पद्धति होती. अलीकडे या टापूंत चार कार्यकर्त्याचे जे खून एकामागोमाग झाले होते व ज्यांच्या बातम्या ऐकून सामान्य लोक भेदरून गेले होते, ते सारे करताना सभूनं बक्षिसाची सारी रक्कम अशीच आगाऊ घेतली होती. धान्याचा, साखरेचा, रॉकेलचा, पेट्रोलचा, कापडाचा काळाबाजार करणाऱ्या लोकाना जे कार्यकर्ते दुष्मनासारखे वाटत होते, त्याचे काटे काढण्यात सभूसारखा दुसरा वाकबगार माणूस नाहीं अशी त्याची खात्री होती, व त्याच्या हातावर चार पाच हजार रुपये एका रकमेन आगाऊ ठेवण्यात त्याना काहींच धोका वाटत नसे. संभू मागाचं काम करीत होता, पण त्यातहि इमानाला जागत होता. ज्या काळाबाजारवाल्यांचीं काम त्यानं

पत्करलीं त्यांना त्याच्या पैशाचा मोबदला त्यान इमानान दिला होता. त्याचे शत्रू त्यान झटाझट दूर केले होते!

अशाच कामगिरीवर तो आता 'धायवड'ला निघाला होता. त्या भागातल्या एका काळाबाजारवाल्याची कामगिरी त्यानं पत्करली होती. त्या व्यापाऱ्याला निश्चिंत करण्यासाठीं तो आणखी एक खून करणार होता. फरक एवढाच कीं ज्याचा खून पाडण्यासाठी तो आता धायवडला निघाला होता तो त्याचा एके काळचा दोस्त होता. या जिल्ह्यात आणि आसपासच्या भागात १९४२ मध्यें जी घातपाती चळवळ झाली त्या चळवळींत संभू आणि ज्या चंद्रोजी राण्याचा खून करण्याच्या कामगिरीवर तो निघाला होता तो चंद्रोजी हे दोघेहि हातात हात घालून वावरले होते. देशाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर मात्र या दोघाच्या विचारसरणींत तफावत पडली होती व त्याच्या वाटा निराळ्या झाल्या होत्या. देशात प्रथम शांतता व सुव्यवस्था झाली पाहिजे व सर्व प्रकारच उत्पादन वाढलं पाहिजे असं प्रतिपादणाऱ्या पक्षांत सामील होऊन चंद्रोजी कार्य करीत राहिला होता, उलट नेहरू सरकारच्या मार्गात काही ना काहीं विघ्नं आणण्याच्या हेतूनं विरोधी आघाडी उघडणाऱ्या पक्षात संभू काही दिवस सामील झाला होता पण लौकरच त्या पक्षाचेहि काम त्यान सोडून दिलं होतं. बेचाळीसच्या अखेर अखेर त्या चळवळींतले काहीं लोक देशकार्याच्या नावाखालीं गब्बर होण्याच्या खटपटीला लागले होते. संभू अशा लोकांपैकी होता. त्याला पैशाची आणि 'की जय'च्या आरोळ्यांची चटक लागली होती. यापैकीं त्या आरोळ्या मिळविण बदललेल्या शांततेच्या काळात सोप नाहीं हें जेव्हा संभूच्या लक्षात आल तेव्हा तो वाटेल त्या गोष्टी करून पैसे मिळविण्याच्या मार्गाला लागला. घातपात, जाळपोळ आणि खून या गोष्टींना देशभक्ति म्हणावयास आता कोणी तयार नव्हत. पण या मालाला काळाबाजारवाल्यांच्या बाजारात मागणी होती. या मागणीचा फायदा संभूनं घेतला होता. त्यान आतापर्यंत चार कार्यकर्त्यांचे खून करून काळाबाजारवाल्यांचा मार्ग निष्कंटक केला होता. आता तो आपला पूर्वीचा दोस्त चंद्रोजी राणे याचा निकाल लावण्यासाठीं धायवडला चालला होता...आतां हें पिंपरी स्टेशन येणार होतं...दुपारीं बारा वाजण्याच्या सुमारास धायवड स्टेशन.

स्टेशनापासून पाच मैलावर एका छोट्या वाडींत चंद्रोजी रहात होता...

गाडी थोडीशी हादरली आणि डब्याला हिसका बसला तेव्हा संभू आपल्या विचारातून जागा झाला. चाकाचा चमत्कारिक तकारखोर आवाज क्षणभर झाला व तो सपला तेव्हा गाडीची गतीही सपली, आणि मग एकदम खिडकी उघडल्याबरोबर वादळी वाऱ्याचा झोत आत शिरावा त्याप्रमाणें माणसाचा कलकलाट डब्यात शिरला. ज्या पोत्यावर सभू अग दुमडून बसला होता त्यावर कुणी तरी बुटाचे पाय खसकन् दिल्यामुळें आतल्या मिरच्याचा खकाणा उडाला. तो नाकातोंडात शिरल्यामुळें सभूला एकामागोमाग एक अशा चार पाच शिंका आल्या आणि दोन्ही हात तोंडावर ठेवून खोकला आवरता आवरता तो हैराण झाला त्याच्या नाकातोंडातून पाणी ओघळल, त्याच्या मनातले विचार पार नाहींसे झाले. तो अगदीं पुरता जागा होऊन पाहू लागला...पिंपरी स्टेशन आल होत !

उतारूची झिमड उडाली, चार सहा लोक डब्याखालीं उतरले, परंतु दहा वीस आत शिरले, आणि तितकेच आत घुसण्यासाठीं दाराशीं गर्दी करून उभे होते. आधींच माणसानीं खचून भरलेल्या त्या डब्यात बोचकीं कोंबलीं जात होतीं, माणसं शिरत होतीं. 'जागा नाहीं' 'जागा नाहीं' म्हणून आतले लोक ओरडत होते, परतु त्या ओरडण्याला न जुमानता एकेक माणूस आत शिरतच होता. एक म्हातारा माणूस दाराबाहेर उभा राहून हात जोडून विनवणी करीत होता. "पोरीला वाइच जागा द्या हो !". त्याच्या शेजारीं एक दीड वर्षाच पोर हातात घेऊन वीस वर्षाची एक तरुण मुलगी उभी होती, आणि तिच्या पदराला धरून आठ दहा वर्षाचा एक मुलगा उभा होता. म्हाताऱ्याच्या विनवणीला कुणी दाद देईना. "चढ, शीर की डब्यामदी !" अस तो आपल्या लेकीवर खेकसून ओरडूं लागला. "शीर म्हणजे कशी शिरूं सागा ना !" अस ती आपल्या बापाला रडव्या स्वरानं विचारू लागली. गाडीची शिटी वाजली. हिरव निशाण उंच करीत आपल्या डब्याकडे जाणाऱ्या गार्डान म्हताऱ्याला एक शिवी हासडून म्हटलं, "उभा काय राहिलास? बस कीं ! गाडी चालू होणार बघ." म्हाताऱ्यान दोन बोचकीं डब्यात टाकलीं, आठ दहा वर्षांच्या त्या मुलाला खसकन उचलून डब्याच्या पायरीवर ठेवल, आणि

लेकीच्या हातांतलं तान्ह मूल आपल्या हातीं घेऊन तो तिच्यावर ओरडला "चढ, चढ बिगी बिगी!" त्यान तिचं तान्ह मूल परत दिल तेव्हा गाडी चालू झाली होती. लाबून त्याचे शब्द ऐकू आले, "जाई, सभाळून जा. येशा, नीट सभाळून जारे!" तो आठ दहा वर्षाचा मुलगा दारात आपला तोल कसाबसा सावरीत उभा राहून म्हाताऱ्याला हात दाखवीत होता, आणि ओरडत होता, "बाबा, तुम्ही जावा आता!"

जाईच्या हातातलं तान्हं मूल भेदरून आणि गुदमरून मोठमोठ्यादा रडूं लागल. तिन उभ्याउभ्याच त्याला आपल्या पदराखालीं घेतल. पण गाडीला हिसके बसत होते त्यामुळं त्या अर्भकाला स्तनपान करता येईना, आणि तें आणखीच रडूं लागल. कुठे टेकायला मिळेल काय म्हणून जाईन इकडे तिकडे दृष्टि टाकली. सभूच्या नजरेला तिची नजर भिडली. तो चट्कन् उठला व तिला हळूच म्हणाला, "इथ बसा तुम्ही." कृतज्ञतेचा एक कटाक्ष त्याच्याकडे टाकून जाई बसली. नीट माडी घालून ती आपली चोळी वर करूं लागली तेव्हा सभून आपली नजर फिरवली. जाईच मूल एकदम शात झालं. त्यान आपल्या गोजिरवाण्या लालसर हाताची मूठ वर केली तेव्हा जाईन एकदम खालीं वाकून त्या मुठीचा मुका घेतला. पोलीस शिपायाशेजारीं बाकाच्या टोकावर कसबस टेकून बसून संभू येशाला म्हणाला "ये" आणि आपल्या माडीवर त्यान त्याला बसविल. बसायला इतकी सुदर जागा मिळाल्यामुळे छाटा येशा खुशींत आला आणि जाईशीं गप्पा मारू लागला. जाईन आपल्या मुलाला पदरावेगळं केल्यावर तो त्या बालकाच्या तोडापुढ चुटक्या वाजवीत खिडकीबाहेर बोट दाखवीत "तो पहा कावळा" "ती पहा चिमणी" अशा महत्त्वाच्या बातम्या सागूं लागला. "येशामामा काय म्हणतो?" असं जाईहि आपल्या बालकाला पुनः पुनः विचारू लागली. माणसानीं खचून भरलेल्या एका डब्यात आपण कशींबशीं बसलों आहोत याचं भान त्या बहीण भावाना उरल नव्हत. जाईच्या माडीवर हसत पडलेल्या त्या चिमुकल्या जीवाच परोपरीन कौतुक करण्यात तीं दोघ गुंग झालीं होतीं. आणि तें गोड दृश्य पाहण्यात सभू इतर साऱ्या गोष्टी विसरून चूर झाला होता...

डब्यातली बहुतेक गर्दी यात्रेची होती. ती पुढच्या स्टेशनावर खालीं उतरली. कैद्याला घेऊन चाललेले दोघे शिपाईदेखील त्या स्टेशनावर उतरले. मिरच्या घेऊन निघालेला गुजर दुकानदारहि आपलीं पोतीं खालीं ओढून घेऊन निघून गेला. डब्यात ऐसपैस जागा झाली. संभूच्या मांडी-वरून उडी मारून येशान खिडकीशेजारीं जागा पटकावली. बोचक्यातल एक दुपटं काढून तें बाकावर पसरून जाईन आपल्या तान्ह्या मुलाला निजाविल, व काहीं वेळ त्याला थोपटल्यावर तिन बोचक्यातून एक पुस्तक काढल व ते ती वाचू लागली. त्या पुस्तकाच्या रंगीत मुखपृष्ठावरच्या चित्रात काळा बुरखा घेतलेला एक इसम दुसऱ्या एका माणसाच्या पाठींत खंजीर मारीत होता. त्या चित्राकडे आणि चित्राच्या वरच्या बाजूस पुस्तकाच्या नावाचीं जाड ठशातलीं अक्षर होतीं त्याकडे सभू निरखून पाहू लागला. परंतु तीं अक्षरं त्याला उलटीं दिसत असल्यामुळे आणि गाडीच्या धक्क्याबरोबर जाईच्या हातातल पुस्तक सारख हालत असल्या-मुळ त्याला ते नाव वाचता येईना. काहीं वेळान पुस्तकाच्या मलपृष्ठावरच चित्रदेखील आपल्याला उलट दिसत आहे असा भास सभूला होऊ लागला. आणि तें चित्र मोठ मोठ होत जाऊन सबंध डब्यात भरल आहे आणि तें आपल्यापुढ वाकडं तिकड नाचत आहे असहि त्याला वाटू लागलं. त्यानं आपले हात तोंडावर ठेवले आणि मान फिरविली. जाईकडे अगर तिच्या हातातील पुस्तकाकडे पुन्हा दृष्टि टाकण्याचा त्याला काहीं केल्या धीर होईना !

त्याच्या कानावर मञ्जुळ स्वर आले म्हणून त्यानं चमकून वळून पाहिल. खिडकीपाशीं बसलेला येशा तोंडान एक लहानसा बाजा वाजवीत होता. संभूचा व त्याची दृष्टादृष्ट झाल्याबरोबर त्यान बाजा तोंडावेगळा करून हास्य केलं आणि विचारल, " तुम्हाला येतो वाजविता ? " सभूनं मान हालविली, पण त्याच्या नकळत त्याच्या तोंडावर थोडं हास्य उमटल असावं. कारण येशा खिडकीपासल्या आपल्या जागेवरून उठला व त्याच्यापुढे उभा राहून बाजा पुढे करून म्हणाला, " वाजवा ना ! "

"मला वाजविता येत नाहीं" असं संभू म्हणणार होता; पण तितक्यात जाई आपल्या जागेवरून येशाला म्हणाली, " वेडा तर नाहींस तू येशा ?

तुझ्या तोडानं उष्टा झालेला बाजा दुसऱ्या माणसान तोंडाला कसा लावायचा रे!" आणि लगेच सभूकडे पाहून ती म्हणाली, "आणि आठ आण्याचा बाजा तो वाजणार कितीसा? पण परवा जत्रेत विकत घेऊन दिल्यापासून यानं सारखी कटकट चालविली आहे. फुक मारून प्य प्यं करून वाकडे तिकडे सूर काढतो, आणखी विचारलं तर म्हणतो, 'जन गण मन' वाजवतों आहे मी! खुळा रे खुळा! चल बस आपल्या जागेला!" असं म्हणून ती मोठ्यादा हसली. इतक गोड हसणं संभून जन्मात पूर्वी कधीं ऐकल नव्हत.

येशा थोडासा खजिल होऊन खिडकीजवळच्या आपल्या जागीं परत बसला. त्यानं आपला बाजा खिशात घातला आणि बाहेरच्या शेतात चरणारीं गुरं तो मोजू लागला. तितक्यात गाडी एका लहानशा पुलावरून गेली तेव्हा गुराऐवजी पूल मोजायच त्यान ठरविल. पण बराच वेळ झाला तरी दुसरा पूल येईना तेव्हा अंगावरून धावत गेल्याप्रमाणें वाटणारे तारेचे खाब तो मोजू लागला वीस खाब मोजल्यावर त्याला त्या गोष्टीचाहि कंटाळा आला. मग तो एकदम जागेवरून उठला, पुन्हा सभूसमोर येऊन उभा राहिला, आणि खिशातून एक छोटासा पत्त्याचा जोड काढून म्हणाला, "आपण पत्त्यानीं खेळू या काय?"

मध्यतरीं पुन्हा आपल्या विचारात मग्न झालेला सभू दचकल्यासारखं करून म्हणाला, "आ?"

हातातले पत्ते दाखवीत येशा म्हणाला, "आपण खेळू या काय?"

सभूनं विचारलं, "दोघानींच खेळायच?"

"हो हो. दोघात खेळायचा डाव आहे की!"

"पण मला येत नाहीं रे!"

"मी शिकवतों कीं तुम्हाला. अगदी सोपा आहे. तुम्ही जरा वळून असे आडवे माडी घालून बसा." अस म्हणता म्हणता बाकावर सभूसमोर बैठक मारून डाव पिसून पालथ्या पत्त्याच्या दोन ओळी तयार करण्यास येशान सुरुवात केलीदेखील.

"आता काय करावं ह्या खुळ्याला!" असे जाईचे शब्द संभूला ऐकू आले. त्यानं तिच्याकडे पाहिलं आणि हळूच म्हटलं, "मला त्रास

नाहीं होत त्याचा. बोलून चालून लहान मुलगा आहे." जाई हसली.

काहीं वेळानं तिनं बोचक्यातून फराळाचे जिन्नस काढले आणि येशाला ओरडून विचारल, "ए पोरा, आता जरा फराळ करतोस का ?"

त्या डावात येशाच्या हातात फारच खराब पान आली होतीं, त्यामुळे बहिणीचा प्रश्न त्याला चटकन् ऐकू गेला. हातातलीं पानं टाकून देऊन तो संभूला म्हणाला, " आता बस्स झाल ! " आणि एकदम उठून तो जाईजवळ गेला.

जाईनं एका डब्याच्या झाकणात फराळाचे जिन्नस घातले व ते झाकण येशाच्या हातीं देऊन, नजरेन सभूकडे खूण करीत ती त्याला म्हणाली, " आधीं हे त्याना दे. "

सभू झट्कन् म्हणाला, " नको नको, मला काहीं नको. "

जाई म्हणाली, " घ्या, घ्या. नको काय म्हणता ! "

" मीं अजून सकाळपासून चूळदेखील भरली नाहीं. "

" हात्तिच्या ! मग आपल्याजवळ पाणी आहे कीं. येशा, तो लोटा दे त्याना. "

मग संभूचा नाइलाज झाला.त्यान चूळ भरून टाकली आणि येशाच्या हातातल झाकण आपल्या हातात घेतल

दुपारीं धायवड स्टेशन आलं तेव्हा जाई आणि येशा आपलीं बोचकीं चटकन घेऊन डब्याखालीं उतरलीं. सभूहि त्याच्या मागोमाग उतरला. ज्या शेटजीची कामगिरी त्यानं पत्करली होती ते त्याला स्टेशनवरच भेटणार होतें, म्हणून ते कुठें दिसतात काय ते तो पाहू लागला. जाईशीं बोलण्याची त्याची फार इच्छा होती, पण त्याला धीर होत नव्हता. येशाशीं त्याला बोलता आल असतं, पण ती स्वारी डोक्यावर बोचक घेऊन लगबग पावल टाकीत केव्हाच दूर गेली होती. एकीकडे शेटजींची लढ, खादीनं नखशिखान्त झांकलेली आकृति नजरेन शोधता शोधता जाईच्या पाठमोऱ्या आकृतीकडे सभू पहात राहिला. गर्दींत अदृश्य होता होता जाईनं एकदा मागं वळून पाहिल. संभूनं तिच्या नजरेशीं नजर भिडवली आणि तो मनातल्या मनात तिला उद्देशून म्हणाला, 'तूं, तुझ गोजिरवाणं तान्ह मूल, आणि तुझा भाऊ याच्या संगतींत

माझा वेळ फार चांगला गेला. तुझ्या हातच गोडधोड फराळाच मीं खाल्ल. तुझे फार उपकार झाले माझ्यावर. आपली भेट पुन्हा कशाला होणार आहे? पण मला तुझी आठवण नेहमीं राहील. देव तुझं भलं करो.' हे सार संभू मनातल्या मनात म्हणाला होता; पण जणू ते ऐकल्याप्रमाणे आणि समजल्याप्रमाणे जाई त्याच्याकडे पाहून हसली असं त्याला वाटलं. ती दिसेनाशी झाली तरी तो गर्दीकडे पहात राहिला. "काय संभू? आलास?" असे शब्द त्याच्या कानावर आले तेव्हा त्यान चमकून वळून पाहिल. काळाबाजारवाले गलेलठ्ठ शेटजी त्याच्यापुढे उभे होते आणि त्याच्याकडे पाहून हसत होते. संभू हसला नाहीं. "हो, आलो" अस अगदीं हलक्या आवाजात म्हणून तो त्याच्या मागोमाग चालू लागला.

स्टेशनापासून पाच मैल दूर अगदी आडरस्त्याला असलेल्या वाडींत संभू शिरला तेव्हा तिन्हीसाजा टळून गेल्या होत्या. पत्करलेली कामगिरी आटोपून लगेच धायवड स्टेशनावर परत येऊन रात्रीच्या गाडीनं पसार होण्याचा बेत संभून केला होता. त्यामुळे अपरात्रीऐवजीं या घटकेलाच चंद्रोजीचा निकाल लावण्याच त्यान ठरविल होतं. रात्रीचा पहिलाच प्रहर होता, पण अमावास्या असल्यामुळे जिकडे तिकडे अंधार पसरला होता. वाडीच मोकळ आवार ओलांडल्यावर चंद्रोजीच्या राहत्या झोपडीजवळ संभू चोरट्या पावलानीं आला तेव्हा गोठ्यातल्या गुराच्या हालचालीचे आवाज त्याला ऐकू आले, आणि शेणमुताचा उग्र वास त्याच्या नाकात शिरला. झोपडीच्या रोखान तो हलके हलके जाऊं लागला. एका वाळलेल्या फांदीवर त्याचा पाय पडून तिचा आवाज झाला तेव्हा एक मिनिटभर तो जागच्या जागीं उभा राहिला. गोठ्यातील गाय हंबरली. दूर कुठें तरी उसाच्या शेतात कोल्हे ओरडले. आजूबाजूला मेंदीचीं झाडं बहरलीं होतीं, त्याच्या सुगंधाचा भपकारा वाऱ्याबरोबर संभूच्या अंगावरून गेला. साऱ्या दिशा गडद अंधारान भरून गेल्या होत्या. फक्त चंद्रोजीच्या राहत्या झोपडींत दिवा जळत होता. त्याच्या प्रकाशाच्या उभ्या आडव्या चिरा लिंपलेल्या भिंतींतून दिसत होत्या...

काहीं वेळानं संभू पुन्हा चोरट्या पावलानीं चालूं लागला. झोपडीच्या

दारापाशीं पोचल्यावर त्यान तें हलकं हातानं आंत ढकलून पाहिल. तें आतून लावलेल नसल्यामुळे सहज उघडलं गेल. अंधारातून आल्यामुळें सभूच्या दृष्टीला झोंपडींतच्या बत्तीचा उजेड जरा जास्तच वाटला. डोळ्याची उघडझाप करीत आत पाऊल टाकून तो म्हणाला, " चद्रोजी, घरात आहेस का तू ?"

त्याच्या प्रश्नाला उत्तर मिळालं नाहीं म्हणून त्यान पुन्हा हाक मारली, " चंद्रोजी ! "

त्यान इकडे तिकडे निरखून पाहिल. झोपडीच्या एका कोंपऱ्यात कुडाची भिंत उभी केली होती. तिच्या पलीकडचा भाग अधारात होता. त्या भिंतीच्या अलीकडे एक खाट होती. खाटेशेजारीं एक उच घडवची होती. तिच्या पायड्यावर कागद आणि पुस्तक रचलेलीं होतीं, घडवचीच्या वरच्या बाजूस भिंतीवर गाधी आणि नेहरू याचे छाटे छोटे फोटो होते. खाटेला लागून जमिनीवर अथरलेल्या सतरंजीवर इग्रजी मराठी वर्तमानपत्र पडलीं होतीं. आणि त्या वर्तमानपत्रांच्या गर्दींतच मातीचे रगविलेले दोन छोटे खेळण्यातले बैल उभे होते. त्या बैलाकडे पाहून सभूला मोठा चमत्कार वाटला. चंद्रोजीच्या घरात एखाद मूल असेल अशी त्याची कल्पना नव्हती. बेचाळीसच्या चळवळींत तो आणि चद्रोजी एकत्र काम करीत होते तेव्हा चंद्रोजीच लग्न झाल नव्हत. नतरहि त्याच लग्न झाल्याची बातमी सभून कधीं ऐकली नव्हती ...

सभून आवाज किंचित उच करून पुन्हा हाक मारली, " चद्रोजी ! "

कुडाच्या भिंतीजवळच्या कॉटवरच पाघरुण हाललं, आणि जराशा क्षीण स्वरात शब्द ऐकू आले, " कोण आहे ?". खाटेवर निजलेल्या चद्रोजीन भिंतीकडे असलेल आपल तोंड फिरविल आणि पुन्हा विचारल, "कोण ?". दाराच्या जरा अलीकडे उभा असलेला संभू त्याला दिसल्याबरोबर तो जरा प्रयत्नानं उठून बसला, आणि हलकं आवाजांत म्हणाला " कोण ? सभू !" हसत हसत त्यान आपला उजवा हात उचलला आणि तो पुढें म्हणाला, " अरे दोस्त ! किती दिवसानी दृष्टीस पडतो आहेस ! मी जरा आजारी आहे. मला उठवत नाहीं. ये असा माझ्याजवळ—"

त्याचं वाक्य पुरं होण्यापूर्वींच संभुनं पिस्तुल काढून रोखून म्हटलं,

" चंद्रोजी! दोस्ताच्या नात्यानं तुला भेटायसाठीं मी आलों नाहीं. तुला ठार मारण्यासाठीं आलो आहे. तुझा जीव घेणार आहे मी!"

त्याच्या हातातलं तें पिस्तुल पाहून आणि त्याचे ते शब्द ऐकून चंद्रोजीच्या विशाल भालप्रदेशावर विलक्षण आश्चर्याची आठी उभी राहिली. परंतु तो भ्याला नाहीं. उलट किंचित् हसून त्यान विचारलं, " माझा जीव घ्यायला आलास? तो इतक्या मोलाचा तुला कशासाठीं वाटला?"

संभू म्हणाला, " मला नाही वाटला. ज्याच्या काळ्याबाजाराच्या व्यापारावर तुझ्या खटपटीचं आणि लोकप्रियतेच संकट आलेल आहे त्याना मोलाचा वाटला आहे. आणि तो घेण्याची कामगिरी मीं पत्करलेली आहे."

" तूं ही कामगिरी पत्करलीस? संभू, हें तूं काय बोलतो आहेस? मला ठार करून लोकाचं कोणतं कल्याण तूं साधणार आहेस?"

" लोकाचं कल्याण, देशभक्ति इत्यादि शब्दांची मीं केव्हाच रजा घेतलेली आहे. चंद्रोजी, माझ्या स्वतःच्या फायद्यापलीकडे दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीकडे पाहण्याची माझी इच्छा नाहीं."

चंद्रोजीनं विचारलं, "मला मारून तुझा तरी काय फायदा होणार आहे?"

" तुला ठार करून ज्या काळाबाजारवाल्यांचा मार्ग मी निष्कंटक करणार आहे त्याच्याकडून माझ्या कामगिरीबद्दल भरपूर पैसे कसे घ्यावे तें मला माहीत झालेलं आहे."

"म्हणजे केवळ पैशासाठीं तूं हें नीच कृत्य करणार आहेस म्हणायचा!"

संभू म्हणाला, " देशात सारे लोक नीच कृत्य करण्यांतच मग्न झालेले आहेत, मग मींच एकट्यानं पापपुण्याचा विचार कशासाठीं करावयाचा? याहूनहि अधिक नीच कामं करण्यात गुतलेलीं माणस खाताहेत, पिताहेत, चैनींत राहताहेत, मोटारी उडवीत आहेत! त्यांचं पारिपत्य सरकार करू शकत नाहीं. देशात सरकारचं राज्य आहेच कुठे मुळीं? गुंडाचं राज्य चाललेलं आहे–"

" म्हणूनच तूं गुंड होता कामा नये!" चंद्रोजी आवेशानं म्हणाला, " गुंडात सामील होऊन सरकारला आणखी दुबळं करण हें तुझ्यामाझ्यासारख्या माणसांचं काम नाहीं, संभू. लाचलुचपतीला, खोट्या व्यापाराला, सभ्य बदमाषगिरीला पायबंद घालून सरकारवरचा भार हलका करणं हें

आपल काम आहे. हें राज्य नेहरूंच नाहीं. ते माझं आहे, तुझं आहे, प्रत्येकाच आहे ! तें राज्य शुद्ध व मजबूत करण्याऐवजीं त्याच्या जिवावर उठलेल्या लबाड व्यापाऱ्याची कामगिरी तू करणार? माझे प्राण तुला घ्यायचे असतील तर खुशाल घे पण नीट विचार कर कीं तूं माझे प्राण घेणार नाहींस, तर ज्या स्वातंत्र्यासाठी आपण खांद्याला खांदा लावून चार वर्षे झगडलो, त्या स्वातंत्र्याचा जीव तू घेणार आहेस !"

संभू जरा चिडून म्हणाला, "हें ब्रह्मज्ञान मला ऐकायच नाहीं. तुझा निकाल लावायसाठीं मी तुला ठार करणार."

"ठीक आहे. घाल गोळी मला" चंद्रोजी म्हणाला. "पण संभू, एक गोष्ट लक्षात ठेव, की अशान माझा निकाल लागणार नाहीं. मी काय सामान्य लोकाना सुखी करण्यासाठीं झटणारा एक यःकश्चित् कार्यकर्ता आहे. जें कार्य मी करतों ते माझ्यापेक्षा मोठ आहे, पवित्र आहे, चिरंजीव आहे तें कार्य तुला नष्ट करता येणार नाहीं. तू माझे प्राण घेशील. पण त्या कार्याच्या रूपान मी जिवंत राहीन उलट तू मात्र जिवत असूनहि मेल्या-सारखा होशील."

संभू एकदम ओरडला, "ठीक ठीक ! मी मेल्यासारखा होईन आणि तू जिवंत राहशील काय ?" तो खदखदा हसला व पुढे म्हणाला, "चद्रोजी, आता आपली ही बोलाचाली बस झाली."

"होय, मलाहि तसच वाटत" चंद्रोजी म्हणाला, "माझी बायको बाहेर गेली आहे, ती परत येण्याच्या अगोदर तूं आपल काम आटपलस तर तेच अधिक बरें होईल."

तितक्यात कुडाच्या भिंतीपलीकडून तान्ह्या मुलाच्या रडण्याचा आवाज आला.

संभूनं विचारल, "तुझं मूल काय ?"

चंद्रोजी म्हणाला, "होय. पण त्याच्या रडण्याकडे तू लक्ष देऊ नकोस. मीहि देत नाहीं. मृत्युलोकाच्या बाहेर अखेरच पाऊल टाकताना मुलाच्या रडण्याचा आवाज कानांवर आला तरी तो ऐकू आला नाहीं असंच समजल पाहिजे. आपल्या माग तें आणखी किती तरी रडणार आहे, तें आपण बद करणार आहोंत काय ? जिथे तें रडण ऐकू येणार नाहीं अशा

स्थळीं मी पोंचलेला असेन. मग त्या स्थळीं जाता जाता ऐकू येणाऱ्या त्या अर्भकाच्या या रडण्याकडे मी कशाला लक्ष द्यावं ! तूहि तिकडे लक्ष देऊं नकोस. आटप संभू. माझी बायको येण्याच्या आत—"

बोलता बोलता चंद्रोजीची नजर संभूला ओलांडून दाराकडे गेली. दार लोटून आत येणारी जी आकृति त्याला दिसली ती जणू पोटभर पाहून घेतल्याप्रमाणें त्याचे डोळे मोठे झाले आणि चमकले. त्या आकृतीवरची दृष्टि किंचित्‌हि ढळूं न देता तो म्हणाला, " संभू ! आटप, माझ्या बायकोच्या लक्षात येण्यापूर्वी गोळी झाडशील तर माझ्यावर फार उपकार होतील."

चंद्रोजीची दृष्टि आपल्याकडे नसून आपल्या मागच्या दारावर खिळलेली आहे हें लक्षात येताच संभूनं किंचित् वळून दाराकडे पाहिलं, आणि तसं पाहिल्याबरोबर तो एकदम चमकून स्वतःशींच उद्गारला, " कोण ?...जाई ! तूं ? .."

जाईच्याहि तोंडातून आश्चर्याचा उद्गार बाहेर पडणार होता, पण तितक्यात तिची नजर संभूच्या हातातल्या पिस्तुलाकडे गेली आणि त्याबरोबर आश्चर्याऐवजीं भयंकर भीति तिच्या अंतःकरणात उसळली आणि तिनं किंकाळी फोडली ! दुपारीं आगगाडीमधें जिचं हास्य ऐकून संभूला वाटलं होतं कीं इतकं गोड हास्य आपण जन्मात कधीं पूर्वीं ऐकलं नव्हतं, तिची ती भेदरलेली किंकाळी ऐकून संभूला विलक्षण शरम वाटली ज्या हातात त्यानं पिस्तुल धरलं होतं तो त्याचा हात लुळा होऊन खालीं झुकला. धायवड ' स्टेशनवरच्या गर्दीत दिसेनाशा होणाऱ्या जाईकडे पाहता पाहता तिला उद्देशून तो आपल्या मनाशीं जे म्हणाला होता त्याची त्याला आठवण झाली ... " तुझ्या हातचं गोडधोड मीं खाल्लं...तुझी आठवण मी कधीं विसरणार नाहीं ... देव तुझं भलं करो " जिचं भलं त्यानं चिंतिलं होतं तिच्या कपाळावरचं कुंकू पुसण्यासाठीं तो आता या ठिकाणीं आला होता !...

परंतु मनाशीं असे विचार करीत असताना त्याची शरमलेली नजर मात्र जाईच्या चेहऱ्यावर खिळून राहिली होती. तो हलकेच तिला म्हणाला, " जाई ! भिऊं नकोस. मी फार वाईट काम करायसाठीं आलों होतों. पण आता तें मी करणार नाहीं ! "

इतक्यात इतका वेळ झोपडीबाहेर रेंगाळलेला येशा बाहेर दारांत येऊन उभा राहिला, आणि संभूला पाहिल्याबरोबर आश्चर्यानं आणि आनदान तो म्हणाला, "ओहो! तुम्ही इकड कुणीकडं हो?". तो धावत चद्रोजीजवळ गेला आणि त्याला सागू लागला, "गाडींत याच्या माडीवर बसलों होतो मी...याना मीं पत्त्याचा डाव शिकविला...फार चांगले आहेत. हे.. पण हे या वेळेस इकडे कसे आले?"

त्याच वेळेस संभूची आणि चंद्रोजीची नजरानजर झाली. संभूनं एकदम मान खालीं केली. थोड्याच वेळापूर्वी चंद्रोजींचे जे शब्द त्यानं ऐकले होते ते याच्या मनात आले... 'तू मात्र जिवत असून मेल्या-सारखा आहेस!'...स्वतःच्या मेलेल्या जिण्याची त्याला त्या क्षणीं भयकर खत वाटली... चद्रोजींचे आणखीहि शब्द त्याला आठवले... 'हे राज्य नेहरूचं नाहीं. माझं आहे, तुझं आहे, प्रत्येकाचं आहे...तें बळकट करण माझ काम आहे, तुझं काम आहे...'

त्याच्या मनाचा कांही तरी एक नवा निश्चय झाला असावा. इतका वेळ सैल पडलेली त्याची पिस्तुलावरची पकड घट्ट झाली. त्यानं वर मान करून चद्रोजीकडे पाहिलं आणि म्हटलं, "चद्रोजी, मी जातों. कदाचित् यापुढे कधींदेखील मी तुला दिसणार नाहीं. पण तुला एवढंच सागतों, कीं जिवंत असून मेल्यासारखा मी या जगांत कधीच राहणार नाहीं. माणसासारखा जगेन—आणि मरेन!"

तो चट्‌कन् वळला. जाईच्या अगावरून जातांना तो हलकेच म्हणाला, "जाई, जातों!" आणि दुसऱ्याच क्षणीं दारातून बाहेर पडून अंधारांत भराभरा चालू लागला.

दुसऱ्या दिवशीं खेड्यावरचे लोक चंद्रोजीकडे येऊं सागूं लागले कीं धायवडचा व्यापारी भोगीलाल याचा खून झाला होता!

ती बातमी ऐकल्याबरोबर तो खून कोणी केला असला पाहिजे तें चंद्रोजीन ओळखल, आणि त्याला फार वाईट वाटल. व्यापाऱ्याच्या काळ्या बाजाराला आळा घालणाऱ्या कार्यकर्त्यांचे प्राण घेण आणि काळा बाजारवाल्यांचे प्राण घेणं— या दोन्ही गोष्टी सारख्याच भयंकर आणि वेडेपणाच्या होत्या. संभू केव्हां आणि कुठें भेटेल अशी अधीर इच्छा

त्याच्या मनात उत्पन्न झाली. त्याच्या मनात आलं, या देशाचं हें केवढं दुर्दैव, की जें नकोस वाटेल त्याचा अत्याचारानं निकाल लावण्यास उद्युक्त होणारे संभूसारखे अनेक अविचारी लोक या देशात आहेत! दहशतीनं वाईटाचा संचार तात्पुरता थांबविता आला तरी त्याचा कायमचा नायनाट करता येणार नाहीं हें सारं संभूला नीट समजून सांगावसं त्याला फार वाटलं. संभू त्याच्यापासून फार दूर होता. या विचारानं त्याचा जीव हळहळू लागला. त्यानं एका पुस्तकात वाचलं होतं, की आपली तीव्र इच्छा असेल तर आपले विचार दुसऱ्या माणसापर्यंत पोचविता येतात...

तो एके दिवशीं संध्याकाळच्या वेळेस झोपडीबाहेरच्या आंगणांत सतरंजी टाकून एकटाच बसला होता. फिकट निळ्या आकाशात क्षितिजाच्या रेषेच्या जरा वर दिसू लागणाऱ्या एका चांदणीकडे नजर लावून, संभू आपल्या जवळच बसला आहे अशा दृढ समजुतीनं तो म्हणाला, "संभू, तू कार्यकर्त्यांना मारीत होतास ते चूकच होतं. आतां काळाबाजार करणाऱ्यांना मारीत सुटशील तर तेंहि चूक आहे. दहशतीनं राज्य बळकट होत नाहीं. लोक सुखी होत नाहीत. अशा चुकीच्या वाटेनं जाऊ नकोस, संभू!"

संभूचा आवाज त्याला ऐकू आला, "मग मी काय करू?"

तो म्हणाला, "माझ्याकडे ये!"

"येईन!" असे संभूचे शब्द त्याला स्पष्ट ऐकू आले.

रात्रीं जेवताना जाईनं त्याला विचारलं, "आज तुम्ही इतक्या कसल्या मोठ्या आनंदात आहात!"

चंद्रोजी म्हणाला, "माझा जुना दोस्त शंभू माझ्याकडे येणार असं मला समजलं आहे."

जाईनं विचारलं, "त्याच्याकडचा निरोप घेऊन कुणी माणूस आलं होतं काय?"

"नाहीं."

जाईनं हसून म्हटलं, "मग तुम्हाला कसं कळलं?"

चंद्रोजी म्हणाला, "तें मला सांगतां येणार नाही. पण संभू लवकरच माझ्याकडे येतो की नाहीं बघशील."

" बघू या ! " असं म्हणून जाई मोठ्यादा हसली.

सात आठ दिवसानतर एक दिवशी दुपारीं खरोखरच संभू आला.

त्यानं चद्रोजीला विचारल, " तूं मला आपल्याकडे बोलावलं होतस काय ? "

चद्रोजी म्हणाला, " होय. सभू, माझ्याहून निराळ्या वाटेन यापुढें जाऊं नकोस. पूर्वीं चार वर्षे आपण ज्याप्रमाणें एकत्र काम केलं त्याप्रमाणेंच आतांहि करू या. मात्र पिस्तुल टाकून देऊन आला आहेस ना ?"

संभून कांहीं न बोलता मान हालविली, आणि चद्रोजीला एकदम मिठी मारली.

तितक्यात जाई आत आली. तिला हाक मारून चंद्रोजी ओरडून म्हणाला, " संभू आला ! पाहिलस ? "

जाई जवळ आली आणि गळयात गळा घालून बसलेल्या त्या दोघाकडे आश्चर्यानं पहात " आतां काय करावं ! " असा उद्गार काढून तिन आपला डावा तळहात तोंडावर ठेवला.

# ११ : मागं वळून पाहूं नकोस !

उषा ! होय, उषाच तू ! शकाच नाहीं. ही खाद्याची ठेवण, किंचित् उंच अशा मानेचा डौल, विंचरून अगदीं मऊ केलेल्या आणि उची रेशमी धाग्याप्रमाणे चकाकणाऱ्या केसाचा मानेवर सहज रुळणारा अबाडा, या खुणा, उषे, तुझ्याशिवाय दुसऱ्या कुणाच्या असू शकणार ? तुला पुढून पाहिल कीं तू अगदीं मोहक दिसतेस कीं तू पाठमोरी अधिक मोहक दिसतेस, या प्रश्नाचा मागें कितीदा तरी मी विस्मय करीत असे. ते गणित मला कधींच सुटल नव्हत. ते सोडविण्यासाठीं तुझा चिरकाल सहवास मला मिळायला हवा होता. परतु तो मिळविण्याऐवजीं तू अन् मी एकमेकापासून दूर झालों...

आता एक वर्षाच्या अवधीनंतर तुझी पाठमोरी आकृति माझ्या दृष्टीस पडत आहे. तू इथें दिसशील अशी माझी कल्पना नव्हती. आमच्या कपनीच्या कामासाठीं या शहरीं येण्याचा मला हुकुम झाला तेव्हा चटकन् माझ्या तोंडून " उषा " असा उद्‌गार बाहेर पडला. इथें माझा मुक्काम तीन चार दिवस होणार आहे परतु तेवढ्यात तुझ्या घरीं येऊन तुझी गाठ घ्यायची आणि नशीबाचा निकाल लावून द्यायचा अस मनाशीं ठरवूनच मी आलो. परतु उद्या किंवा परवा मी तुझी भेट घेणार होतों. आता इथें थिएटरात आलो तो फार दिवसात मराठी नाटक पहायला मिळालेल नाहीं तेव्हा कुठल कां असे ना बघू या अशा विचारान आलों. तू इथें दृष्टीस पडशील अशी किंचित् देखील अपेक्षा नव्हती माझी. अन् आता तू एकदम माझ्या दृष्टीस पडते आहेस !... थाब, थाब. इतक्यात मान माग वळवून पाहूं नकोस. तस केलस तर कदाचित् तुझी माझी दृष्टादृष्ट होईल. आणि ती आतां नाटक चालू असताना व्हायला नको आहे मला. हा अक सपला कीं प्रेक्षक बाहेर पडतील, मी बाहेर जाईन, कदाचित् तूंहि उठून थोडा वेळ बाहेर येशील. त्या वेळीं मी तुझ्यापुढें येऊन उभा राहणार आहे, आणखी म्हणणार आहे, ' उषे ! लाडके '... अर्थातच असं मनातल्या मनात म्हणेन. अथवा तू पुरेशी जवळ असलीस तर फक्त तुलाच ऐकू येईल अशा बेतान म्हणेन. मग तूं काय म्हणशील त्यावर

माझ्या नशीबाचा निकाल अवलंबून राहील. अथवा तूं कांहीं म्हणायला कशाला हवं ? तुझ्या चर्येवर मी भेटल्याबद्दलच्या समाधानाचं हास्य उमटतं कीं नाहीं हें मला पाहता येईल, आणखी त्यावरून मी काय तें समजेन. मागें मी तुझ्या हसण्याच्या तऱ्हेचा सूक्ष्म अभ्यास केला होता. तुला जेव्हा जेव्हा हसूं येत असे तेव्हा तुझ्या सुंदर भुवयाची किंचित् हालचाल होऊन हसणं आधीं तुझ्या डोळ्यात चमकू लागत असे. मग तें हलकेंच खालीं सरकून तुझ्या ओंठावर आलेलं दिसे ! आता तू जरी मला पाठमोरी दिसत आहेस तरी तुला केव्हा केव्हा हसू येत आहे तें मी ओळखू शकतों. रंगभूमीवरच्या नटाना तूं समोरून दिसते आहेस. त्यांच्यापैकीं कुणाला अक्कल असेल तर तुझ्या हास्याचो मला आठवते ती गमतीदार तऱ्हा त्याच्याहि ध्यानांत येत असेल !...

मी थिएटरात आलों तेव्हां नाटक सुरूं झालं होत. तुझ्या मागं दोन रागा सोडून माझी खुर्ची आहे. या जागीं मी अगदीं चोरटेपणानं गपाचिप येऊन बसलों. आपल्या येण्यानं कुणाला त्रास होऊ नये अशी माझी इच्छा होती. मी समोर चाललेल्या नाटकाकडे पाहू लागलों. आणि केव्हां कुणास ठाऊक, माझ्या नजरेला एकदम मऊ तकतकीत केसाचा सैलसा सुंदर अबाडा दिसला, आणि त्यावर खोवलेली फुलाची वेणी दिसली. त्याबरोबर माझ्या छातींत धस्स झालं. छातींत धस्स होतं तें काहीं नेहमीं भीतीनच किंवा दुःखानंच होत अस नाहीं. कधीं कधीं आनंदानं देखील छातींत धस्स होतं. तसं झालं बघ. मग मी निरखून पाहू लागलों. आणि माझी खात्री झाली कीं माझी लाडकी उषा दोन रांगा सोडून पुढच्या खुर्चीवरती बसलेली आहे. मध्येंच एकदा पदर सावरण्यासाठीं तुझा हात माग आला, आणि आपलीं बोटं पदराच्या काठातून फिरवीत तूं तो जरासा घट्ट करून घेतलास. हाताची ती हालचाल मला किती ओळखीची वाटली. पण लगेच मला भीति वाटली कीं तूं सहजगत्या मानदेखील माग वळवतेस कीं काय, आणि तुझी माझी नजरानजर होते कीं काय. कारण तशी ती मला व्हायला नको आहे !...

आज तूं नाटकाला एकटी आली आहेस कीं काय ! तुझी थोरली बहीण तुझ्याबरोबर दिसत नाहीं. तिची छोटी मुलगीहि दिसत नाहीं.

तुझ्या बहिणीचं नाव आता मी विसरलो. काय बर होत तिचं नाव? तुझ्या नावाशीं त्याचा अनुप्रास जुळत होता... हां, हां, बरोबर आहे. आठवल. आशा! आशच्या छोट्या मुलीच नाव मात्र माझ्या चांगल लक्षात आहे. कुसुम! कारण तुझा माझा अगदीं प्रथम परिचय झाला त्याला ती गोड छोकरी कारण झाली होती. अशाच एका नाटकाच्या प्रयोगाच्या वेळीं आणि या थिएथटरातच मी तुझ्याशीं प्रथम बोललो. आपल्या जागा मात्र त्या वेळेस निरनिराळ्या होत्या. तुझी बहीण, तू, आणि कुसुम अशा तिघीजणी ओळीन बसला होता. कुसुमच्या उजव्या अंगाला माझी खुर्ची होती. नाटकाच पुस्तक तुमच्याजवळ नव्हत. तुझ्या कुसुमला तर पुस्तकातले फोटो पहावयाची अनावर इच्छा झाली होती. तू तिला गप्प बसवीत होतीस. "उद्या लायब्ररींतून पुस्तक आणून आपण फोटो पाहू ह" अस सांगून तू तिचा समजूत घालण्याचा प्रयत्न करीत होतीस. तितक्यात माझ्या हातात पुस्तक असल्याच कुसुमच्या लक्षात आलं. मग तुझ्या गळ्याभोवतीं मिठी मारून तुझा डावा गाल कुरवाळीत तुझ्या उजव्या कानात ती सारखीं म्हणू लागली, "त्याच पुस्तक मागून घेऊन दे कीं मला जरा." ते तिच बोलण ऐकताच तू तिच्यावर केवढाले डोळे केलेस ते अजूनसुद्धा मला अगदीं स्पष्ट दिसत आहे. त्या प्रकाराचं मला फार हसू आल. तुला कुरवाळून तुझ्या कानात बोलण्याचा क्रम कुसुमन चालूच ठेवला. मग मात्र तुझा राग केवळ तिच्यावर डोळे वटारण्यापुरताच राहिला नाहीं. आपल्या बहिणीला तू हळूच पण अगदीं चिडलेल्या स्वरात म्हणालीस, "आपल्या मुलीला सभाळ ग बाई. या बाजूला नकोच ती मुळीं." कुसुमला खस्सकन् घेऊन आशेच्या मांडीवर आदळण्याच्या बेतात तूं होतीस. मग मात्र माझी स्तब्धता मीं मोडली. कुसुमन तुझ्या खांद्यावर मान टेकली होती, परंतु तिरप्या नजरेन ती लबाड माझ्याकडे पहात होती. मी तिच्याकडे पाहून हसलों व पुस्तक पुढे करून म्हटल, "हें घ्या." माझे ते शब्द ऐकताच कुसुम तुझ्या गळ्याभोंवतालची मिठी पार सोडून देऊन आपल्या जागेवर बसली, आणि यत्किंचित्‌हि अनमान न करता माझ्या हातातून पुस्तक घेऊन त्यातले फोटो पाहण्यात ती इतकी दंग झाली कीं तुझा, आशेचा, आणि समोर रंगभूमीवर तावातावानं ताना मारणाऱ्या

नटाचाहि तिला संपूर्ण विसर पडला. त्या गोष्टीची मला आणि तुलाहि गमत वाटली. आपल्या दोघाची दृष्टादृष्ट झाली, आणि तू हसलीस. तुझं हास्य प्रथम तुझ्या डोळ्यात चमकूं लागतं, हे मी ह्या वेळेस पहिल्यादा पाहिल. 'थॅक्स' असे शब्द तूं पुटपुटलीस, आणि मीहि कांहींस बोललो. हे तुझ्यामाझ्यात झालेलं पहिलं बोलणं! आणि हेच अखेरच ठरायला काहीं हरकत नव्हती. मी त्या दिवशीं थिएटरातून बाहेर पडल्यावर एकीकडे तुझी मूर्ति कल्पनेनं नजरेपुढें पुन:पुन्हा आणीत होतों, आणि दुसरीकडे माझ्या मनात येत होत तू मला पुन्हा भेटशील असा सभव मुळींच नाहीं. वाट चालता चालता अशा किती तरी सुंदर गोष्टी दिसतात कीं ज्याची आपली गाठभेट क्षणापुरतीच झालेली असते, अन् तेवढ्याच अल्प सुखावर सतुष्ट रहाणं भाग असतं...

हल्लीं ज्या कंपनींत मी काम करतो त्या टाटा कपनींत मी त्या वेळीं नुकताच लागलो होतो. पण त्यांच्या कलकत्त्याच्या ऑफिसात नव्हे, तर मुबईच्या ऑफिसात. या कपनीच्या 'पब्लिक रिलेशन्स' खात्यात मी काम करीत होतों. पुण्याच्या एका गृहस्थानीं टाटा कंपनी कोणत्या तऱ्हेचं लोखड आणि पोलाद विकते व त्या बाबतींत नवीन निघणाऱ्या कारखान्याना कोणत्या सवलती देऊ शकते याबद्दल चौकशी केली होती. त्याची गाठ घेऊन त्याना हवी ती माहिती पुरविण्यासाठीं कंपनीन मला पाठविल म्हणून मी पुण्यास आलों होतों. दुसरे दिवशीं त्याचा पत्ता हुडकीत मी निघालों. घराचा नबर सापडला तेव्हा मी आत शिरलों. घराला आगण कांहीं मोठ नव्हतं, परतु बगीचा चागला केलेला होता. एक म्हातारे गृहस्थ वाफ्यात माती भरीत असलेले मला दिसले. त्यानीं मान वर करून माझ्याकडे पाहिल, तेव्हां अमुक अमुक गृहस्थ इथेंच रहातात ना अस मीं त्याना विचारलं. पण त्यानीं काहीं उत्तर दिलं नाहीं. मीं त्याना पुन्हा दोनदा माझा प्रश्न विचारला. तरीदेखील ते उत्तर देईनात. शेवटीं माझ्याकडे वळलेली मान खालीं करून वाफ्यात घातलेली माती दोन्हीं हातांनीं थोपटायला त्यानीं प्रारंभ केला. त्याच्या वागण्याचं मला फार आश्चर्य वाटलं. पण मग एकदम माझ्या लक्षात आलं, कीं ते बहिरे असले पाहिजेत. मग मी त्याना ओलाडून ओटीकडे पावल टाकीत गेलों.

तितक्यात आतल्या बाजून एक छोटी मुलगी कडेवर बाहुली घेऊन बाहेर आली. तिला पाहताच मी चांगलाच चमकलों. ती कुसुम होती! मला पाहिल्याबरोबर तिनं आपली बाहुली पुढे केली, आणि जरीकाठी खणाची एक पट्टी दाखवून ती मला म्हणाली, " तुम्हाला साडी नेसवता येते ? " मी तिला म्हटल, " माझं काम झाल्यावर मी तुझ्या बाहुलीला साडी नेसवीन " आणि ज्यां गृहस्थाना मला भेटायच होत ते आहेत का म्हणून विचारलं. तिन मला माडीवर जायला सांगितल. मी जिना चढून माडीत पाऊल टाकल आणि श्रीपादराव जोशी आहेत काय अस म्हटल. कोपऱ्यातल्या टेबलाजवळ बसलेले एक गृहस्थ 'होय, होय' अस म्हणत माझ्याकडे आले, व त्याच्याकडे पहात असताना टेबलाशेजारच्या आराम खुर्चीत तू बसलेली मला दिसलीस. श्रीपादरावानीं मला " बसा " अस म्हणून एका खुर्चीकडे बोट दाखविलं. मी टाटा कंपनीकडून आलों आहे अस कळल्यावर पुढे बोलण्याच्या आधीं ते मला तुझी ओळख करून द्यायला लागले. तू हसलीस मी आदल्या रात्री थिएटरमध्यें झालेला प्रकार तू त्याना सांगितलास. मग माझ आणि श्रीपादरावाच बोलण सुरू झाल तरी हातातलं पुस्तक वाचीत तू तशीच खुर्चींत बसून राहिलीस. मात्र तुझं लक्ष आमच्या बोलण्याकडे असल पाहिजे. कारण आमचा विषय संपत आला आणि मी श्रीपादरावाचा निरोप घेऊं लागलों तेव्हा चटकन् पुस्तक दूर ठेवून तूं उठलीस, आणि श्रीपादरावाकडे बघून म्हणालीस, " दादा, मी चहा आणतें बर का." आपला चहा चालला होता तेव्हा कुसुम वर आली व बाहुलीला साडी नेसविण्याच माझ वचन तिन माझ्याकडून पूर्ण करून घेतल...

वास्तविक दुसऱ्या दिवशीं मी परत मुंबई जावयास हवं होतं. पण मी गेलों नाहीं. दोन दिवस जास्त राहिलो आणि रोज श्रीपादारावांकडे चक्कर टाकली, आणि पुढे कपनीच्या कामासाठीं मला पुण्यास यावं लागेल अशा हजार युक्त्या मी करूं लागलों. मी जसा तुझ्या प्रेमांत सापडलो होतों त्याचप्रमाणें तुझंहि प्रेम माझ्यावर जडत होतं हें मला स्पष्ट दिसू लागलं. श्रीपादरावाचा व माझा फार स्नेह जमला, आणि त्याच्या बोलण्याचालण्यात आणि वागण्यात असा हेतु मला उघड दिसे कीं तुझं

माझं प्रेम जुळावं आणि वाढावं.

कधीं कधीं मला तुझ्याबद्दल एक सूक्ष्म शंका येत असे. बोलता बोलता तुझा चेहरा एखदम गभीर होई, आणि तुझ्या नजरेत थोडी खिन्नता आहे असहि मला वाटे. तुझ्या वागण्यात आणि बोलण्यात या प्रकारचा भाव वारवार का यावा हे मला कळत नसे. तुला त्याबद्दल विचारल तर मी कदाचित् तुला दुखवीन अस वाटे. मी मनाशीं आश्चर्य करीत राही. कधीं कधीं माझ्या मनात असाहि विचार येई कीं माझ्यात एखादी अशी उणीव तर नाहीं ना कीं जिच्यामुळें माझ्यावर जडू पाहणार मन आवराव अस तुला वाटत असेल. माझं स्वतःच बोलण चालण, माझा स्वभाव, माझी आर्थिक परिस्थिति, याची मी मनाशीं अगदीं कसून तपासणी करी परतु तुझ्या मनाला जे अगदीं नकोस वाटेल अस कोणतहि वैगुण्य मला माझ्यात आढळत नसे. मग तू अशी वरचेवर गभीर व उदास का होतेस हे न कळून मी अगदीं अस्वस्थ होई ..

एके दिवशीं या कोड्याचा उलगडा श्रीपादरावाकडून झाला. ते आपल्या एका श्रीमत मित्राच्या सहाय्यानं मोठा कारखाना काढणार होते व त्यासाठीं ते वरचेवर मुबईला येत, आणि आले की मला भेटल्यावाचून सहसा रहात नसत. आम्हीं कुठें तरी बाहेर जेवायला जात असू. तुझ्या-वर मीं प्रेम करावं या गोष्टीला त्याची पूर्ण समति आहे हे माहीत असूनहि आमच्या बोलण्यात मी तुझा विषय कधीं काढीत नसे. त्या विषयाची मला एक प्रकारची चमत्कारिक लाज वाटे. परतु एके दिवशीं श्रीपाद-रावानीं तुझ नाव काढल आणि ते म्हणाले, " आमची उषा फार भोळी आहे. अन् तुम्हाला माहीत आहे कीं भोळी माणस या जगात फसतात व स्वतःला दु.खी करून घेतात. " मला त्याच्या बोलण्याचा रोख कळेना, हे माझ्या चर्येवर त्याना स्पष्ट दिसलं असलं पाहिजे. कारण ते आपणहून मला म्हणाले, " तुम्हाला एक हकीगत बरेच दिवस सागायची आहे. ती उषेकडून समजण्यापेक्षा तुम्ही माझ्या तोंडूनच ऐकलेली बरी. "...मी ऐकत राहिलों आणि त्याच बोलणं संपल्यावर माझ्या मनातल बरेच दिव-साच एक कोड सुटल्यासारख मला वाटल. तुझ्या मुद्रेवर गाभीर्याच्या आणि उदासपणाच्या छाया मध्येंच एकदम का येतात तें मला कळल.

माझी आणि तुझी भेट होण्यापूर्वी तुझं एका तरुणावर प्रेम बसलं होतं. परंतु त्याच्या अंगीं कसलाहि गुण नव्हता. त्यानं तुझ्यावर कसली मोहिनी घातली होती तेंच कळण्यासारखं नव्हतं. त्या प्रेमापासून तुला परावृत्त करण्याचा श्रीपादराव प्रयत्न करूं लागले. परंतु जणू काही घरच्या माणसाचा विरोध सोसूनहि आपलं प्रेम कायम ठेवायचं या कल्पनेचं तुला एक नवीनच आकर्षण वाटू लागलं, आणि केवळ श्रीपादराव नको म्हणतात म्हणूनच तो जो कोण रघुनाथ नावाचा तरुण होता त्याच्याशीं लग्न करण्याच्या हट्टाला तू पेटलीस. अखेर श्रीपादरावांनीं त्या रघुनाथला दोन चार हजार रुपये देऊं केले, आणि त्यानं परमुलुखात कुठें तरी निघून जावं अशी व्यवस्था केली प्रथम तू पुष्कळ रागावलीस, दु:ख करीत बसलीस. परंतु हलके हलके तू उमजली असावीस कीं जें झालं ते कदाचित् आपल्या बऱ्यासाठीच असेल.

यानंतर सुमारे तीन महिने झाले असताना मी तुला भेटलो. तुझी माझी ओळख जसजशी वाढली तसतशी तुझी प्रीति माझ्यावर अधिकाधिक बसत गेली होती याबद्दल मला अगदीं सुद्धा शंका नव्हती. परंतु श्रीपादरावांनीं सांगितलेली हकीकत ऐकल्यावर मला वाटू लागलं, त्याचा काय नेम, रघुनाथला तू अजून पुरती विसरली नसशील कदाचित्. एखाद्या स्त्रीला एखाद्या तरुणानं प्रेमनिराश केलं कीं " तूं मला सोडलंस तरी माझं प्रेम मिळविण्यासाठीं उत्सुक असलेले वाटेल तितके पुरुष आहेत " असं त्या तरुणाला दाखवून देण्याच्या—काहींशा सूडाच्या—बुद्धीनं, आणि जो समाज एका प्रेमप्रकारात आपली विटंबना झाली ती पाहून हसला असेल त्या समाजाला आपल्याबद्दल पुन्हा आदर वाटावयास लावण्याच्या बुद्धीनं ती कुणावर तरी पुन्हा प्रेम करूं लागते. असल्या गोष्टी मी पुस्तकांत वाचल्या होत्या. त्याची मला आठवण होऊं लागली. तुझ्या चर्येवर मधूनच केव्हा तरी गंभीर खिन्नता कां पसरते या प्रश्नाचं उत्तर आतां मला सांपडलं होतं. परंतु दुसराच एक प्रश्न आता माझ्या मनाला छळूं लागला होता. तूं माझ्यावर जें प्रेम दाखवितेस तें अगदी मनापासूनचं आहे ? त्यात लपवाछपवी कुठेंहि नाहीं ?...

मात्र तुझ्या पहिल्या प्रेमाची हकीगत मला कळल्याचं तुला बिलकूल

दाखवायचं नाहीं अस मीं ठरविलं. काहीं सागावसं वाटलं तर तूंच मला केव्हा तरी सागशील. मी कशाला अस गृहीत धरावं कीं तुझ्या अंतःकरणात अजूनही जी माझी नाहीं अशी एक लहानशी जागा आहे. कदाचित् मी भेटल्यामुळें आणि माझ प्रेम तुला हवस वाटल्यामुळें तुझ्या हृदयातली रघुनाथची आठवण अधिकाअधिक बुजत असेल, आणखी एक दिवस ती पुरती बुजेलहि. मग मी आपण होऊन कशाला तो विषय काढू ? आणि तुला गोंधळात पाडू ? रघुनाथला तू पुरत विसरावंस अशा तऱ्हेच अनिवार प्रेम मी करीन, आणि तूझ्या चेहऱ्यावर खिन्नता कधींसुद्धा येईनाशी झाली व तू माझी पूर्णाशान झालीस अस मला दिसल म्हणजे मग तुझा हात माझ्या हातात देतेस काय अस मी तुला विचारीन...

ही माझी आशा खरी ठरत आहे अस मला दिसूं लागल तेव्हा मला अतिशय आनद झाला. मी वारवार पुण्यास येत असेच. पण तूहि मधून मधून मुबईस येऊ लागलीस. तुझ्यापासून दूर रहाण मला जितक कठीण वाटत असे तितकंच तुलाहि ते कठीण वाटू लागल होतं. साडे अकरा वाजता मुंबईस येऊन पोहचणाऱ्या गाडीनं तू यायचीस आणि संध्याकाळीं साडे पाचच्या गाडीनं परत जायचीस. मीं तुला गाडीवर नेऊन पोचवीत असे. गाडी हालली आणि तू माझ्या दृष्टीपुढून दूर सरकू लागलीस कीं माझ्या अतःकरणाची कालवाकालव होत असे. स्त्री–सहवासात इतका उत्कट आनंद असतो हे मला प्रथमच कळत होत. पुण्यास अगर मुबईस तुझी माझी भेट होत असे तेवढेच दिवस मला लक्षात ठेवण्यासारखे वाटत. मधले दिवस मी कसे तरी ढकलीत असे. आपल्या भेटीचा पुढचा दिवस ठरलेला असे तो किती दूर राहिला तें मोजतां मोजता ते सरत असत.

एका शुक्रवारीं ऑफिसात पोंचून मला अर्धा पाऊण तास झाला असेल नसेल तोंच शिपायान येऊन मला सागितलं, तुमचा टेलिफोन आहे. मी उठून टेलिफोनकडे गेलो आणखी रिसीव्हर उचलून घेऊन म्हटलं ‘ हलो ’. उलट बाजूनं तुझा आवाज ऐकतांच मी एकदम चमकलों. अतिशय आनंदानं आणि तितक्याच आश्चर्यानं मीं विचारलं,

“ हें काय ? आज कशी आलीस ? मला आधीं का नाहीं कळवलंस ?”

तूं म्हणालीस, “ आज सकाळीं एकदमच मीं ठरविल यायचं. मी

आलें म्हणून तुम्हाला आनद नाहीं का झाला?"

"इथला शिपाई माझ्या तोंडाकडे टक लावून पहातोय त्याला विचार."

"शिपायाला नाहीं विचारीत, मालकच सागू देत." तूं खुदकन् हसलीस ते मला स्पष्ट ऐकू आलं.

मीं म्हटलं, "फार आनद झाला आहे मला."

तूं विचारलंस, "मग आता काय करणार तुम्ही? ऑफिसला बुटी मारून यायला पाहिजे तुम्ही. मी तुमच्या खोलीवर वाट पहातें आहे. रजा घेता येईल कीं नाहीं?"

मीं म्हटलं, "परमेश्वरानं माणसाला डोकं, पोट असे इतके अवयव दिलेले आहेत आणि त्यापैकीं कोणता तरी एखादा दुखणं इतकं सभवनीय करून ठेवल आहे की रजा म्हणजे आमच्या हातचा मळ आहे."

ते माझ बोलण ऐकून तूं केवढ्यादा तरी हंसलीस. "टाटा कंपनीचं काम फार इमानें इतबारे करता म्हणायचे!"

"यात शका आहे काय तुला? आजच मी ऑफिसात आल्याबरोबर वरिष्ठ अधिकाऱ्यान बोलावून मला प्रमोशन मिळणार असल्याची बातमी सागितली."

"होय? मग खोलीवर येताना वाटेंत मिठाईचं दुकान लागल तर मिठाई घेऊन या."

मीं म्हटल, "तुला आवडणारी मिठाई दुकानात नाहीं मिळत. ती माझ्याजवळ नेहमीं—"

"झाला का तुमचा चहाटळपणा सुरू?" तूं झणकाऱ्यान म्हणालीस आणि मग विचारलंस, "किती वेळात खोलीवर येता तें बोला."

मीं म्हटलं, "टाटा कंपनीची विमानं आहेत, पण ती कचेरींतून खोलीवर खेपा करीत नाहींत. पण दहा पंधरा मिनिटात येतोंच."

मी खोलीवर आलों तों बाहेर गॅलरींत माझा नोकर उभा होता, त्यान वर्दी दिली, "बाई आल्या आहेत." तूं आल्याचं पाहून मला झाला नसेल इतका त्याला आनंद झालेला दिसला. त्याची तुझ्यावर फार भक्ति होती. तुला मात्र तो आवडत नसे. कारण तो तिरळा असल्यामुळें आणि पोषाखहि गबाळा करीत असल्यामुळें दिसायला फार बावळट दिसे.

शिवाय तो विसरभोळा आणि वेंधळा होता. माझी दहा कामं त्यान नीट केलीं तर एक दोन तरी तो बिनसवून टाकीत असे. परतु तो अत्यंत इमानदार होता आणि कष्टाळु होता म्हणून मला तो आवडत असे. तो जातीन गुजराती होता व त्याच आडनाव पटेल होत. तू थट्टेनं त्याला म्हणायचीस, " काय सरदार " आणि तुझी ती कोटी ऐकली कीं तो हसायचा.

मी गॅलरींतून आत आल्याबरोबर तूं कोचावर बसलेली मला दिसलीस एकदम पुढे होऊन तुझे हात धरून मीं विचारल, " आज ही अकस्मात् भेट कशासाठीं ? "

तूं मिस्किल चेहरा करून म्हणालीस, " तुमच्या भेटीसाठीं आले अस तुम्हाला कोणी सागितल ? "

" माझ्या भेटीसाठीं नाहीं आलीस ? ठीक आहे, मी परत जातो ऑफिसात तर. जाऊं ? जाईन बर का. भेटीसाठीं आल्ये अस चटकन् म्हण पाहू. "

" बर बाई भेटीसाटीं आले. " हे तुझे शब्द ऐकल्याबरोवर मी पुन्हा तुझे हात धरून तुझ्यापुढे गुडघे टेकून बसलो. मग तू म्हणालीस, " पण एका कामाच निमित्त काढून आले आहे आणि ते करूनच मला परत जायला पाहिजे. माझ्या एका मैत्रिणीच आदितवारीं लग्न आहे. तिला आहेर म्हणून सुंदर साडी द्यायचं ठरविलय मीं. पुण्यापेक्षा मुंबईत चागली साडी मिळते असं मी आईजवळ म्हणाले, व मग ती म्हणाली मग जाऊन घेऊन ये— "

मीं म्हटल, " होय ? कुणाकुणाला फारच चागल्या आया मिळतात. "

" तुम्हाला का एवढा हेवा वाटतो ? "

" मला आई नाहीं म्हणून— "

तूं म्हणालीस, " बरं ते जाऊ दे. माझ्याबरोवर तुम्ही बाजारात आल पाहिजे आणखी साडी विकत घ्यायच्या कामात मला मदत केली पाहिजे. "

" पण आधीं जेवशील तर खरी. तुला भूक नाहीं का लागली ? "

" फार लागली आहे. "

" मिठाई हवी का तुला ? "

तू माझ्या हाताला चिमटा घेतलास व डोळे मोठाले केलेस. मी मोठ्यादा हंसलों आणि पटेल बाहेर व्हराड्यात होता त्याला हाक मारली. " पटेल, अहो सरदार पटेल ! इकडे या. " त्याच्याजवळ मीं एक चिंठी

लिहून दिली, आणि पुरोहित हॉटेलमधून दोन जेवणं घेऊन यायला त्याला सांगितलं. तो धावत निघाला. माझी चिठी घेऊन जाण्याचं त्याच्या लक्षात राहिलं नाहीं. तूं हसून म्हणालास "अहो सरदार, ती चिठी इथेंच राहिली कीं" तो परत आला, आणि चिठी उचलून आपल्या खादीच्या पैरणीच्या लांब खिशात घालून पळाला.

जेवण करता करता माझ्या प्रमोशनची हकीगत मीं तुला सांगितली. ऑफिसकडून मला विचारण्यात आलं होतं, कीं कलकत्त्याच्या शाखेत काम करावयास मी तयार आहे का. तिकडे गेलो तर माझ्या पगारात एकदम दीडशे रुपये वाढ होईल मला मुंबईतच रहावयाचं असेल तर फक्त पन्नास रुपयाची वाढ मला मिळेल. तूं मला विचारलस, "मग तुम्ही काय उत्तर दिलत?" मीं म्हटलं "उत्तर द्यायसाठीं अवधि मागून घेतलाय मी. कारण तुला विचारल्याशिवाय मी काहीं ठरवू शकत नाहीं."

तूं म्हणालीस, 'मला विचारल्याशिवाय? मला काय कळतं तुमच्या नोकरीच्या बाबतींत?"

मीं म्हटलं, "उगीच का सोंग करतेस? मीं तुला का विचारतो तें तुला कळत नाहीं?"

तूं एकदम आपल्या डाव्या हातानं डोळे झाकून घेतलेस. जणूं तुला एकदम झालेला आनंद तुला सहन होत नव्हता. तुझ्या ओठावर तो मला पूर्णपणें दिसत होता. तुझ्याकडे मी पहात राहिलो. मग तू हाताचीं बोटं जरा उचललींस व त्याखालून माझ्याकडे तिरपी नजर टाकून हसत म्हणालीस, "अं हं. कलकत्त्याला जायचं नाहीं आपल्याला."

आपलीं जेवणं आटोपल्यावर आपण बाहेरच्या खोलींत जाऊन बसलों. तू म्हणालीस "आता फार वेळ इथं गप्पा मारीत बसायचं नाहीं हं." मीं म्हटलं, "हो हो, परंतु तुझ्याबरोबर आलो तर मी शोभेन असा पोषाख तर मला करूं देशील कीं नाहीं?" मी पटेलला हाक मारली आणि विचारलं, "अरे धोब्याकडून माझा गरम सूट आज आणला असशील ना?" तो काहींच उत्तर न देता शुंभासारखा उभा राहिला. मी त्याच्या अंगावर ओरडलों तेव्हा तो तत पप करीत सांगू लागला कीं धोब्याची पावती त्यानं कुठें ठेवली होती ती त्याला सांपडत नव्हती. तो

पुन्हां पुन्हा म्हणूं लागला, " जाते कुठें ! सांपडेल उद्या. "

"अरे उद्यां सापडून काय उपयोग? मला आतां कपडे हवेत घालायला" मीं म्हटल

तो भोळसट धिटाईनं सरळ म्हणाला, " आज पावती सापडण शक्य नाहीं. उद्या मात्र खचित शोधून काढीन. "

त्याच ते उत्तर ऐकताच मी मोठमोठ्यादा हंसू लागलो तूं रागावून मला म्हणालीस, " तुम्ही याचा वेधळेपणा असा हसण्यावारी नेता म्हणून तो आपले गुण सोडीत नाहीं. एखादे वेळेस हा तुमचा सरदार पटेल काहीं तरी मोठा घोटाळा करील बघा. " त्यान तुला दोन्ही हात जोडून हसत म्हटल, " छे, छे बाई अस म्हणू नका. " मीं त्याला म्हटलं. " बरं चल, चालता हो आता. आज शुक्रवार आहे ना. सध्याकाळच्या रजेचा दिवस आहे तुझा. माझ्या लक्षांत आहे. जा तूं " त्यान विचारल, आपल काहीं काम नाहीं ना उरलेल ? मला हसू आलं मीं म्हटल, " जें करायला हवं होत तें काम केल नाहींस, आणखी आता काय विचारतोस ! आपली स्वारी जाऊ द्या म्हणजे पुष्कळ काम झाल. " त्यानं आपली फाटकी छत्री घेतली व तो गेला. तू आणि मी दोघेहि हंसत सुटलों. मी कपडे करता करतां तुझ्याशीं बोलत होतो. तूं पानाचा डबा छोट्या ठेबलावर पुढें घेऊन पट्ट्या तयार करीत होतीस. नेक टाय बांधतां बाधता आरशात दिसणाऱ्या तुझ्या प्रतिबिंबाकडे मी पहात होतो. तूं म्हणालीस " पान हवं कीं नाहीं ! " मी तुझ्याजवळ आलों. तू पुढें केलेली पट्टी मीं घेतली पण ती मी झटकन् तुझ्या तोंडात घातली, आणि माझ्या तोंडात तूं पट्टी दिली पाहिजेस असं मीं नजरेनं सुचविलं. तूं तसं केलंस परतु त्या वेळीं तुझा हात थरथर कांपत होता. माझ्याकडे तू अगदीं टक लावून पहात होतीस. तूं हलकेच म्हणालीस,

" मला तुमच्या नजरेचं भय वाटतं. "

मीं म्हटलं, " कां बरं ! माझी नजर नेहमींसारखीच प्रीतीनं भरलेली नाहीं दिसत तुला ! "?

तूं आपला ओंठ चावलास. माझ्याकडे तूं अजूनहि निरखून पहात होतीस. तूं मान हालविलीस, आणि इतकंच म्हणालीस, " का तें मला

सांगता येत नाहीं. परंतु तुमची नजर प्रीतीनं भरलेली खरी पण नेहमीं-पेक्षा काहीं निराळी वाटते मला."

मीं हसल्यासारखं केलं आणि तुझ्यापासून दूर होऊन पुन्हा आरशाकडे गेलो. माझी नजर मी न्याहळू लागलो, आणि स्वतःला विचारू लागलों, माझ्या मनातला गुप्त बेत माझ्या नजरेंत हिला दिसावा इतका स्पष्ट उठला आहे काय?...

कारण आपण जेवायला बसलों होतों तेव्हांपासून एक कल्पना माझ्या मनात दृढ होत गेली होती. "अहं आपल्याला नाहीं जायचं कलकत्त्याला" हे तुझे शब्द ऐकल्यापासून त्या कल्पनेचं आकर्षण मला फारच वाटू लागलं होत. मीं मनाशीं एक बेत केला होता. कसंहि करून तुझी गाडी चुकावी अशी युक्ति मी करणार होतो. तसं झालं म्हणजे माझ्याकडे रात्रीं राहणं तुला भागच पडणार होतं. आज पटेल माझ्या खोलीवर असणार नव्हता. तूं आणि मी दोघेच. रात्रीच्या त्या पहिल्याच सहवासाची कल्पना माझ्या अंगावर पुनःपुन्हा शहारे आणीत होती. परंतु त्या कल्पनेनं माझी नजर पालटली असेल अशी मला किंचित्‌हि शंका नव्हती, कारण माझ्या मनातल्या गुप्त बेताचा सहवासाच्या प्रत्यक्ष घटकेपर्यंत तुला किंचित् देखील सुगावा लागता कामा नये अशी दक्षता घ्यायला पाहिजे हें मला कळत होतं. आणि तरी तू माझी नजर ओळखली होतीस. "तुमचं भय वाटतं मला" असं तूं म्हणाली होतीस. स्त्रियांच्या अंगीं पुरुषांच्या मनातले खोल भाव ओळखण्याची इतकी शक्ति असते? मी स्वतःला प्रश्न करीत राहिलो... मात्र तू जरी माझ्या नजरेला भ्याली असलीस तरी मी मनाशीं योजलेला बेत सोडून द्यायला तयार नव्हतों...

माझा पोशाख झाला तेव्हां मी तुझ्याजवळ येऊन बसलों. परंतु माझ्याजवळ थोडाच वेळ बसून तूं उठलीस आणि आरशाकडे जाऊन आपले केंस विंचरू लागलीस. मध्येंच तूं म्हणालीस, "जरा जाऊन येतें हं" आणि आतल्या न्हाणी घरांत गेलीस. तूं काहीं वेळ तरी तिकडेच राहशील या खात्रीनं मी तुझी हँडबॅग चटकन् उघडली. तुझं घड्याळ नेहमी त्या हँड बॅगेंत असे तें मीं काढलं, आणि त्यांत अडीच वाजायला आले होते तें दीड केले. तुझी गाडी चुकविणं मला आतां सोपं होणार

होतं. मीं घड्याळ परत ठेवलं. आणि न्हाणी घरातून परत आल्याबर तुला पावडर लागेल, लिपस्टिक लागेल म्हणून त्या वस्तू तुझ्या हॅंड बॅगेतून मी काढू लागलों. तें करता करता तुझ्या हॅंड बॅगमधला एक छोटासा आरसा टेबलावर पडला आणि फुटला. शकुनावर माझा मुळींच विश्वास नाहीं, त्यामुळें मला आरसा फुटल्याच काहींच वाटलं नाहीं. परतु तो फुटल्याच तुला कळलं तर तुझा आनंद थोडा तरी मावळणार या भीतीन तो कुठे तरो लपवून ठेवण्यासाठीं मीं उचलला. आणि माझ्या हाताचा दाब लागून कुठला चाप सुटला कोण जाणे पण आरशाच्या मागें एक चोर कप्पा होता तो झटकन् उघडून त्यातून एक लहानसा फोटो बाहेर पडला--

रघुनाथचा फोटो होता तो !

तो दृष्टीस पडल्याबरोबर मला भयकर धक्का बसला माझ्या हृदयातलं आनदाचं भरत एकदम ओसरून गेल ! रात्रीं तुझा सहवास घडावा ही मनात बळावलेली इच्छा देखील पार नष्ट झाली ! एकच कल्पना उसळून डोक्यात घाव घालू लागले ! रघुनाथला तू अजून पुरती विसरली नव्हतीस तर ! त्याचा फोटो तूं अजूनहि सतत जवळ ठेवला होतास ? .

तू न्हाणीघरातून केव्हां आलीस तें मला कळलहि नाहीं तू ओला टॉवेल माझ्या तोंडावर हलकेच मारलास तेव्हा मी जागा झालो, आणि तूं माझ्यासमोर उभी आहेस अस मला कळल तू हसत हसत मला काहींस विचारीत होतीस. मी तुझ्याकडे अतिशय रागान पहात तो फोटो दाखवीत विचारल, " हें काय ? हें काय ? "

तू त्या फोटोकडे पाहिलस, आणि दुसऱ्याच क्षणीं तू आपल तोंड दोन्ही हातानीं घट्ट झांकून घेतलंस. विव्हळण्यासारखा स्वर तुझ्या तोंडून बाहेर पडला, व तूं अग टाकून कोचावर पडलीस.

मग मी काय काय भयंकर बोलू लागलों. तुझ्याविषयीं किंचित्‌हि करुणा मला वाटेनाशी झाली होती. तूं एक अक्षरहि बोलत नव्हतीस, नुसती ढसढसा रडत होतीस. परतु तुझी मला बिलकुल कीव येत नव्हती. उलट तू काहीं उत्तर करू नयेस, नुसते हुंदके द्यावेस याचा अर्थ मला असाच वाटत होता, कीं रघुनाथवर तुझं अजूनहि प्रेम आहे त्यामुळे रडण्याखेरीज तुला दुसरं काहीं करण शक्य नव्हतं. या कल्पनेन माझा सताप वाढत

गेला. मी नाहीं नाहीं ते बोलत राहिलो. आणि अखेर " तुझ्या गाडीची वेळ झाली कीं तूं जा " असं तुला सागून मी खोलीबाहेर पडलो...

दुसऱ्या दिवशीं ऑफिसात गेल्याबरोबर कलकत्त्याच्या कचेरींत काम करावयास माझी तयारी असल्याच मीं माझ्या वरिष्ठ अधिकाऱ्याना सागितल. बदलीच्या जागीं रुजूं होण्यासाठीं जरूर ती रजा आणि आगाऊ तसलमातहि मला नियमाप्रमाणे मिळाली. कसकत्त्यास जावयासाठीं मला लगोलग मुबई सोडण्याची गरज नव्हती. मी दोन चार दिवस मुबईतच काढले, परतु कोणत्या अवस्थेंत काढले त्याच वर्णन माझ मलासुद्धा करता येणार नाहीं. मी जेवलो कीं नाहीं, स्नान केल कीं नाहीं, झोप कुठे घेतली, जागा केव्हा झालों—या गोष्टी माझ्या मलाच कळत नव्हत्या. दिवसभर तर मी आपल्या खोलींत नसेच. मी पटेलला सागून ठेवल होत, आपल्याला शुक्रवारीं कलकत्त्यास जावयास निघायच आहे, माझ सार सामान भरून सूटकेस तयार ठेव. त्याप्रमाणे त्यान सारी आवराआवर करून ठेवली. सूटकेसमध्ये त्यान कोणत कपड, कोणती पुस्तकें अगर कोणत कागद घातले याची देखील चौकशी मीं केली नाहीं. शुक्रवारीं मी पटेलला घेऊन कलकत्त्याला निघालो.

कलकत्त्यास पोचल्यावर ऑफिसात मला निराळ्या तऱ्हेच काम सागण्यात आल काम नवीन आणि जबाबदारीच असल्यामुळे त्यात माझा बहुतेक दिवस जाई. परतु रात्र झाली कीं मनाला व्यग्रता उरत नसे, आणि मग तुझ्या बाबतींत जी भयकर निराशा माझ्या वाट्याला आली तिचा विचार हा एकच माझा रात्रभरचा सोबती असे. पुष्कळदा मनात येई, कीं तुला पत्र लिहाव. पण पुन्हा वाटे, मी काय लिहू तुला? पुन्हा तुझी निर्भर्त्सना करू, कीं माझ्या निराशेचं वर्णन करू, कीं काय करू? रघुनाथचा विचार तुझ्या मनात अजूनहि ताजा असला तरी मला तू हवीस अस मी म्हणू शकत नव्हतों. कारण तसं मला वाटत नव्हत. मग कशासाठीं अन् कसल पत्र लिहायच तुला? कित्येकदा थोडीशी आशा जागी होई, कीं तू मला पत्र लिहिशील. मी कलकत्त्यास आल्याचं तुला माहीत असण शक्य नव्हतं, परतु माझ्या मुबईच्या पत्त्यावर आलेलीं पत्रं इकडे कलकत्त्यास रवाना व्हावीं अशी व्यवस्था मीं पोस्टात केली होती. म्हणून वाटे तूं जर मला पत्र

लिहिलंस तर मला पोचायला काहीं हरकत नाहीं. परतु लगेच मनात येई, कीं तूं तरी काय लिहिणार मला जें तू माझ्यापासून लपवून ठेवल होतस, आणि जे तुझ्या आरशामागच्या चोर कप्प्यातल्या फोटोवरून मला अकस्मात् कळल होतं, तें इतक स्पष्ट होत कीं ते तसं नाहीं असं तूं म्हणू शकत नव्हतीस रघुनाथविषयींच्या तुझ्या गुप्त प्रेमाचा तो पुरावा इतका बिनतोड होता कीं तो खोटा आहे अस सागणच शक्य नव्हत. म्हणून तर त्या दिवशीं मला भयकर राग आला होता, नुसतं रडण्याची पाळी तुझ्यावर आली होती, आणि तुझ्या त्या रडण्यान मी आणखी सतापून वाटेल ते बोललों होतों. इतक झाल्यावर तू तरी मला लिहिणार कशासाठीं, आणि काय ?...तेव्हा तुझ एखादं पत्र येईल ही आशा उगीचच होती. आठवड्या-मागून आठवडे व महिन्यामागून महिने लोटत गेले तसा तुला पत्र लिहिण्याचा विचार ज्याप्रमाणें मीं सोडला त्याचप्रमाणें मला तुझ पत्र येईल ही कल्पनाहि मी विसरलों...अशा प्रकारे हलके हलके जवळ जवळ एक वर्ष सपत आल.

आणि मग एके दिवशीं अकस्मात् तुझी मूर्ति मला दिसली ! प्रत्यक्ष तू दिसली नाहींस. तुझी प्रतिमा दिसली. तुझा फोटो दृष्टीस पडला.

ऑफिसातून घरी येऊन पत्र पाहूं लागलो तो मुंबईच्या चंद्रमा स्टुडिओच एक पत्र होत. त्यानीं लिहिल होत, " आमच्याकडे काढविलेल्या एका फोटोच्या बिलाचे रु. ३६।– आपण पाठवूं शकाल तर मेहेरबानी होईल आपल्या आर्डरप्रमाणे फोटोच्या प्रती आपल्या बिऱ्हाडीं पूर्वींच रवाना केलेल्या आहेत. वास्तविक एवढ्या बिलाची मागणी करून आपणास तसदी देण्याचं कारण नव्हत परंतु वर्षाचे हिशेब आम्ही पुरे करीत आहों म्हणून आपणास हे पत्र जात आहे."

तें पत्र वाचताच मला आठवलं कीं तुझं माझ भाडण होण्याआधीं आठच दिवस आपण चद्रमा स्टूडिओमध्यें जाऊन फोटो काढविले होते. मात्र ते फोटो मीं पाहिल्याचं मला मुळींच आठवत नव्हतं. आणि या पत्रांत तर स्वच्छ लिहिलं होत, कीं फोटो आपल्याकडे पोचविले आहेत.

मी पटेलला हाक मारून विचारलं, " आपण कलकत्त्यास यायला निघ-ण्यापूर्वीं कुणी कसले फोटो आणून दिले होते काय ? "

त्यानं आपली तिरळी नजर कांही वेळ विचारमग्न केली. नंतर एकदम

म्हटलं, " हो हो, दिले होते. "

" मग त्याबद्दल तूं माझ्याजवळ काहीं बोलला नाहींस. "

तो म्हणाला, " आपण त्या चार दिवसात फार चमत्कारिक तऱ्हेनं वागत होता आणि ती तऱ्हा पाहून मी इतका भांबावून गेलों होतों—"

"आलं लक्षात." मीं म्हटलं, " आता ते सापडण्यासारखे आहेत काय ?"

तो म्हणाला, " हो हो, आहेत तर. ते फोटो, त्या चार दिवसात तुमचं आलेलं टपाल, वगैरे सारे कागद मी एका मोठ्या पाकिटात घालून बंदोबस्तात ठेवले होते. त्याची मला आठवण झाली नाहीं तरी तुम्हाला तें पाकिट दिसावं अशा बंदोबस्तात मी ते ठेवलं होतं. त्या दिवशीं बाई आल्या होत्या. तुम्हाला तुमचा सूट हवा होता. तो आणून ठेवायचं मी विसरलों होतों, आठवतं का आपल्याला ?—"

साऱ्या मुलुखाचा विसरभोळा पटेल मला विचारीत होता, " आठवतं का ? " त्याच्या त्या प्रश्नाचं मला भयंकर हसूं आलं. मला तें सारं आठवत होतं इतकंच नव्हे तर गेल्या वर्षभरात तो गरम सूट नकोसा वाटून सूट केसच्या तळाशीं तसाच राखून मीं ठेवला होता हेंहि मला आठवत होतं. मी फक्त मान हालविली व काहीं वेळ स्वस्थ बसलो.

पटेलनं विचारलं, " त्या फोटोंच व पत्रांचं पाकिट बॅगमधून काढून देऊं का आपल्याला ? "

मी मान हालविली.

पटेलनं पाकिट आणून फोटो आणि पत्रं काढून माझ्या टेबलावर ठेवलीं. त्याला चहा करण्याचं काम सांगून मीं आत घालविलं, आणि फोटो पाहिले. तुझी ती प्रतिमा पाहिल्याबरोबर वर्षभराचं अंतर जणूं एकदम नाहींसं झालं आणि मी तुझ्याकडे पहात राहिलों. काळाचं अंतर ज्याप्रमाणें चटकन पुसलं गेलं होतं त्याप्रमाणेंच संताप, त्वेष, अपमान, अंतःकरणाचा कडूपणा इत्यादींनीं तुझ्या माझ्यांत आणलेलं दूरत्वहि माझ्या लक्षात राहिलं नाहीं. मला नवल वाटलं ते हें, कीं त्या प्रतिमेंत तूं पाहिल्यासारखीच गोड दिसत होतीस आणि त्या गोडपणाची माझ्यावर मोहिनी पडत होती. तुझे ते निरनिराळ्या तऱ्हेचे सहा फोटो मी किती तरी वेळ पहात राहिलों. अखेर ते मीं हातावेगळे करून दूर ठेविले तेव्हां एवढा मोठा

निःश्वास माझ्या तोंडून बाहेर पडला कीं मला वाटलं, खोलींत दुसरं कोणीं तरी बसलंय व त्यानच हा निःश्वास सोडला.

मग माझं लक्ष त्या पत्राकडे गेल व त्यातलीं दोन चार उचलून नुसतीं वरून पाहून मीं ठेवून दिलीं तों एका पाकिटावर तुझं अक्षर मला दिसल! माझ्या छातींत एकदम धस्स झाल. म्हणजे आपलं भांडण झाल्यावर पुण्यास परत गेल्यानंतर तू मला पत्र लिहिल होतंस तर ? आणि तुझं तें पत्र आज जवळ जवळ वर्षाच्या अवधीनंतर माझ्यापुढें येत होत! तू म्हणाली होतीस, " हा विसरभोळा सरदार पटेल एखादे दिवशीं फार मोठा घोटाळा करील बघा " त्याची मला एकदम आठवण झाली. परंतु ती आठवण काढण्यात आता काय अर्थ होता ?

तुझ्या त्या पत्रात काय मजकूर होता ते जाणण्याची मला अनिवार उत्कंठा होती.

मीं पाकिट उघडल, आणि तुझं पत्र वाचू लागलो. प्रथम ते मला वाचताच येईना. प्रेमान ओथंबलेला मायना पत्राच्या आरंभीं तू लिहिला होतास. तो दृष्टीस पडल्याबरोबर माझे डोळे पाण्यान असे काहीं भरून आले होते, कीं तुझं लिहिण दिसेनाच. मात्र तें दिसल नाहीं तरी पत्राच्या आरंभींच्या गोड मायन्यावरून माझ्या एवढ लक्षात आल होत कीं तें पत्र काहीं रागाच नव्हत. मीं तुझ्याशीं ज्या रीतीन वागलो तिचा धिक्कार करून आता यापुढें तुमचा संबंध नको असं मला सांगण्यासाठीं तू तें लिहिल नव्हतस.

मीं डोळे पुसले. ते पुन्हा ओले होऊं द्यायचे नाहींत असा मनाशीं निश्चय केला. तुझं पत्र वाचल. तूं लिहिलं होतंस,

"...मी जे सांगतें त्यावर तुमचाच काय कुणाचाच विश्वास बसणार नाहीं. परंतु जीव तोडून खरं ते सांगतें आहे यावर विश्वास ठेवा. खोटं बोलण्याचा दुर्गुण माझ्या अंगी कधीं दिसला काय याचा आधीं विचार करा, आणखी मग मी काय लिहितें तें वाचा.. तुमचं माझं प्रेम प्रथम जुळू लागल तेव्हा मला रघुनाथची मधून मधून आठवण होत असे. पण तीदेखील त्याची पुन्हा भेट व्हावी म्हणून, किंवा तो मला अजूनहि हवासा वाटत होता म्हणून नव्हे, तर

तुमच्या तोंडून असा एखादा शब्द किंवा असं एखादं वाक्य बाहेर पडे कीं ते रघुनाथच्या तोंडून मीं पूर्वी ऐकलेलं असे, आणि मग माझ्या मनात एकदम येई, ज्यामागे मी आता धावते आहे तेंहि पाहिल्यासारखं मृगजळ ठरणार आहे काय?... पण तुमचा सहवास अधिक अधिक घडला तेव्हा असल्या संशयाच्या निमित्तानं होणारी रघुनाथची आठवण देखील होईनाशी झाली, व अखेर मी तर त्याला अजिबात विसरलें. त्याच्या आठवणीचा मागमूसदेखील जवळ राहू नये म्हणून त्याचीं पत्रं, फोटो, त्यानं भेटीदाखल दिलेल्या वस्तू, सगळं मीं नाहींसं केलं. तुमची होण्यासाठीं मीं शुद्ध झालें! किंवा झालें असं मला वाटलं असं म्हटलं पाहिजे. कारण त्या जुन्या छोट्या आरशाच्या मागच्या चोर कप्यात त्याचा एक फोटो होता हे माझ्या अजिबात लक्षात राहिलं नव्हतं. कारण तो आरसाच मी ड्रॉअरमध्ये टाकून दिला होता व किती तरी दिवसात वापरला नव्हता... त्या दिवशीं मुंबईस तुमच्याकडे यायचं मी अकस्मात् ठरविलं आणि माझ्या हँडबॅगेतला नेहमींचा आरसा आमच्या कुसुमनं घेऊन कुठे टाकला होता तो सापडेना. म्हणून घाईत ड्रॉअरमधे जुना आरसा चटकन् सांपडला तो बॅगेमधे टाकून मी निघाले. माझी कल्पनाहि नव्हती कीं आत्मघाताचं हत्यार बरोबर घेऊन मी तुमच्या-कडे चालले आहे. पण शेवटीं झालं मात्र तसंच... तुम्ही तो फोटो दाखवून माझ्यावर जेव्हा एकदम ओरडलात, 'हें काय! हें काय!' तेव्हा अगदीं पुरता घात झाला या खात्रीचा मला इतका जबरदस्त धक्का बसला, कीं माझी वाचाच एकदम नाहींशी झाली. मी रडूं लागलें, तुम्ही आणखी ओरडूं लागलात, आणि त्यामुळें माझी वाचा आणखीच बसली. मी मनातल्या मनात स्वतःला सारखं म्हणत होतें, अग तोंड उघड! बोल! पण काहीं केल्या तोंडाबाहेर शब्दच फुटेना. तुम्ही तर भयंकर बोलत होता. संतापाची आग माझ्यावर पाखडण्या-ऐवजीं तुम्हीं जर मला जवळ घेतलं असतं आणि प्रेमानं हळूच विचारलं असतं तर कदाचित् माझी तशी अवस्था झाली नसती, आणखी मीं तुम्हाला खरा प्रकार सांगितला असता .. तुम्ही का हो तसं केलं

नाहींत ? मला का हो जवळ घेतल नाहींत ? माझं चुंबन घ्यावस तुम्हाला का वाटलं नाहीं ? एका क्षणात माझ्यावरचं तुमच सार प्रेम आटून गेलं... ''

तुझे फोटो पाहिल्यावर काळाच आणि कडुपणाचं सारं अंतर एकदम लुप्त झाल्यासारख मला वाटल होत. आता तुझ पत्र वाचल्यानतर मनातला कडुपणा जाऊन त्या जागीं शरम उत्पन्न झाली होती, पण तुझ्यामाझ्यात प्रत्यक्ष केवढ अंतर होतं त्याची जाणीवहि मला तीव्रतेन झाली. तुझ्या पत्राच माझ्याकडून तुला उत्तर गेल नव्हत. आणि या गोष्टीचा तू काय अर्थ करून घेतला असशील कोण जाणे. मलाच तू वाईटं ठरविलं असशील. आणि या वर्षभरात तुझा तो ग्रह दृढ होऊन तू माझी आठवण प्रयत्नान मनातून काढून टाकली असशील. मी तुला कायमची घालवून बसलो काय, या भीतीनं माझ्या सर्वांगावर शहारे आले. तुझ्याकडे धाव घ्यावी या एकाच विचारावाचून दुसर काहीच सुचेनासं झाल.. तू आता पुन्हा माझ्या दृष्टीस तरी पडतेस कीं नाहीं कोण जाणे या शंकेन मी अगदीं घायाळ झालो...

पण ती माझी शका खोटी ठरली आहे. तूं माझ्या दृष्टीस पुन्हा पडत आहेस. यातच केवढा तरी आनद आहे. परतु याहूनहि मोठा आनद थोड्याच अवधींत माझ्या वाट्याला यावा अशी माझी इच्छा आहे. माझी आठवण तू बुजवून टाकली नसशील, माझ्यावरच तुझ प्रेम अजूनहि कायम असेल, मी तुला हवा असेन, अशी आशा मीं मनाशीं ठेवली आहे. ती सहसा खोटी होणार नाहीं. मी तुझ्यासमोर उभा राहिलो कीं आपल्याला या सार्वजनिक ठिकाणीं फारस बोलता आल नाहीं तरी माझ्या हृदयातले सगळे विचार माझ्या नजरेवरून तू ओळखशील आणि मला क्षमा करशील.. आता हा अक संपत आला आहे अस वाटत कारण थिएटरच्या दारावरचे नोकर पडदे सरकविणाऱ्याच्या बेतात असलेले मला दिसतात. आता थोड्याच अवधींत मला हवी तशी तुझी भेट होईल. तोंपर्यंत मी तुझ्या पाठमोऱ्या आकृतीकडे असाच पहात रहाणार आहे... तू मात्र मागं वळून पाहू नकोस...कारण तुझी माझी अशी नजरानजर व्हावी अशी माझी इच्छा नाहीं.